॥ ओ३म् ॥

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य महर्षि

## श्री स्वामी दयानंद सरस्वती

कृत

# सत्यार्थप्रकाश:

( पूर्वार्ध व उत्तरार्धासहित संपूर्ण, स्वमंतव्यामंतव्यासह )




प्रकाशक

श्री. शेट भागोजी बाळोजी कीर,

माहीम—मुंबई नं. १६

शके १८५४, सन १९३२.

प्रती २००० ]   किंमत प्रचारार्थ   [ फक्त एक रुपाया

पतितपावन, श्रीशंकरभक्त



श्रीमान भागोजी बाळोजी कीर

आर्यसमाजाचा संस्थापक



वेदोद्धारक महर्षि स्वामी दयानंद सरस्वती

ओ३म्.

॥ सच्चिदानन्देश्वराय नमो नमः ॥

# सत्यार्थप्रकाश—

## भूमिका.

ज्या वेळीं मी हा "सत्यार्थप्रकाश" नामक ग्रंथ प्रथमतः लिहिला, तेव्हां व त्याच्या पूर्वी मला संस्कृत भाषेंतच बोलण्याची व पठनपाठनाच्या वेळींहि संस्कृतच बोलण्याची संवय असल्यामुळें, व माझी जन्मभाषा गुजराथी असल्यामुळें व मला या हिंदी-भाषेचें ज्ञान नसल्यामुळें त्या ग्रंथाची भाषा अशुद्ध झाली होती. आतां ही (हिंदी) भाषा बोलण्याचा व लिहिण्याचा अभ्यास झाला असल्यामुळें हा ग्रन्थ व्याकरणानुरूप शुद्ध करून पुनः छापला आहे. कोठें कोठें शब्द व वाक्यरचना यांमध्यें बराच फेरबदल झाला आहे, कारण तसें केल्याशिवाय गत्यन्तर नव्हतें; तसा फरक केल्याशिवाय भाषेच्या अशुद्धि सुधारणें अशक्य झालें असतें. या ग्रन्थांत वाक्यरचनेमध्यें जरी भेद केला आहे तथापि मूळच्या भावार्थामध्यें कोणत्याहि तऱ्हेची हानी झाली नाहीं, [illegible] कित्येक ठिकाणीं अर्थाचा खुलासा जास्तच झाला आहे. जेथें जेथें पहिल्या आवृत्तींत चुका होत्या तेथें या आवृत्तींत सुधारणा केली आहे.

ह्या ग्रंन्थाचे १४ समुल्लास अर्थात् विभाग केले आहेत. त्यांपैकीं दहा समुल्लास पूर्वार्धांत आले असून पुढचे चार समुल्लास उत्तरार्धामध्यें आले आहेत. शेवटचे दोन समुल्लास व स्वसिद्धान्त कांहीं कारणामुळें प्रथमावृत्तीमध्यें छापतां आले नव्हते ते आतां छापले आहेत.

(१) **प्रथमसमुल्लास**-ईश्वराच्या ओंकारादि नांवांची व्याख्या.

(२) **द्वितीयसमुल्लास**-मुलांचें शिक्षण.

(३) **तृतीयसमुल्लास**-ब्रह्मचर्य, पठनपाठनव्यवस्था, सत्यासत्यग्रंथांचीं नांवें व ते शिकण्याची रीति.

(४) **चतुर्थसमुल्लास**-विवाह व गृहस्थाश्रमव्यवहार.

(५) **पञ्चमसमुल्लास**-वानप्रस्थ संन्यासाश्रमाचे विधि.

(६) **षष्ठसमुल्लास**-राजधर्म.

(७) **सप्तमसमुल्लास**-वेद व ईश्वर या संबंधाचा विषय.

(८) **अष्टमसमुल्लास**-जगताची उत्पत्ति, स्थिति व प्रलय.

(९) **नवमसमुल्लास** विद्या, अविद्या, बंध व मोक्ष यांची व्याख्या.

( १० ) दशमसमुल्लास—आचार, अनाचार, भक्ष्य व अभक्ष्य.
( ११ ) एकादशसमुल्लास— आर्यावर्तीय मतमतान्तरांचें खंडन मंडन
( १२ ) द्वादशसमुल्लास—चार्वाक, बौद्ध, व जैनमतांचें परीक्षण.
( १३ ) त्रयोदशसमुल्लास—ख्रिस्तीयमतपरीक्षण.
( १४ ) चतुर्दशसमुल्लास—मुसलमानीमतांचें परीक्षण.

चतुर्दशसमुल्लासाच्या अंतीं सनातन आर्यांच्या सनातन वेदविहितमताची विशेष व्याख्या लिहिली आहे, जी मला पूर्णपणें संमत आहे.

हा ग्रन्थ लिहिण्याचा माझा मुख्य उद्देश हाच आहे कीं, सत्य अर्थाचा प्रकाश करावा, अर्थात् जें खरें आहे त्याला सत्य व जें खोटें आहे त्याला असत्य ठरवणें हा माझा मुख्य उद्देश आहे, व यालाच मी सत्य अर्थाचा प्रकाश समजत आहे. जो सत्याच्या ठिकाणीं असत्य व असत्याच्या ठिकाणीं सत्य बोलेल त्याला सत्यनिष्ठ असें म्हणतां येणार नाहीं; पण जो जसें असेल तसेंच लिहील, बोलेल व मानील त्यालाच सत्यनिष्ठ म्हणता येईल. जो मनुष्य पक्षपाती असतो, तो आपल्या असत्यमताला सत्य भासवितो व प्रति पक्ष्याच्या सत्यमतालाहि असत्य भासविण्यास प्रवृत्त होतो, म्हणून त्याला सत्य मताची प्राप्ति होऊं शकत नाहीं; या करितां विद्वान् आप्तपुरुषांचें हें मुख्य काम आहे कीं, त्यांनी उपदेश व लेख यांच्या द्वारें सर्व मनुष्यांपुढें सत्यासत्याचा निर्णय मांडावा. त्यावरून नंतर ते आपले हिताहित पाहून सत्याचें ग्रहण व असत्याचा त्याग करून सदोदित आनंदाचा उपभोग घेतील. मनुष्याचा आत्मा सत्यासत्याला जाणणारा आहे. परंतु आपल्या स्वार्थासाठीं तो हट्ट, दुराग्रह, व अविद्यादिदोष यांच्यामुळें सत्याला सोडून असत्याच्या बाजूला झुकतो; पण या ग्रंथामध्यें अशी गोष्ट मी आणली नाहीं व कोणाचें मन दुखवण्याचा किंवा कोणाची हानी करण्याचाहि प्रयत्न केलेला नाहीं. सत्योपदेशा-वांचून दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें मनुष्यांची उन्नति होणार नाहीं, म्हणून ज्याच्या योगानें मनुष्यजातीची उन्नति व उपकार होईल त्या सत्यासत्याचा निर्णय करून मनुष्यांनीं सत्याचें ग्रहण व असत्याचा परित्याग करावा, एवढ्यासाठींच हा ग्रन्थ आहे.

या ग्रन्थामध्यें जर कोठें अशुद्धि, लिहिण्याच्या किंवा छापण्याच्या दोषामुळें झाली असेल, तर ती कळतांक्षणींच सत्य असल्यास त्याप्रमाणें तावडतोब शुद्ध करण्याचा प्रयत्न केला जाईल; पण जर कोणी पक्षपातानें खंडनमंडन करण्याची खटपट करील, तर त्याच्याकडे मात्र लक्ष्य दिलें जाणार नाहीं. हां, जर कोणी मनुष्यमात्रांच्या हितार्थ कांहीं सुधारणा करावयासाठीं सुचविल तर त्या खऱ्या असल्यास त्यांचाहि संग्रह केला जाईल. प्रत्येक मतमतांतरामध्येंहि बरेच विद्वान् पुरुष आजकाल असलेले दिसतात; तर ते पक्षपात सोडून सर्वतन्त्रसिद्धांतांचें–अर्थात् ज्या ज्या गोष्टी सर्वांला अनुकूल व सत्य

आहेत, त्यांचें-ग्रहण व ज्या विरुद्ध असून असत्य आहेत त्यांचा त्याग करून परस्परां-मध्यें प्रीतिपूर्वक वर्तन करतील तर जगताचें पूर्ण हित होईल; कारण विद्वानामध्यें विरोध असल्यानें अविद्वानांतहि विरोध वाढतो व त्यामुळें अनेक दुःखें वाढतात व सुखें कमी होत जातात. स्वार्थी लोकांना प्रिय असणाऱ्या या हानीमुळेंच सर्व लोक दुःखसाग-रामध्यें बुडत चालले आहेत ! जेव्हां जेव्हां हितावर दृष्टि ठेवून कोणी मनुष्य उच्चतम काम करण्यास प्रवृत्त होतो तेव्हां हेच स्वार्थीलोक त्याचा विरोध करून त्याला अनेक प्रकारें विघ्नें करूं लागतात. पण:—

सत्यमेव जयते नानृतम् ।
सत्येन पन्था विततो देवयानः ॥

सर्वदा सत्याचा विजय होऊन असत्याचा पराजय होत असतो, व सत्याच्याच योगानें विद्वानांचा मार्ग विस्तृत होत असतो, या वचनावर दृढ निश्चय ठेवून आप्त लोक परोपकारापासून व सत्य अर्थाचा प्रकाश करण्यापासून परावृत्त होत नाहींत. पहाः—

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ॥ गीता ॥

हें वचन अचल आहे. विद्यावृद्धि व धर्मप्राप्ति यांचीं जीं कामें असतात तीं प्रथ-मतः विषतुल्य भासतात, पण शेवटीं अमृतासारखीं होतात. या सर्व गोष्टी चित्तांत ठेवू-नच मी हा ग्रंथ लिहिला आहे.

श्रोत्यांनीं व वाचकांनीं या ग्रंथाकडे प्रेमपूर्वक पाहून या ग्रंथांतील सत्यभाव जाणून उचित वाटेल तें करावें. या ग्रंथामध्यें असा प्रकार ठेवला आहे कीं, ज्या ज्या गोष्टी सर्व मतांमध्यें सत्य आहेत, त्या त्या सर्वांला अविरोधी असल्यामुळें त्यांचा स्वीकार करून, ज्या ज्या मतमतांतरांतील मिथ्या गोष्टी आहेत त्यांचें खण्डन केलें आहे. सर्व मतमतांतरांतील गुप्त व प्रकट वाईट गोष्टीहि यांत दाखविण्याचें व त्या सर्व विद्वान् व अविद्वान् यांच्यापुढें मांडण्याचें कारण इतकेंच कीं, सर्वांनी त्यावर विचार करून सर्वांनीं प्रेमानें सत्याचेंच ग्रहण करून सत्यमतावलम्बी बनावें. जरी मी आर्यावर्त देशांत उत्पन्न झालों आहे व येथेंच राहत आहे तथापि या ग्रन्थांत जसें या देशांतील मतमतांतराचा पक्षपात सोडून त्यांतील सत्यासत्याचा प्रकाश केला आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्या देशांतील मतांचेंहि परीक्षण करून त्याच्याशीं तसेंच निःपक्षपाती वर्तन मी ठेवीत आहे. जसा मी स्वदेशीय मनुष्यांशीं मनुष्योन्नति विषयासंबंधानें वर्ताव करतों, त्याचप्रमाणें विदेशीयांशींहि वर्ताव ठेवतों व तसाच सर्व सज्जनांनींहि ठेवला पाहिजे. कारण जर मीहि कोणत्यातरी एकाच मताचा पक्षपाती झालों असतों तर आजकालच्या स्वमताची स्तुति व मंडन करून त्याचा प्रसार करणाऱ्या व दुसऱ्या मतांची हानी, निंदा व बंदी करण्यांत तत्पर होणाऱ्या लोकांप्रमाणें

नींहि बनलों असतों, पण असें करणें मनुष्यपणाच्या बाहेरचें आहे. कारण पशू बलवान् झाले तर निर्बलाला दुःख देऊं लागतात तसें करणें मनुष्याला योग्य नाहीं. जर मनुष्यहि तसेंच करूं लागले, तर ते मनुष्यस्वभावयुक्त नसून पशूच होत. जो बलवान् होऊन निर्बलांचें रक्षण करतों त्यालाच मनुष्य ह्मणतां येईल; पण जो स्वार्थी होऊन दुसऱ्याची हानी करण्यांत तत्पर होतो तो पशूंचा थोरला भाऊ आहे असें समजावें.

या पुस्तकांत आर्यावर्तीयांच्या मतांविषयीं अकराव्या समुल्लासापर्यंत लिहिलें आहे या समुल्लासांमध्यें जें सत्य मत प्रकाशित केलें आहे, तें वेदानुकूल असल्यामुळें मला पूर्णपणें ग्राह्य आहे व नवीन पुराणतन्त्रादि ग्रंथांचें खंडन केलें आहे. तें माझ्या मतें त्यक्तव्य आहे. बाराव्या समुल्लासांमध्यें चार्वाकाच्या मतांचें परीक्षण केलें आहे. यद्यपि हें मत सध्यां प्रायः लुप्त झाल्यासारखें आहे तथापि याचा बौद्ध व जैन या मतांशीं निकट संबंध असल्यामुळें व तो निरीश्वरवादाचा प्रवर्तक असल्यामुळें व पक्का नास्तिक असल्यामुळें, त्याच्या मताला प्रतिबंध करणें आवश्यक आहे; जर असत्य गोष्टीला प्रतिबंध केला नाहीं तर त्यांचा जगांत प्रसार होऊन त्या मोठ्या अनर्थाला कारणीभूत होत असतात. म्हणूनच चार्वाक व तसेंच बौद्ध व जैन यांच्या मताचें परीक्षण या समुल्लासामध्यें केलें आहे. चार्वाकाशीं या इतर बौद्ध व जैन मतांचा कांहीं बाबतींत विरोध आहे व कांहीं मध्यें मेळ आहे व जैनहि बहुत अंशांमध्यें चार्वाक व बौद्ध यांच्याशीं एकमत्य ठेवतात; पण कांहीं गोष्टींत त्यांचा परस्पर भेद आहे; ह्मणून जैन ही भिन्नशाखा आहे असें मानलें आहे. हे यांचे सर्व भेद बाराव्या समुल्लासामध्यें दाखविले आहेत. त्यांच्यांतील सर्व भेद व साम्य त्याच समुल्लासामध्यें पहावें व जैन मताविषयींहि तेथेंच पहावें. बौद्धांच्या दीपवंशादि प्राचीन ग्रंथांतील, बौद्धमतसंग्रह, सर्व दर्शनसंग्रह या ग्रंथांतील जीं मतें आहेत त्यांतूनच परीक्षणार्थ या पुस्तकांत उतारे घेतले आहेत. व जैनाच्या ज्या पुस्तकांतून उतारे घेतले आहेत त्यांपैकीं चार मुख्य आहेत. ( १ ) आवश्यकसूत्र, ( २ ) विशेष आवश्यकसूत्र, ( ३ ) दशवैकालिकसूत्र, ( ४ ) पाक्षिकसूत्र, हे मूल चार सूत्र ग्रन्थ होत यांचीं अकरा अंगें आहेत. ( १ ) आचारांगसूत्र, ( २ ) सुयगडांगसूत्र, ( ३ ) थाणाङ्गसूत्र, ( ४ ) समवायाङ्गसूत्र ( ५ ) भगवतीसूत्र, ( ६ ) ज्ञाताधर्मकथासूत्र, ( ७ ) उपासकदशासूत्र, ( ८ ) अंतगडदशासूत्र ( ९ ) अनुत्तरोववाईसूत्र, ( १० ) विपाकसूत्र, व ( ११ ) प्रश्नव्याकरणसूत्र, बारा उपांगें आहेत तीं हीं; ( १ ) उपवाईसूत्र, ( २ ) रायप्सेनीसूत्र ( ३ ) जीवाभिगमसूत्र, ( ४ ) पन्नवणासूत्र, ( ५ ) जम्बुद्वीपपन्नतिसूत्र, ( ६ ) चन्दपन्नतिसूत्र, ( ७ ) सूरपन्नतिसूत्र, ( ८ ) निरयावलीसूत्र, ( ९ ) कप्पियासूत्र, ( १० ) कपवडीसयासूत्र, ( ११ ) पूप्पियासूत्र व ( १२ ) पप्यचूलियासूत्र. कल्पसूत्रें पांच आहेतः—( १ ) उत्तराध्ययन, ( २ ) निशीथसूत्र ( ३ ) कल्पसूत्र, ( ४ ) व्यवहा-

रसूत्र, ( ५ ) जीतकल्पसूत्र. छेद सहा आहेतः—( १ ) महानिशीथबृहद्वाचनासूत्र, ( २ ) महानिशीथलघुवाचनासूत्र, ( ३ ) मध्यमवाचनासूत्र, ( ४ ) पिंडनिरुक्तिसूत्र, ( ५ ) औघनिरुक्तिसूत्र, ( ६ ) पर्यूषणासूत्र; पयन्नासूत्रें दहा आहेतः—(१) चतुस्सरणसूत्र (२) पंचखाणसूत्र (३) तदुलवैयालिकसूत्र, (४) भक्तिपरिज्ञानसूत्र,(५) महाप्रत्याख्यानसूत्र, ( ६ ) चंदाविजयसूत्र,( ७ ) गणिविजयसूत्र, ( ८ ) मरणसमाधिसूत्र ( ९ ) देवेन्द्रस्तवनसूत्र, ( १० ) संसारसूत्र. हे लोक या ग्रंथाप्रमाणेंच नन्दीसूत्र व योगोद्धारसूत्र हेहि ग्रंथ प्रमाण मानतात. यांच्या ग्रंथांचीं पंचअङ्गे (१) पूर्व सर्व ग्रंथांच्या टीका, (२) निरुक्ति (३) चरणीं, (५) मूलग्रंथ हीं होत. यांमधील चौथ्या अवयवाला ( अङ्गाला ) मानीत नाहींत. यां शिवायहि असे आणखी पुष्कळ ग्रंथ आहेत कीं, ज्याला जैन लोक प्रमाण समाजतात. या त्यांच्या मतावर विशेष विचार बाराव्या समुल्लासांत केलेला आहे. जैनांच्या ग्रन्थांमध्यें पुनरुक्तीचे दोष लाखों आहेत व या लोकांचा असा एक विलक्षण स्वभाव आहे कीं, यांचाच ग्रंथ जर अन्यमतावलम्बी पुरुषाजवळ असला किंवा तोच छापलेला असला तर यांच्यांतील कांहीं कांहीं लोक त्याला अप्रमाण मानतात, हा त्यांचा समज खोटा आहे; कारण कोणी मानतात व कोणी नाहीं. एवढ्यानेंच तो ग्रंथ जैन मताचा नाहीं असें होत नाहीं. हा ज्या ग्रन्थाला कधींहि कोणी जैनी माणसानें प्रमाण मानलें नाहीं त्याला अग्राह्य मानतां येईल. पण असा कोणताहि ग्रंथ नाहीं कीं, ज्याला कोणताहि जैन मानीत नाहीं म्हणून जो मनुष्य जो ग्रंथ मानीत असेल त्या ग्रन्थांतील विषयांचें खंडन मंडन त्या माणसासाठींच आहे असें समजावें. कित्येक पुरुष असे आहेत कीं, 'ते कांहीं ग्रन्थाला प्रमाण समजतात, पण सभेमध्यें किंवा वादविवादाच्या वेळीं भिन्न मत देतात ! हें ठीक नाहीं. जैनी लोक आपल्या ग्रन्थाला अगदीं गुप्त ठेवतात कोणा दुसऱ्या माणसाला दाखवीतही नाहींत ! ! देत नाहींत, ऐकवीत नाहींत, व शिकवीतहि नाहींत ! याचें कारण इतकेंच कीं, त्यांमध्यें अशा संभवनीय गोष्टी भरलेल्या आहेत कीं, त्याचें उत्तर कोणीहि जैन देऊं शकत नाहीं. असत्य गोष्टीला सोडणें हेंच उत्तर आहे.

तेराव्या समुल्लासामध्यें ख्रिस्तीयन लोकांचें मत लिहिलें आहे. हे लोक बायबलाला आपलें धर्मपुस्तक मानतात. यांचें विशेष परीक्षण तेराव्या समुल्लासामध्यें पहा. १४ व्या समुल्लासामध्यें मुसलमानांच्या मताचें परीक्षण केलें आहे. हे लोक कुराणाला आपलें धर्मपुस्तक समजतात. यांचें विशेष निरीक्षण चवदाव्या समुल्लासामध्यें पहावें. या पुस्तकाच्या शेवटीं वैदिक मत दिलेलें आहे. याप्रमाणें या ग्रंथाची व्यवस्था आहे. जो कोणी मुद्दाम विरोध करण्यासाठींच या ग्रंथाकडे पाहील, त्याला या ग्रंथापासून विशेष लाभ होणार नाहीं; कारण (१) आकाङ्क्षा, (२) योग्यता, (३) आसत्ति व ( ४ ) तात्पर्य या चार कारणांनीं वाक्यार्थाचा बोध होत असतो. जेव्हां या

चाराहि गोष्टींवर ध्यान देऊन कोणी मनुष्य ग्रंथावलोकन करतो तेव्हांच त्याला त्याचा यथायोग्य अभिप्राय विदित होत असतो. पहा—( १ ) आकाङ्क्षा-कोणत्या विषयावर वक्त्याचो व वाक्यांतील पदांचो परस्पर काय आकाङ्क्षा आहे तें पाहणें, ( २ ) योग्यता—ज्याच्यापासून जें होऊं शकतें ती योग्यता. जसें पाण्यापासून सिंचन होऊं शकतें ( तसें ज्ञान्यापासून उत्तम ग्रंथ बनूं शकतात. ) ( ३ ) आसत्ति—ज्या शब्दाशीं ज्या पदाचा संबंध असेल त्याच्याशींच तें पद लिहिणें किंवा बोलणें. ( ४ ) तात्पर्य—ज्या कारणासाठीं वक्त्यानें शब्दोच्चारण किंवा लेखन केलें असेल त्याच्याशींच त्याच्या शब्दांचा व लेखाचा संबंध जोडणें.

पुष्कळ हट्टी व दुराग्रही लोक असे असतात कीं, ते वक्त्याच्या अभिप्रायाच्या विरुद्ध कल्पना करीत असतात. विशेषतः मताभिमानी लोक हट्टी असतात, कारण स्वमताच्या अभिमानानें त्यांची बुद्धि अंधकारांत नष्ट झालेली असते; यासाठीं ज्याप्रमाणें मी पुराणें, जैनांचे ग्रंथ, बायबल, पुराण वगैरे ग्रंथाला प्रथमतःच वाईट दृष्टीनें पाहून त्यांचा अव्हेर केला नाहीं, तर त्यांतील गुणाचें ग्रहण करून दोषांचा त्याग केला व सर्व मनुष्यजातीच्या उद्धारासाठीं मी प्रयत्न करीत आहे, त्याचप्रमाणें सर्वांनीं करावा हें उत्तम.

या मतांतील थोड्योड्या दोषांचाच प्रकाश येथें केलेला आहे. त्यावरून सत्यासत्याचा निर्णय करून असत्याचा त्याग व सत्याचें ग्रहण करण्यास सुज्ञांनीं योग्य व्हावें. मनुष्याला भ्रमांत पाडून, त्यांची बुद्धि भ्रष्ट करून, एकमेकांत शत्रुत्व उत्पन्न करून, मनुष्यांत दुही उत्पन्न करणें हें विद्वानांचें काम नव्हे; जरी हा ग्रंथ पाहून अविद्वानांच्या मनांत अन्यथा विचार येतील, तथापि बुद्धिमान् लोक याचा यथायोग्य अभिप्राय जाणतील, एवढ्यानें मी माझे परिश्रम सफल झाले असें समजून हे प्रयत्न सर्व सज्जनांच्या पुढें ठेवीत आहे. यांना पाहून व लोकांला दाखवून माझ्या श्रमाचें सार्थक्य करावें. याचप्रमाणें पक्षपात सोडून सत्य अर्थाचा प्रकाश करणें हें जसें माझें तसेंच तें इतर महाशयांचेंहि मुख्य कर्तव्य आहे. सर्वात्मा सर्वांतर्यामी सच्चिदानंद परमात्मा आपल्या कृपादृष्टीनें या आशयाला विस्तृत व चिरस्थायी करो.

॥ अलमतिविस्तरेण बुद्धिमद्वरशिरोमणिषु ॥

॥ इति भूमिका ॥

स्थान, महाराणाजींचें उदयपूर. भाद्रपद शुक्लपक्ष संवत् १९३९

( स्वामी ) दयानन्द सरस्वती

# दानशूर व भगवद्भक्त
# शेट भागोजी बाळोजी कीर यांचें चरित्र

पिबन्ति नद्यः स्वयमेव नाम्भः
स्वयं न खादन्ति फलानि वृक्षाः ।
नादन्ति सस्यं खलु वारिवाहाः
परोपकाराय सतां विभूतयः ॥



दीचें निर्मल जल, वृक्षाचें सुमिष्ट फल, व मेघांचें हरित दुर्वा-दल, नदी, वृक्ष व मेघ यांच्या स्वयं उपभोगासाठीं नसतें, किन्तु लोककल्याणासाठींच असतें. तसेंच सत्पुरुषाची विभूती परोपकार प्रीत्यर्थं असते.

आर्य ऋषी महर्षि आदि अनेक पुण्यात्म्याच्या सहवासानें पवित्र बनलेला व तपोभूमि आणि देवभूमी ह्मणून अभिनंदित झालेल्या हिमालय पर्वताच्या गंगोत्री पासून गंगेचा उगम आहे. भगवती पुण्यसलिला गंगेची जिथें उत्पत्ति आहे तिथें तिचें स्वरूप अत्यंत अल्प व क्षुद्र दिसतें. पण हीच गंगा जसजशी अनेक प्रत्यवायानां झुगारून पुढें जात गेली, तसतशी तिची स्थिती व स्वरूप बदलत गेलें, व शेवटीं बंगालच्या उपसागरांत स्वयं सागरोपम बनली. त्याचप्रमाणें श्रीमंत भागोजी शेटजींच्या अनेक चाळी, देवळें, धर्मशाळा, आश्रम, गौशाळा, हीं पाहिलीं व त्यांना लागलेल्या खर्चाची कल्पना केली, तर आज लक्षाधीश असलेले हे शेट पहिल्याप्रथम अत्यंत गरीब स्थितींत असतील, असें वरवर पाहाणाराला वाटणार नाहीं. परंतु खरोखर जन्मतः त्यांची अत्यंत गरीब स्थिति होती. रत्नागिरीच्या किल्ल्यांत एका मोडकळीस आलेल्या कैंबळी खोंबटांत यांचा जन्म झाला ! तें त्यांचें मुद्दाम जपून ठेवलेलें घर आजही किल्ल्यांत पाहाण्यास मिळतें. तें पाहून किल्ला पाहाण्यास जाणाऱ्या माणसांना "भागेश्वर मंदीर" व "पतीतपावन मंदीर" यांसारखीं लाखों रुपये खर्चाची देवालयें बांधणाऱ्या श्रीमंताचें चंद्रमौळी घर पाहून आश्चर्य वाटतें ! व शेटजींच्या कर्तबगारीची व निराभिमानतेची साक्ष पटते ! वयाच्या १० व्या वर्षी या कीरांच्या भागूवर स्वतःचें पोट भरण्याची पाळी आलेली होती. इतक्या लहान वयाच्या मुलाला कोणतें काम करून पोट भरतां येणार ? परंतु एक दिवस हा मुलगा चांफ्याची फुलें हातांत घेऊन उभा असतांना " फुलें विकतोस का ? " असें विनोदानें एका गृहस्थानें याला विचारलें. त्यावर यानें 'होय ' असें उत्तर दिलें. व तीं फुलें दोन पैशांस

विकली गेली. त्यामुळें या लहानशा वयाच्या भागूस अत्यंत हर्ष होऊन स्वावलंबी पणें पैसा मिळविण्याचा मार्ग लाभल्याबद्दल समाधान वाटलें! फुलें विकून जें काय पैसा, दोन पैसे द्रव्य मिळेल तें तो आपल्या आईबापांस देऊं लागला. इतकी कुटुंबाची केविलवाणी स्थिति होती. कांहीं कालानंतर चांफ्याचीं फुलें विकणारा हा मुलगा रत्नागिरी येथील शिल्पशाळेंत जाऊं लागला. कारण त्या ठिकाणीं शिकण्याकरितां फी पडत नसून उलट शिकावयास येणाऱ्यांसच पैसे मिळतात! त्या ठिकाणी हा कीरांचा भागू ओघाओघानेंच वळला. हा जातीनें भंडारी असल्यामुळें नाविककला आणि त्यास जोडूनच तारवें, मचवे, होड्या इत्यादि बांधण्यासाठीं अवश्य लागणारें सुतारकाम या दोहोंकडे उपजतच कल असल्यामुळें, भागूच्या घरच्या मंडळीलाही सुतारकाम शिकण्याचें तत्काळ पटून त्यांनीं त्याला शिल्पशाळेंत घातलें. त्या ठिकाणीं १॥—२ वर्षें राहून साधारण लिहिण्यावाचण्यास व थोडेंसें सुतारकाम शिकतो न शिकतो तोंच त्यास शाळा सोडावी लागली. कारण शिक्षण फुकट असलें तरी जेवण फुकट नव्हतें. आणि घरीं तर अठरा विसवे दारिद्र्य, म्हणून शिक्षण तसेंच सोडून पोटाची टीचभर खळगी भरण्याकरितां कांहीं तरी सोय लागेल या उद्देशानें त्याला मुंबापुरीकडे धांव घेणें भाग पडलें. भागू मुंबईस आला, कामही मिळालें. पण पगार दिवशीं अडीच आणे! दिवसभर सुताराचे हाताशीं काम करीत घामाघूम व्हावें तेव्हां संध्याकाळीं अडीच आणे मिळणार! पण लौकरच या धंद्याच्या जोडीला जोडधंदा म्हणून त्यांनीं संध्याकाळीं ६ वाजल्यानंतर हमाली करण्यासही सुरुवात केली! अशा तऱ्हेनें कांहीं दिवस गेल्यावर त्यांना शेट पालनजी शापुरजी मेस्त्री या नांवाचे कॉन्ट्रॅक्टर भेटले व त्यांनीं त्यांची काम करण्याची शैली व हुशारपणा पाहून त्यास आपल्या कारखान्यांत ठेवून घेतलें. नंतर त्यांना ४–६ माणसें जमवून आणण्यास सांगून लहान लहान लांकूड कामाचीं कॉन्ट्राक्टें कशीं घ्यावीं याची माहिती देऊन आपलाच पोटकॉन्ट्रॅक्टर बनविलें. त्यांतही त्यांची तीक्ष्ण बुद्धि व हुशारी पाहून त्यांनीं, आपल्या कारखान्यांत मेस्त्री या नात्यानें त्यांची नेमणूक केली; व नंतर कांहीं वर्षांनीं स्वतःचा भागीदारही बनविलें. आतां सुद्धां शेट पालनजी मेस्त्री यांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव श्री. शापुरजी शेट यांच्याबरोबर भागीदार या नात्यानेंच ते काम करितात. शेट शापुरजी, भागोजी शेट यांना आपल्या बंधूप्रमाणें मानून त्यांना त्यांच्या धर्मकार्यांतही मदत करितात. इथे पारसी-हिन्दू ऐक्य पूर्वीच साधलें गेलें आहेत!

शेट भागोजी राहाणीनें अत्यंत साधे पण मनानें अत्यंत थोर आहेत. ते सत्याचे अत्यंत भोक्ते असून "शंकरा" वर त्यांची श्रद्धा आहे. त्यांनीं आपल्या कॉन्ट्रॅक्टच्या कामांत पूर्ण नैपुण्य संपादन केलें आहे. त्यांनीं कोणत्याहीं इमारतीचें कॉन्ट्रॅक्ट घेतलें तर ती सर्वोत्कृष्ट व्हावयाचीच अशी त्यांची लोकांना ध्

खात्री पटली असल्यामुळें त्यांना कामाला केव्हांच कमतरता पडत नाहीं, त्यांनी एकादें कार्य हातीं घेतल्यावर पैसा किती खर्च होईल या गोष्टीकडे न पाहातां कार्य कसें सर्वोत्कृष्ट होईल याच गोष्टीकडे त्यांचें लक्ष असतें व त्याकरितां मग कितीही त्रास झाला, व कितीही पैसा खर्च झाला, तरी त्याची त्यांना काळजी वाटत नाहीं. हाताखालील लोकांना वागविण्याची त्यांची पद्धतही वरील-प्रमाणेंच आहे. प्रत्येकानें ठरलेल्यावेळीं कामावर हजर असलेंच पाहिजे. व कार्य सर्वोत्कृष्ट करण्यांत त्यानें दंग असलें पाहिजे. अशा त्यांचा तीव्र कटाक्ष असल्यामुळें त्यांचा कामगारवर्गही त्यांना पाहिजे तसाच बनलेला आहे.

* * * *

" लभेत वा प्रार्थयिता नवा श्रियम् "

लक्ष्मीदेवीच्या पाठीमागें धावणाराला प्रायः लक्ष्मी मिळत नाहीं, पण कविचक्रवर्ती कालिदासाच्या वचनानुसारः—

" श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् ? "

अर्थात् जो लक्ष्मीदेवीचा ईप्सीत-इच्छितमनुष्य असेल तो तिच्याकडून पळून तरी कोठें जाईल ? तद्वत् आज लक्ष्मीदेवी श्री. भागोजी कीर यांच्या पाठीमागें धावत आहे. लक्ष्मीदेवी व श्री. भागोजी शेट यांच्या मध्यें जणूं विवादच चालला आहे असेंच वाटतें ! लक्ष्मीदेवीची कृपा जहाली कीं भागोजी शेट विविध धर्मकार्यांत त्यांचा विनियोग करून एका कवीनें म्हटल्याप्रमाणें:—

" **स्वयं महेशः श्वसुरो नगेशः**
**सुतो गणेशश्च सखा धनेशः ।**
**तथापि भिक्षाटन मेव शंभो-**
**र्बलीयसि केवल मीश्वरेच्छा** " ॥

—जो स्वयं महेश असून ज्याचा श्वसुर हिमालय, ज्याचा पुत्र गणाधीप गणपति व ज्याचा मित्र कुबेर आहे तथापि भूतभावन ' शंकर ' आपला निर्वाह भिक्षाटनद्वारा चालवितो ! अशा ' शंकरा'चे एकनिष्ठ भक्त बनून श्री. भागोजी शेट कीर राहतात ! आपल्या मिळकतीचाही ट्रस्ट करून स्वतः आपल्यासाठीं कांहींच ठेवलें नाहीं ! ! "**दानेन पाणि नेतुकङ्कणेन** ! ! ! असें औदार्य या काळांत क्वचितच पहाण्यास मिळेल. त्याचें कारण आम्हांस निदान तरी असेंच वाटतें कीं "तयो र्द्वयोः श्रीश्च सरस्वती च" लक्ष्मी व सरस्वतीचा शाश्वत विरोध दूर करण्यासाठींच त्यांची प्रवृत्ति असते. स्वतः जरी सरस्वती देवीचे कृपापात्र बनलें नाहीं, परंतु लक्ष्मी देवीचें कृपापात्र बनून ही लक्ष्मी देवी पैसा सरस्वती देवीलाच अर्पित मानीत आहे, हें त्यांच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति

राठी शाळा, " भंडारी विद्यार्थी आश्रम " इत्यादिकांची संयोजनावरून उघड दिसतें. यद्यपि जन्मतः शेटजी भंडारी ज्ञातींतले असून त्यांनीं स्वजाति सेवाही बरीच केली आहे, परंतु त्यांच्या उदार व विस्तृत आत्म्याला सेवेसाठीं विस्तीर्ण क्षेत्र पाहिजे असल्यामुळें सार्वजनिक **आर्य समाज** व त्याची **गुरुकुल** संस्था ह्यांना अत्यंत प्रिय जहालेली आहे. स्वतःचे कुटुंबांतील कांहीं मुलांनाही गुरुकुलांत शिक्षणार्थ पाठविलें होतें, व आपला रत्नागिरी येथील आश्रमही गुरुकुल पद्धतीवर चालविण्याची जबर हौस आहे. स्वयं जरी विद्वान् नसले तरी देश व जातींतली मुलें विद्वान् व कर्तबगार बनलीं पाहिजे व त्याचा सदाचार व आरोग्य उत्तम असलें पाहिजे हीच त्यांची तळमळ आहे. ब्राह्मणांनींच वेदाध्ययन करावें व इतर सदाचारी ब्राह्मणेतरांनीं तो कां न करावा, ह्याचें उत्तर ह्मणूनच गुरुकुलाची सर्वसामान्य शिक्षणपद्धतीवर त्यांचा कटाक्ष हा होय ! शेटजी स्वयं आर्यसमाजिष्ट नाहींत, पण आचार विचारांनीं ते अनेक आर्यसमाजिष्टापेक्षांही उच्च प्रतीचे आहेत. स्वयं मूर्तिपूजक असूनही मूर्तिपूजेचे खंडण करणाऱ्या आर्य समाजावर त्यांचें प्रेम आहे ! ह्या विलक्षणतेचें कारण असें कीं, त्यांचा पक्का विश्वास बनला आहे कीं आर्यसमाज हा एक दांडगा कर्तृत्ववान् समाज आहे व त्यांनींच आणीबाणीच्या वेळीं हिन्दुधर्माची स्वात्मार्पण करूनही सेवा केली आहे व करीत आहे, तर उपकृत हिन्दुधर्मीयांनीं आपली कृतज्ञता दाखविलीच पाहिजे !

वर्तमानकालीन आर्यसमाजाची सामाजिक व धार्मिक कांहीं गोष्टी जरी शेटजींना संमत नाहींत, तरी पण त्या आर्यसमाजाचे संस्थापक प्रातःस्मरणीय **महर्षि दयानंद** करितां ह्यांच्या हृदयांत प्रेमाचा झरा वाहत आहे. दयानंदाचा नामोच्चारण बरोबर ह्यांचे हृदय कृतज्ञ बुद्धीनें द्रवीभूत होऊन नतमस्तक होतें. कधीं कधीं हास्यामध्यें सांगतात कीं, " स्वामी दयानंदाचें अस्सल नांव ' मूलशंकर ' होतें. व ते मूलशंकराचा पत्ता मिळविण्यासाठींच घर सोडून संन्यास घेऊन स्वामी दयानंद बनले, व त्यांनीं समाधि व योगद्वारा त्या परमपिता, कल्याणकारक शंकराचा पत्ता मिळविला; व मीहि भगवान शंकराचा नम्र भक्त आहे, तर ज्यांनी माझ्या शंकराचा मूल पत्ता मिळविला, त्या स्वामी दयानंदाचा मी ऋणी आहे. " म्हणूनच स्वामी दयानंदाचा हा सर्वोत्कृष्ट ग्रंथ '**सत्यार्थप्रकाश**' प्रसिद्ध करून त्या योगें जनतेचें कांहींतरी कल्याण होऊन, स्वामीजीच्या ऋणांतून अंशतः मुक्त होऊं, या सदिच्छेनें प्रेरित होऊन शेटजी आज मूर्तीपूजक असून ही ' सत्यार्थप्रकाश ' ग्रंथ छापीत आहेत, त्यांत आर्यसमाजाचा जेवढा विजय आहे त्यापेक्षां अधिक श्री. भागोजी शेटचें औदार्य व कृतज्ञता बुद्धि यांचा आहे असें सर्वांना अर्थातच कबूल करावें लागेल.

श्री. भागोजी शेट यांना व्याख्यान करण्याची संवय नाहीं; पण जेव्हां जनतेपुढें उभे राहण्याची पाळी येते तेव्हां आपल्या हृदयाचेच उद्गार सरळ वाणी व सुजल

चक्षुनें व्यक्त करतात, तेव्हां उत्तम व्याख्याते पेक्षांही लोकांना मंत्रमुग्ध करून सोड-ण्याची त्यांची स्वाभाविक कला आहे असेंच आपणांस वाटेल.

गौरक्षण हा शेटजींचा जिव्हाळयाचा प्रश्न. त्यासाठीं शेटजींनीं वांई येथें विशाल व अनुपम गौशाला सहस्रावधि रुपये खर्च करून बांधली आहे.

अशाप्रकारें एकना अनेक क्षेत्रांत श्री. भागोजी शेट कीर अग्रेसर आहे. श्री. भागोजी शेट कीर यांना आर्यसमाजाचा चटका प्रथमतः सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय आर्यसमाजिष्ट **श्री. बावाजी अनाजी शेट तारकर** यांनीं लावून दिला होता. श्री. कीर व श्री. तारकर दोघेही बाल्यावस्थेंत समान स्थितींत असून स्वतःच्या कर्तबगारीनें आजच्या उत्तम स्थितींत दोघेही आले आहेत. ही सजातीय जोडी समवयस्क असून एकमेकांचे परममित्र व हितचिंतक आहेत. प्रत्येक सामाजिक कार्यांत दोघेही एकमेकांना विचारतात, व एकमतानें कार्य करितात. श्री शेट कीर यांनीं श्री. शेट तारकर यांना आपल्या ट्रस्टाचे कांहीं ट्रस्टीपैकीं एक ट्रस्टींही नेमले आहेत. मूर्तीपूजक व चुस्त आर्यसमाजिष्ट ह्यांचे धार्मिक विचार भिन्न असूनही यामध्यें निर्मळ प्रेम व सख्य कसें टिकतां येतें, ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजेच श्री. कीर व श्री. तारकर शेट हे आहेत. मन निर्मळ, विचारांत औदार्य व परस्पर सहानुभूति हेंच त्याचें कारण होय. असो.

* * * *

श्री. कीरांचा रोजचा कार्यक्रमही फारच नमुनेदार आहे. नेहमीं सकाळीं ४॥ वाजतां उठल्यावर शौचमुखमार्जन वगैरे करून ईश्वराचें नामस्मरण मोठ्या प्रेमानें व भक्तिभावानें ते करीत असतात. नंतर स्नान वगैरे करून प्रार्थना, स्तवन वगैरे कार्यक्रम साधारणपणें ८ वाजेपर्यंत चालतो. सकाळीं आपण उठल्यानंतर सर्व लहान मुलांनाही ते उठवितात व भजन करण्यास लावितात. नंतर दुग्धपान वगैरे आटोपून ते निरनिराळ्या ठिकाणीं चाललेल्या स्वतःच्या कारखान्यांवर देखरेख करण्यास जातात. नंतर दुपारीं २ वाजतां परत घरीं येऊन १ तास विश्रांती घेऊन फिरून कामावर जातात. प्रत्येक बारी-कसारीक काम स्वतः पाहून योग्य त्या सूचना देऊन कामगारांस त्या अमलांत आण-ण्यास लावितात. नंतर रात्रौ ९ वाजतां घरीं आल्यावर पत्रव्यवहार वगैरे पाहून आणि स्नान, ध्यान वगैरे कार्यक्रम आटोपून ११॥ चे सुमारास झोंपी जातात. त्यांना फक्त ५ तासच झोंप पुरते. बाकीचे १९ तास ते विविध कार्यांत दंग असतात. ते स्वतः निरलस असल्यामुळें आपल्या जवळील माणसांनींही तसेंच बनावें यावद्दल ते प्रयत्न करीत असतात.

श्री. शेटजींचा चेहरा पूर्ण निष्कपटी व हंसतमुख असा आहे. श्री. शेटजींची मूर्ति म्हणजे मनाच्या व पैशाच्या श्रीमंतीचा मिलाफ होय. **"मनस्येकं वचस्येकं कर्मण्येकं महात्मनाम्"** असे श्री. कीरांसारखे पुरुष ह्या काळांत क्वचितच आढळून येतात. यांचा स्वभाव अत्यंत करारी बाण्याचा असून धर्मावर व ईश्वरावर त्यांची पूर्ण

श्रद्धा आहे. धर्मासाठींच त्यांनीं लाखों रुपयांचा खर्च केला आहे. आज लोक त्यांना भगवद्भक्त, दानशूर, धर्मात्मे, उदार वगैरे प्रकारांनीं ओळखत असतात. अशाप्रकारें त्यांचा पैसा सकारण खर्च होत असल्यामुळें त्यांस पैशाचीही ददात पडत नाहीं. त्यांनीं आळंदी व वांई क्षेत्रीं गोशाळा, रत्नागिरी येथें 'भागेश्वर' व 'पतीतपावनमंदिर' वगैरे देवालयें, व धर्मशाळा बांधिल्या आहेत. अशाप्रकारें चांफ्याचीं फुलें विकणारा व अन्नाची पंचाईत असणारा हा मुलगा स्वतःच्या कर्तबगारीबर व ईश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून वाढतां वाढतां आज **भागूचे श्री. भागोजीशेट** बनले व आतां तर गुणज्ञ लोक त्यांना धर्मवीर वगैरे अनेक विशेषणांनीं गौरवीत आहेत! परंतु अशा गौरवानें दुसरा एखादा सामान्य मनुष्य अहंकाराने फुगून गेला असतां, परंतु यांचे ठिकाणीं अत्यंत शांतपणा व नम्रपणा दिसून येतो व सर्व कर्में मी करीत नसून माझ्याकडून ईश्वर करून घेतो असेंच ते नेहमीं सांगत असतात.

अशा थोर विभूतीकडून हा क्रान्तिकारक ग्रंथ प्रचारासाठीं प्रसिद्ध केला जात आहे. [ ह्याचाहा एक निराळा ट्रस्ट होणार आहे. ] त्या योगानें स्व. स्वामी दयानंदाच्या आत्म्यास संतोष लाभ होवोत व दयाळु जगदीश्वर श्री. शेट भागोजी कीर यांना दीर्घायुष्य देऊन यांच्या हस्तें अशीच अनेकविध धार्मिक, विद्यासंबंधी व सामाजिक सुधारणा परम कार्यें करून घेवोत, अशी त्या सत्यस्वरूप परमात्माच्या चरणीं प्रार्थना करून हें अल्प चारित्र्य इथेंच संपवितोः—

" शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पण्डितः ।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा " ॥ इत्यलम्

मुंबई: ता. १-१-१९३३ ] स्नातक सत्यव्रतः



# ओ३म्

# सत्यार्थप्रकाश पूर्वार्द्धः

## अनुक्रमणिका.

---

## चतुर्थसमुल्लास पृष्ट ८३ ते १२८

पञ्चमसमुल्लास. पृ. १३९–१५४



षष्ठसमुल्लास. पृ. १५५–१९८

## सप्तमसमुल्लास. पृ. १९९–२३९



## अष्टमसमुल्लास. पृ. २४०–२७३

## नवम समुल्लास पा २७३-३०२



## दशम समुल्लास

पा ३०३-३४०

## एकादश समुल्लास.



## द्वादश समुल्लास. पा. ५०७ ते ५७९



## त्रयोदश समुल्लास. पा. ५८३ ते ६४४



## चतुर्दश समुल्लास. पा. ६४६ ते ७१२







ओ३म्

सच्चिदानन्देश्वराय नमो नमः ।

# ईश्वरनामव्याख्या.

---

**ओ३म् । शन्नो॑ मि॒त्रः शं वरु॑णः॒ शन्नो॑ भवत्वर्य॒मा ॥ शन्न॒ इन्द्रो॒ बृह॒स्पतिः॒ शन्नो॒ विष्णु॑रुरुक्र॒मः ॥ नमो॒ ब्रह्म॑णे । नम॑स्ते वायो । त्वमे॒व प्र॒त्यक्षं॒ ब्रह्मा॑सि ॥ त्वामे॒व प्र॒त्यक्षं॒ ब्रह्म॑ वदिष्यामि ॥ ऋ॒तं व॑दिष्यामि ॥ स॒त्यं व॑दिष्यामि ॥ तन्माम॑वतु॒ तद्व॒क्तार॑मवतु ॥ अव॑तु॒ माम॑वतु॒ व॒क्तार॑म् ॥ ओ३म् शान्ति॒ः शान्ति॒ः शान्तिः॑ ॥ १ ॥** तैत्तिरी० प्र० अ० ॥ १ ॥

( ओ३म् ) हा ओम् शब्द परमेश्वर वाचक आहे. परमेश्वराच्या इतर नांवां- पेक्षां हें नांव सर्वांत उत्तम आहे. कारण, ओंकारांतील " अ-उ-म् " या तीन अक्षरांपासूनच परमेश्वराच्या इतर पुष्कळ नांवांचा बोध होतो. अकारापासून **विराट्, अग्नि, विश्व** यांचा, उकारापासून **हिरण्यगर्भ, वायु, तैजस** यांचा व मकारापासून **ईश्वर, आदित्य, प्राज्ञ** यांचा बोध होतो. प्रकरणानुसार हीं सर्व नांवें परमेश्वराचींच आहेत असें वेदादि सत्यशास्त्रांमध्यें प्रतिपादन केलेलें आहे. ( **पूर्वपक्ष्याचा प्रश्न** ) हीं वरील नांवें परमेश्वराशिवाय इतर पदार्थांचीं वाचक आहेत कीं नाहींत ? ब्रह्मांड, पृथ्वि वगैरे भूतें, इंद्रादिक देवता व वैद्यशास्त्रांत सुंठ वगैरे पदार्थ यांनांहि हेच शब्द वापरण्यांत येतात कीं नाहीं ? ( **सिद्धांत्याचें उत्तर** ) होय, पण ते आणखी परमेश्वराचेहि वाचक आहेत. ( प्र. ) केवळ देवांचेंच ग्रहण या नांवानें कां करूं नये ? ( उ. ) तुम्ही ह्मणतां तसें ग्रहण करण्यास काय प्रमाण आहे ? ( प्र. ) देव प्रसिद्ध आहेत व ते उत्तमहि आहेत ह्मणून आम्ही विराट् वगैरे शब्दांनीं त्यांचेंच ग्रहण करतों. असें करणें चूक आहे काय ? ( उ. ) परमेश्वरहि प्रसिद्ध आहे व सर्वोत्तमहि तोच आहे, मग हीं नांवें त्याचींच आहेत असें कां मानीत नाहीं ? परमेश्वर अप्रसिद्ध नाहीं व त्याहून दुसरा कोणी उत्तमहि नाहीं; अर्थात् तोच सर्वांहून

श्रेष्ठ आहे. ह्मणून तुमचें ह्मणणें स्वीकारल्यास पुष्कळ दोष उत्पन्न होतात. यथा—"**उपस्थितं परित्यज्यानुपस्थितं याचत इति बाधितन्यायः।**" तयार असलेलें भोजन टाकून जो तयार नसलेल्याची इच्छा करतो किंवा तत्प्रीत्यर्थ श्रम करतो, त्याला कोणीहि सूज्ञ असें ह्मणणार नाहीं. त्याचप्रमाणें **विराटा**दिक नांवांच्या योगानें प्रसिद्ध व प्रमाणसिद्ध परमेश्वर व ब्रह्मांडादिक पदार्थ यांचें ग्रहण न करतां, अनुपस्थित व असंभव अशा अन्य कल्पित देवांचें ग्रहण करणें हेंहि वरच्या प्रमाणेंच जाणावें. **विराटा**दिक शब्दांनीं परमेश्वरव्यतिरिक्त अन्य देवांचें ग्रहण करण्याला कोणतेंही प्रमाण किंवा युक्तिहि नाहीं. जर तुह्मी असें ह्मणाल कीं, प्रकरणानुसार वरील शब्दांचे अर्थ केले पाहिजेत, तर तें आह्मांला मान्य आहे. "हे भृत्य ! त्वं सैंधवमानय" असें जर कोणी मनुष्यानें आपल्या नोकरांस सांगितलें तर त्याचा अर्थ नोकरानें प्रकरणानुकूलच केला पाहिजे. कारण "हे नोकरा ! तूं सैंधव घेऊन ये" अशी जी धन्याची आज्ञा झाली आहे, ती कोणत्या वेळीं झाली आहे याचा त्यानें विचार केला पाहिजे. सैंधव शब्दाचे "मीठ" व "घोडा" असे दोन अर्थ आहेत. त्यांपैकीं कोणता घ्यावयाचा याचा विचार पूर्वापारसंबंध पाहूनच झाला पाहिजे. धनी जेवीत असतां, सैंधव शब्दाचा मीठ असा अर्थ समजावयाचा व बाहेर हिंडावयाला जात असतां, घोडा असा त्याचा अर्थ घ्यावयाचा. इत्यादि प्रकाराप्रमाणें जर तो नोकर अर्थ समजला नाहीं तर त्याला व्यवहार समजत नाहीं, ह्मणून त्याचा धनी त्याला नोकरीवर ठेवणार नाहीं. याचें तात्पर्य इतकेंच कीं, जरी शब्दाचे अर्थ अनेक असले तरी त्यांचा अर्थ पूर्वापार संबंध पाहून जो योग्य असेल तोच घेतला पाहिजे. ही गोष्ट सर्वांनीं मान्य करण्यासारखी आहे. वरील मंत्राचा अर्थ करण्यास लागणारीं प्रमाणें:—

**ओ३म् खं ब्रह्म** ॥ १ ॥ यजु० ४०।१७ ॥ **ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत** ॥ २ ॥ छान्दोग्य० १ ॥ **ओमित्येतदक्षरमिदꣳ सर्वं तस्योपव्याख्यानम्** ॥ ३ ॥ मांडूक्य० १ ॥ **सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपाꣳसि सर्वाणि च यद्वदन्ति । यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्** ॥ ४ ॥ कठोपनि० २।१५ ॥ **प्रशासितारं सर्वेषामणीयांसमणोरपि ॥ रुक्माभं स्वप्नधीगम्यं विद्यात्तं पुरुषं परम्** ॥५॥ **एतमेके वदन्त्यग्निमनुमन्ये**

प्रजापतिम् ॥ इन्द्रमेके परे प्राणमपरे ब्रह्म शाश्वतम् ॥ ६ ॥
मनु अ० १२ श्लो० १२२।१२३ स ब्रह्मा स विष्णुः स रुद्रस् स शिवस्सोऽक्षरम् स परमस् स्वराट् ॥ स इन्द्रस् स कालाग्निस् स चन्द्रमाः ७ ॥ कैवल्योपनिषद् ॥

इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यस्स सुपर्णो गरुत्मान् ॥
एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहु ॥ ८ ॥
ऋ० मं० १।२२।१६४।४६ ॥

भूरसि भूमिरस्यदितिरसि विश्वधाया विश्वस्य भुवनस्य धर्त्री ॥
पृथिवीं यच्छ पृथिवीं दृꣳह पृथिवीं मा हिꣳसीः ९॥ यजु० १३।१८॥

१ २ ३ १र २र ३ २ ३ २ ३ १२
इन्द्रो महूना रोदसी पप्रथच्छव इन्द्रः सूर्यमरोचयत् ॥
१ २ ३ २ ३ १२ ३ १ २ ३ २ ३ १ २
इन्द्रेह विश्वा भुवनानि येमिरे इन्द्रेस्वानास इन्दवः ॥ १० ॥
सामवेद ७ प्र० ३ अ० ८ सू० १६ अ० २ स० ३ सू० मं. ॥२॥

प्राणाय नमो यस्य सर्वमिदं वशे ॥ यो भूतः सर्वस्येश्वरो
यस्मिन्सर्वं प्रतिष्ठितम् ॥ ११ ॥ अथर्व० ११।२।४।१॥

ओंकारादि नामें परमेश्वराचीं वाचक आहेत हें दाखविण्यासाठीं हे वरील आधार दिलेले आहेत. परमेश्वराला जीं नांवें वेदामध्यें दिलीं गेलीं आहेत, तीं सर्व अन्वर्थक आहेत. कोणा मनुष्याचें नांव धनपति असूनहि तो दरिद्री असतो, तसा प्रकार परमेश्वराच्या नांवांसंबंधानें नाहीं. परमेश्वराचीं नामें त्याचे गुणकर्म-स्वभाव दाखवितात. कांहीं नामें त्याचे गुण दाखवितात, कांहीं त्याचीं कर्मे दाखवितात व कांहीं त्याचा स्वभाव दाखवितात, ह्मणून त्याच्या नामांचे "गौणिक, कार्मिक व स्वाभाविक असे तीन भेद आहेत." पहा "ओम्-खं-ब्रह्म" हीं तीन नांवें परमेश्वराचे तीन गुण दाखवितात. "अवति इति ओम्" "रक्षण करणारा ओम्" जाणावा. "आकाशमिव व्यापकत्वात् खम्" "आकाशाप्रमाणें सर्वव्यापक तो आहे ह्मणून त्याला खं असें नांव

आहे" "सर्वेभ्यो बृहत्वात् ब्रह्मः" सर्वांहून तो थोर आहे ह्मणून त्याला ब्रह्म असें ह्मणतात." याप्रमाणें हीं तीन नांवें परमेश्वराचीं वाचक आहेत. ॥ १ ॥ ओ३म् हें ज्याचें नांव आहे व जो ( अक्षरम् ) कधींहि नाश पावत नाहीं, त्या परमेश्वराचीच सर्वांनीं ( उपासीत ) उपासना करणें योग्य आहे. ॥ २ ॥ ( ओम् इत्येतत् ) सर्व वेदादि सच्छास्त्रांमध्यें परमेश्वराचें प्रधान व निजनाम " ओम् " हेंच सांगितलेलें आहे, बाकीचीं सर्व नांवें गौणिक आहेत. ॥ ३ ॥ ( सर्वे वेदा० ) सर्व वेद ज्याचें वर्णन करीत आहेत, ( तपांसि सर्वा० ) धर्मानुष्ठानरूपी तप हें ज्याच्यासाठीं आहे व ( यद् इच्छन्तो० ) ज्याच्या प्राप्तीसाठीं ब्रह्मचर्याचें पालन करतात, त्या परमेश्वराचें नांव " ओम् " हें आहे. ॥ ४ ॥ ( प्रशासि० ) जो सर्वांना शिक्षा देणारा व सूक्ष्माहून सूक्ष्म असल्यामुळें ज्याचें ज्ञान समाधींतील प्रज्ञेनेंच होतें, त्यालाच परमपुरुष असें ह्मणतात. ॥ ५ ॥ स्वप्रकाश असल्यामुळें " *अग्नि," विज्ञानस्वरूप असल्यामुळें "+मनु," सर्वांचें पालन करणारा व परम ऐश्वर्यवान् असल्यामुळें "=इन्द्र" सर्वांच्या जीवनाला आधारभूत असल्यामुळें "प्राण" व निरंतर सर्वव्यापक असल्यामुळें " ब्रह्म " अशीं नांवें त्या परमेश्वरालाच आहेत. ॥ ६ ॥ ( स ब्रह्मा० ) तो सर्व जग उत्पन्न करतो ह्मणून त्याला " ब्रह्मा," सर्वत्र व्यापून राहतो ह्मणून " विष्णु," दुष्टांना दण्ड करून रडावयास लावतो ह्मणून " रुद्र," तो मंगलमय व कल्याणकर्ता आहे ह्मणून " शिव," असें त्यालाच ह्मणतात. ( **यः सर्वम् अश्नुते न क्षरति न विनश्यति तदक्षरम्** ) परमेश्वर सर्वत्रव्यापक आहे व तो अविनाशी आहे ह्मणून त्याला "अक्षर" असें ह्मणतात. ( **यः स्वयं राजते स स्वराट्** ) तो स्वतः प्रकाशस्वरूप आहे ह्मणून त्याला "स्वराट्" असें ह्मणतात. ( **योऽग्निरिव कालः कलयिता प्रलयकर्ता स कालाग्निरीश्वरः** ) तो प्रलयकालीं सर्वांचा प्रलय करतो, कालाचाहि काल तो आहे ह्मणून त्याला "कालाग्नि" असें ह्मणतात. ॥ ७ ॥ ( इन्द्रं मित्रं० ) जें अद्वितीय सत्य ब्रह्म आहे त्याला इंद्रादिक सर्व नांवें दिलेलीं आहेत. ( **द्युषु शुद्धेषु पदार्थेषु भवो दिव्यः** ) प्रकृत्यादि दिव्य पदार्थांत व्याप्त आहे ह्मणून " दिव्यः " ( **शोभनानि पर्णानि पालनानि पूर्णानि कर्माणि वा यस्य सः** ) उत्तम प्रकारें पालन करतो व उत्तम कर्में करतो

---

[ * ] अगि–ज्ञानगतिप्राप्तिषु । [ + ] मन–विज्ञाने [ = ] इदि-परमैश्वर्ये । या धातूंवरून हे शब्द झालेले आहेत.

ह्मणून " सुपर्णः " ( यः गुर्वात्मा स गुरुत्मान् ) तो स्वरूपतः महान् आहे ह्मणून त्याला " गुरुत्मान " व ( मातरिश्वा वायुरिव बलवान् ) वायूप्रमाणें अत्यंत बलिष्ट असल्यामुळें त्याला ' मातरिश्वा ' असें ह्मणतात. हीं नांवें परमेश्वराचे पृथक् पृथक् गुण दाखविणारीं आहेत. ( इतर नामांचा अर्थ पुढें दिला जाईल ) ॥ ८ ॥ भूमिरसि० ( भवन्ति भूतानि यस्यां सा भूमिः ) परमेश्वरामध्यें सर्व भूतें—प्राणिमात्र—उत्पन्न होतात ह्मणून त्याला " भूमि " असें ह्मणतात. ( या मंत्रांतील शेष नामांचा अर्थ पुढें केला जाईल ) ॥९॥ ( इन्द्रो महना ) या मंत्रांत " इन्द्र " हा परमेश्वराचा वाचक शब्द आहे ॥ १० ॥ ( प्राणाय० ) ज्याप्रमाणें शरीर प्राणाच्या स्वाधीन असतें त्याचप्रमाणें परमेश्वराच्या स्वाधीन हें विश्व आहे. ह्मणून त्याला प्राण असें ह्मणतात. ॥ ११ ॥ इत्यादि प्रमाणांवरून अग्नि इत्यादि शब्द परमेश्वराचे वाचक आहेत असें स्पष्ट दिसेल. व्याकरण, निरुक्त, ब्राह्मण, सूत्रग्रंथ इत्यादि ऋषिमुनिप्रणीत ग्रंथांमध्यें " ओम्, अग्नि " आदिक शब्द परमेश्वराचे वाचक लिहिलेले आहेत, ह्मणून त्यांचा तसाच अर्थ घेणें सर्वांनां योग्य आहे. " ओम् " हें नांव केवळ परमात्म्याचेंच आहे व " अग्नि, विराट् " वगैरे नांवें प्रकरणानुसार परमेश्वराचीं वाचक होतात एवढाच काय तो भेद आहे; ह्मणून ज्या ठिकाणीं " सर्वज्ञ, व्यापक, शुद्ध, सनातन, सृष्टिकर्ता " इत्यादि विशेषणें लाविलीं असतील व त्याची स्तुति, प्रार्थना व उपासना करावी ह्मणून सांगितलें असेल, त्या ठिकाणीं अग्न्यादिक शब्दांनीं परमेश्वर असा अर्थ समजावा. व ज्या ठिकाणीं—

ततो विराडजायत विराजो अधिपूरुषः ॥ १ ॥
श्रोत्राद्वायुश्च प्राणश्च मुखादग्निरजायत ॥ २ ॥
तेन देवा अयजन्त ॥ ३ ॥
पश्चाद्भूमिमथो पुरः ॥ ४ ॥ यजु० अ० ३१ ॥

तस्माद्वा एतस्मादात्मनः आकाशः संभूतः ॥ आकाशाद्वायुः ॥ वायोरग्निः ॥ अग्नेरापः अद्भ्यःपृथिवी ॥ पृथिव्या ओषधयः ॥ ओषधिभ्योऽन्नम् ॥ अन्नाद्रेतः ॥ रेतसः पुरुषः ॥ स वा एष पुरुषोऽन्नरसमयः ॥ ५ ॥ ( तैत्तिरी० उप० ब्रह्मा० व० अ० १. )

या प्रकारच्या वचनांमध्यें " विराट्, पुरुष, देव, आकाश, वायु, अग्नि, जल, भूमि, " वगैरे नांवें लौकिक पदार्थांचीं आहेत असें समजावें. ज्या ठिकाणीं " उत्पत्ति, स्थिति, प्रलय, जडत्व, अल्पज्ञता, दृश्य, वगैरे प्रकारचे शब्द योजिले असतील तेथें ईश्वराचें ग्रहण होत नाहीं. कारण, उत्पत्ति वगैरे शब्द परमेश्वराला तो अजन्म असल्यानें–लागू शकत नाहींत; ह्मणून अशा तऱ्हेचें वर्णन जेथें असेल तेथें तेथें " विराट् " वगैरे शब्दांनीं लौकिक विश्वांतील पदार्थांचें ग्रहण केलें पाहिजे. तसेंच ज्या ठिकाणीं सर्वज्ञवादी विशेषणें लाविलीं असतील तेथें परमेश्वराचें ग्रहण करावें, व जेथें इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुख, दुःख इत्यादि गुण व अल्पज्ञत्व याचें वर्णन असेल तेथें जीवाचें ग्रहण करावें. परमेश्वर अज असल्यामुळें त्याला जन्मादिक विशेषणें लागू शकत नाहींत, म्हणून जन्ममरणाचा संबंध असेल तेथें जीव किंवा सृष्टींतील इतर पदार्थ यांचा बोध घ्यावा. ही व्यवस्था सर्वांनीं ध्यानांत ठेविली पाहिजे. आतां " **विराट्** " वगैरे नांवांनीं परमेश्वराचें ग्रहण कसें होतें हें पुढें दिलें आहे. ओंकाराचें " विराट् " वगैरे अर्थ पूर्वीं दिले आहेत, त्यांचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें आहे. ( राजृ दीप्तौ ) या धातूला " वि " हा उपसर्ग लावून त्याहून " क्विप् " हा प्रयत्न केला असतां " विराट् " शब्द सिद्ध होतो. ( **यो विविधं चराचरं जगद्राजयति प्रकाशयति स विराट्** ) परमेश्वर अनंत प्रकारच्या जगताला प्रकाशित करतो ह्मणून त्याला " विराट " असें ह्मणतात ( अञ्चु–गतिपूजनयोः । अग, अगि, इण इत्यर्थाः ) या धातूंवरून " अग्नि " शब्द सिद्ध होतो. गत्यर्थक धातूंचें " ज्ञान, गमन व प्राप्ति " असें तीन अर्थ प्रसिद्ध आहेत. म्हणून ( **यो अञ्चति अच्यते अगति अङ्गति एति सोऽग्निः** ) जी ज्ञानस्वरूप व सर्वज्ञ आहे व जो जाणण्यास व पूजा–सत्कार करण्यास योग्य आहे, अशा परमेश्वराला " अग्नि " असें म्हणतात. ( विश–प्रवेशनें ) या धातूंवरून " विश्व " हा शब्द सिद्ध होतो. ( **विशन्ति प्रविष्टानि सर्वाण्याकाशादीनि भूतानि यस्मिन् यो वा आकाशादिषु सर्वेषु भूतेषु प्रविष्टः स विश्वः ईश्वरः** ) ईश्वरामध्यें आकाशादिक सर्व भूतें आहेत, व तो आकाशादिभूतांत भरलेला आहे, म्हणून त्याला " विश्व " असें म्हणतात. हे अर्थ ओंकारांतील ' अ ' काराचे झाले. आतां ' उ ' काराचे अर्थ करावयाचे. " **ज्योतिर्वै हिरण्यं तेजो वै हिरण्यमिति ऐतरेये शतपथे च ब्राह्मणे ।** " ( **यो हिरण्यानां सूर्यादीनां तेजसां गर्भ उत्पत्तिनिमित्तमधिकरणं स**

**हिरण्यगर्भः** ) ज्याच्यामध्यें सूर्यादिक तेजोगोल उत्पन्न होऊन राहतात व जो सूर्यादि तेजोगोलांचें उत्पत्ति व निवासस्थान आहे, त्या परमेश्वराला " हिरण्यगर्भ " असें म्हणतात. पहा—

**हिरण्यगर्भः समवर्त्तताग्रे भूतस्य जातः**
**पतिरेक आसीत् ॥ स दाधार पृथिवीं**
**द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥**

यजु० १३।४॥

अशा स्थळीं " हिरण्यगर्भ " शब्द परमेश्वरवाचक आहे. असो, ( वा—गतिगन्धनयोः ) या धातूवरून " साधु " शब्द सिद्ध झाला आहे. ( गन्धनं हिंसनम् । **यो वाति चराचरं जगद्धरति बलिनां बलिष्ठः स वायुः** ) तो चराचर जगताचें धारण, पोषण व प्रलय करतो व तो बलवानाहूनहि बलिष्ठ आहे म्हणून परमेश्वराला " वायु " हें नांव आहे. ( तिज— निशानें ) या धातूवरून " तेजः " हा शब्द झाला आहे व त्यावरून तद्धित प्रत्यय करून " तैजस " हा शब्द सिद्ध होतो. तो स्वतः स्वयंप्रकाश आहे व तो सूर्यादि लोकांना प्रकाशित करतो म्हणून परमेश्वराला " तैजस " हें नांव आहे. इत्यादि अर्थ ' उ ' कारानें दाखविले जातात. ( ईश—ऐश्वर्यें ) या धातूवरून " ईश्वर " हा शब्द बनला आहे. ( **यः इष्टे सर्वैश्वर्यवान् वर्तते स ईश्वरः** ) ज्याचें ज्ञान सत्य आहे व जो अनंत ऐश्वर्यानें युक्त आहे, त्या परमात्म्याला " ईश्वर " असें म्हणतात. ( दो—अवखण्डने ) या धातूवरून " अदिति " शब्द साधला जातो व यावरून तद्धित प्रत्यय केला असतां, " आदित्य " शब्द सिद्ध होतो. ( **न विद्यते विनाशः यस्य सोऽयमदितिः । अदितिरेव आदित्यः** ) ज्याचा कधींही नाश होत नाहीं, त्या परमेश्वराला " आदित्य " असें म्हणतात. ( ज्ञा अवबोधने ) प्र उपसर्गपूर्वक ज्ञा धातूवरून " प्रज्ञ " हा शब्द होतो, व त्यावरून तद्धित प्रत्यय केला असतां " प्राज्ञ " हा शब्द साधतो. ( **य प्रकृष्टतया चराचरस्य जगतो व्यवहारं जानाति स प्रज्ञः । प्रज्ञ एव प्राज्ञः** ) ईश्वर सर्वज्ञतापूर्वक निर्भ्रांतवृत्तीनें सर्व चराचराच्या व्यवहाराला जाणतो म्हणून त्याला " प्राज्ञ " असें म्हणतात. हे अर्थ ' म ' काराचे आहेत. याप्रमाणें हे ओंकारापासून होणारे अर्थ आहेत. ज्याप्रमाणें प्रत्येकीं ओंकाराच्या एकएक मात्रेचे

त्या ठिकाणीं तीन तीन अर्थ दाखविले, त्याचप्रमाणें अन्य नामेंहि ओंकारापासूनच झालेलीं आहेत. ( शन्नो मित्रः शं व० ) मंत्रांत आलेलीं मित्रादिक नामेंहि परमेश्वराचींच वाचक आहेत. या मंत्रांत स्तुति--प्रार्थना--उपासना सांगितली आहे. म्हणून परमेश्वर हाच अर्थ या ठिकाणीं इष्ट आहे. स्तुति, प्रार्थना ही श्रेष्ठाची करावयाची असते. जो गुण, कर्म, स्वभाव व सत्य व्यवहार यांत अधिक असेल तोच श्रेष्ठ होय. या गुणांनीं युक्त असणाऱ्या सर्व श्रेष्ठामध्येंहि जो श्रेष्ठ आहे त्याला परमेश्वर असें म्हणतात. परमेश्वराशीं समान कोणी झाला नाहीं, सध्यां नाहीं व पुढेंहि कोणी होऊं शकत नाहीं. ज्याअर्थी त्याच्याशीं तुल्य कोणीहि नाहीं, त्याअर्थी त्याहून श्रेष्ठ कोण असूं शकणार ? परमेश्वरामध्यें जसें सत्य, न्याय, दया, सर्वशक्तिमत्व सर्वज्ञत्व वगैरे गुण आहेत, तसे दुसऱ्या कोणत्याहि जड पदार्थामध्यें किंवा जीवामध्यें नाहींत. जो पदार्थ सत्य व नित्य असतो त्यांतील गुणहि सत्य व नित्य असतात; म्हणून परमेश्वरांतील गुण सत्य व नित्य आहेत. याकरितां सर्व मनुष्यांनीं त्या परमेश्वराचीच उपासना करावी. पूर्वीच्या विद्वान् मुनींनीं, साधारण माणसांनीं व दैत्यदानवादिक माणसांनीं अर्थात् सर्वांनीं ब्रह्मा, विष्णु, महादेव या नांवांनीं त्या एका जगन्नियन्त्याचीच उपासना केली होती, व दुसऱ्या कोणाचीहि केली नव्हती. म्हणून त्यांच्याप्रमाणें सर्वांनीं करणें योग्य आहे. याचा विशेष विचार पुढें " मुक्ति व उपासना " या प्रकरणांत केला जाईल.

( प्रश्न ) मित्रादिक शब्दांच्या योगानें, स्नेही किंवा इंद्रसूर्यादिक देवता यांचें ग्रहण केलें जातें, तसें येथें कां करूं नये ? ( उत्तर ) या ठिकाणीं त्यांचें ग्रहण करतां नये. कारण, जो मनुष्य एकाचा मित्र असतो तोच दुसऱ्याचा शत्रु व तिसऱ्याशीं उदासीन असतो. म्हणून मनुष्यांमध्यें पूर्ण मित्रत्व संभवत नाहीं. मित्र शब्दांतील पूर्ण अर्थ परमेश्वरामध्येंच लागतो. परमेश्वर सर्वांचा मित्र आहे. तो कोणाचा शत्रु नाहीं व कोणाशीं उदासीनहि नाहीं. गौण अर्थानें मित्र वगैरे शब्द मनुष्यांनां लागूं शकतात, पण पूर्णार्थी ते परमेश्वराचेच वाचक आहेत. ( ञिमिदा स्नेहने ) या धातूला औणादिक ( क्त्र ) प्रत्यय लावला असतां " मित्र " शब्द सिद्ध होतो. ( **मेद्यति स्निह्यति स्निह्यते वा तत् मित्रम्** ) ईश्वर सर्वांहून जास्त स्नेह करणारा व सर्वांनीं प्रीति करण्यास योग्य आहे, म्हणून त्याला " मित्र " असें

म्हणतात. ( वृञ्-वरणें, वर ईप्सायाम् ) या धातूंना औणादिक " उनन् " प्रत्यय लावला असतां, " वरुण " हा शब्द सिद्ध होतो. ( **यः सर्वान् शिष्टान् मुमुक्षून् धर्मात्मनो वृणोति अथवा यः शिष्टैः मुमुक्षुभिर्धर्मात्मभिर्व्रियते वर्यते वा स वरुणः परमेश्वरः** ) परमेश्वर शिष्ट, मुमुक्षु व धर्मात्मे यांनां आपला आधार देतो; किंवा सर्व शिष्ट, मुमुक्षु व धर्मात्मे हे त्यालाच वरतात—श्रेष्ठ मानतात—म्हणून त्यालाच "वरुण" असें म्हणतात. ( **वरुणो नाम वरः श्रेष्ठः** ) श्रेष्ठत्व दाखविणारा वरुण हा शब्द आहे. परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे म्हणून त्याला "वरुण" असें म्हणतात. (ऋ-गतिप्रापणयोः ) या धातूला "यत्" प्रत्यय लावून "अर्य्य" हा शब्द साधला जातो. "अर्य्य" शब्दापुढें ( माङ्-माने ) या धातूवरून ( कनिन् ) प्रत्यय केला म्हणजे "अर्य्यमा" हा शब्द सिद्ध होतो. ( **यो आर्यान् स्वामिनो न्यायाधीशान् मिमीते मान्यान् करोति सोऽर्यमा** ) ज्याला सत्यप्रिय व न्यायकारी मनुष्य आवडतात, व जो दुराचारी माणसांनां यथायोग्य शासन करतो, अशा सत्यनियमकर्त्या परमेश्वराला "अर्य्यमा" असें म्हणतात. ( **इदि-परमैश्वर्ये** ) या धातूवरून "रन्" प्रत्यय केला असतां, "इन्द्र" शब्द सिद्ध होतो. ( **यः इन्द्रति परमैश्वर्यवान् भवति स इन्द्रः** ) परमात्मा अखिल ऐश्वर्यानें युक्त आहे म्हणून त्याला "इन्द्र" असें म्हणतात. "बृहत्" शब्दपूर्वक ( पा—रक्षणे ) या धातूवरून ( डति ) प्रत्यय करून व बृहत् शब्दांतील 'त' कराचा लोप व सुडागम झाल्यानें "बृहस्पति" शब्द होतो. ( **यो बृहतामाकाशादीनां पतिः स्वामी पालयिता स बृहस्पतिः** ) जो महान् ब्रह्मांडाचा व आकाशादिक भूतांचा स्वामी व रक्षक आहे, त्या परमात्म्याला— " बृहस्पति " असें म्हणतात.

( विष्लृ—व्याप्तौ ) या धातूला ( नु ) हा प्रत्यय लावला असतां "विष्णु" हा शब्द होतो. ( **वेवेष्टि व्याप्नोति चराचरं जगत् स विष्णुः** ) चराचर जगतांमध्यें व्यापक असल्यामुळें परमेश्वराला "विष्णु" असें म्हणतात. ( **उरुः महान् क्रमः पराक्रमः यस्यः स उरुक्रमः परमेश्वरः** ) अनंत आश्चर्यकारक महान् कृत्यें करणारा असल्यामुळें परमेश्वराला " उरुक्रम " असें नांव पडलें आहे. हे अर्थ लक्ष्यांत घेतले असतां " शंनो मित्रः " या पहिल्या मंत्राचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें होतो:—"परमेश्वर ( उरुक्रमः ) महा पराक्रमयुक्त ( मित्रः ) सर्वांचा सखा आहे, तो ( शम् ) सुख देणारा होवो. तो ( वरुणः )

सर्वोत्तम, ( शम् ) सुखस्वरूप, ( अर्य्यमा ) न्यायाधीश, ( शम् ) सुखप्रचारक, ( इन्द्रः ) सकल ऐश्वर्यवान, ( शम् ) मंगल व ऐश्वर्य यांना देणारा, (बृहस्पतिः) सर्वांचा अधिष्ठाता, ( शम् ) विद्याप्रद, ( विष्णुः ) सर्वांत व्यापून असणारा असा आहे; तो ( नः ) आह्मांला ( शम् ) सुखदायक ( भवतु ) होवो.

( वायो ते ब्रह्मणे नमोऽस्तु ) जो सर्वांत श्रेष्ठ, सर्वांहून थोर व अनन्त बलयुक्त परमात्मा आहे, त्याला आमचा नमस्कार असो. ( बृह बृहि-वृद्धौ ) या धातूंवरून " ब्रह्म " शब्द सिद्ध झाला आहे. परमात्मा सर्वांहून थोर असल्यामुळें त्याला " ब्रह्म " असें म्हणतात. " हे परमेश्वरा ! ( त्वम् एव ) तूंच खरोखर ( प्रत्यक्षम् ) प्रत्यक्ष ( ब्रह्म असि ) ब्रह्म आहेस. ( त्वाम् एव ) तुलाच मी प्रत्यक्ष ( ब्रह्म वदिष्यामि ) ब्रह्म मानतों, व तसेंच तूं ब्रह्म आहेस असें बोलेन. कारण, तूंच सर्व जगतांमध्यें व्याप्त आहेस व सर्वांनां त्यामुळें प्राप्त झालेला आहेस. ( ऋतं वदिष्यामि ) जी तुझी वेदांमध्यें यथार्थ आज्ञा आहे, तिचा मी सर्वांना उपदेश करीन व त्याचप्रमाणें मी वागेन. ( सत्यं वदिष्यामि ) मी खरें बोलेन, सत्य मानीन व सत्य असेल तेंच करीन. ( तत् माम् आवतु ) म्हणून माझें रक्षण कर. ( तत् वक्तारम् अवतु ) सत्यनिष्ठ व सत्यवक्ता यांचें रक्षण कर. ज्याच्या योगानें माझी बुद्धि तुझ्या वेदाज्ञेमध्यें स्थिर होईल व त्याच्या विरुद्ध कधींहि न जाईल असें कर. कारण, तुझी आज्ञा आहे कीं, वेदप्रणीत हाच खरा धर्म व तद्विरुद्ध सर्व अधर्म आहे. ( **अवतु माम् अवतु वक्तारम्** ) हे ईश्वरा ! त्या अधर्मापासून मी दूर होऊन धर्मामध्येंच सदैव मी स्थिर राहीन अशा प्रकारें माझें तूं रक्षण कर. [ या ठिकाणीं " अवतु० " या वाक्याची द्विरुक्ति केली आहे, ती दृढीकरणासाठीं होय. " त्वं ग्रामं गच्छ गच्छ " या वाक्यांत " गच्छ " क्रियापदाची द्विरुक्ति गमनक्रिया सत्वर करण्याविषयींचा बोध करते. त्याचप्रमाणें " अवतु० " या वाक्याची द्विरुक्ति शीघ्रता व आवश्यकता यांचा बोध करीत आहे असें समजावें ] ( ओम् शान्तिः शान्तिः शान्तिः ) याठिकाणीं " शान्तिः " शब्दाचा त्रिवार उच्चार करण्याचें कारण, तीन प्रकारच्या दुःखाचें निवारण व्हावें हें आहे. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक असें तीन प्रकारचें दुःख आहे. जें अविद्या, द्वेष, प्रीति, मूर्खता, ज्वरादि पीडा यांच्यापासून दुःख होतें तें अध्यात्मिक दुःख होय; जें शत्रु, व्याघ्र, सर्प, इत्यादिकांपासून दुःख होतें तें आधिभौतिक दुःख व जें अतिवृष्टि, अनावृष्टि, अतिशीत, अतिउष्ण, मानसिक व इंद्रियसंबंधीं अशांति यांपासून

होतें तें अधिदैविक होय. " या तीन प्रकारच्या दुःखांपासून आम्हांला दूर करून कल्याणकारककर्मांमध्यें आमची सदैव योजना कर. कारण, हे ईश्वरा ! तूं कल्याणस्वरूप आहेस; मुमुक्षूंनां आनंद देणारा तूंच आहेस. म्हणून तूं सर्वांच्या अंतःकरणांत प्रकाशित होऊन, सर्व लोक अधर्माला टाकून धर्माप्रमाणें आचरण करितील व त्यायोगें आनंदाचे भागी होतील असें कर. "

**सूर्य्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ॥ यजु० ॥**

" परमेश्वर स्थावर जंगमात्मक सर्व सृष्टीचा आत्मा आहे. तो स्वतः प्रकाशस्वरूप असल्यामुळें व तो सर्वांना प्रकाश देत असल्यामुळें त्याला " सूर्य " असें म्हणतात. ( अत—सातत्यगमने ) या धातूवरून " आत्मा " शब्द सिद्ध होतो. ( **योऽतति व्याप्नोति स आत्मा** ) जो सर्व जीवादिक जगतामध्यें व्यापलेला आहे त्याला " आत्मा " असें म्हणतात. ( **परमश्चासौ आत्मा च य आत्मभ्यो जीवेभ्यः सूक्ष्मेभ्यः परमोऽतिसूक्ष्मः स परमात्मा** ) जो जीवादिकांपेक्षां उत्कृष्ट व जीव, प्रकृति व आकाश यांहून अतिसूक्ष्म व सर्वांतर्यामी आहे, त्या ईश्वराला " परमात्मा " असें म्हणतात. " ईश्वर " म्हणजे सामर्थ्यवान् व ( **य ईश्वरेषु समर्थेषु परमः श्रेष्ठः स परमेश्वरः** ) जो सर्व सामर्थ्यवानामध्येंहि श्रेष्ठ, ज्याच्याशीं कोणाचीहि तुलना होऊं शकत नाहीं, तो " परमेश्वर " होय. (षुञ्—अभिषवे; षुङ् प्राणिगर्भविमोचने ) या धातूंवरून " सविता " हा शब्द सिद्ध होतो. (अभिषवः प्राणिगर्भविमोचनं चोत्पादनम् । **यश्चराचरं जगत् सुनोति सूते चोत्पादयति स सविता परमेश्वरः** ) सर्व जगाची उत्पत्ति करतो म्हणून परमेश्वराला " सविता " असें नांव आहे. ( दिवु—क्रीडा—विजिगीषा—व्यवहार-द्युति-स्तुति-मोद-मद-स्वप्न-कान्ति-गतिषु ) या धातूवरून " देव " शब्द होतो. याचे दहा अर्थ आहेत. ( क्रीडा ) ज्याची क्रीडा हें जगत् आहे, ( विजिगीषा ) धर्माचा विजय व्हावा असें इच्छिणारा, ( व्यवहार ) सर्वांनां व्यवहाराचीं साधनें देणारा, ( द्युति ) स्वयंप्रकाश व दुसऱ्यांनां प्रकाश देणारा, ( स्तुति ) प्रशंसा करण्यास योग्य, ( मोद ) आनंदमय व दुसऱ्यांस सुख देणारा, ( मद ) मदोन्मत्तांचें ताडन करणारा, (स्वप्न) सर्वांच्या विश्रांतीसाठीं रात्रि व प्रलय करणारा, ( कान्ति ) सर्वांनीं त्याच्या प्राप्तीची इच्छा करण्यास योग्य, ( गति ) ज्ञानस्वरूप असा तो परमेश्वर आहे, म्हणून त्याला " देव " असें म्हणतात. देव शब्दाचे हे अर्थ आहेत. किंवा

( यो दीव्यति क्रीडति स देवः ) जो आपल्या स्वरूपाच्या आनंदानेंच क्रीडा करतो, किंवा लीलेनें सहज जगत् उत्पन्न करतो, व जो सर्व क्रीडांचा आधार आहे, ( विजिगीषते स देवः ) जो सर्वांना जिंकणारा व जो स्वतः अजिंक्य, ( व्यवहारयति स देवः ) जो न्याय व अन्यायादिक व्यवहारांना जाणतो व जो उपदेष्टा आहे, ( यश्चराचरं जगद्द्योतयति ) जो सर्वांचा प्रकाशक, ( यःस्तूयते स देवः ) जो सर्वांनीं प्रशंसा करण्यास योग्य, ( यो मोदयति स देवः ) जो स्वतः आनंदस्वरुप व दुसऱ्याला आनंद देणारा, ज्याला दुःखाचा लेशहि नाहीं, ( यो माद्यति स देवः ) जो सदा हर्षित, शोकरहित व दुसऱ्यांस दुःखरहित व आनंदयुक्त करणारा, ( यः स्वापयति स देवः ) जो प्रलयकालीं सर्व जीवांनां विश्रांतिरूप निद्रा देतो, ( यः काम्यते, कामयते वा स देवः ) ज्याची कामना सत्य असते व ज्याच्या प्राप्तीची शिष्ट लोक इच्छा करतांत, ( यो गच्छति गम्यते वा स देवः ) जो सर्वत्र व्याप्त व सर्वांनीं प्राप्त करून घेण्यास योग्य आहे, त्या परमेश्वराला ' देव ' हें नांव आहे. ( कुबि आच्छादने ) या धातूवरून " कुबेर " शब्द सिद्ध होतो. ( **यः सर्वं कुम्बति स्वव्याप्त्याऽऽच्छादयति स कुबेरो जगदीश्वरः** ) आपल्या व्याप्तीच्या योगानें सर्व जग व्यापतो म्हणून परमेश्वराला " कुबेर " असें नांव आहे. ( प्रथ—विस्तारे ) या धातूवरून " पृथ्वी " शब्द होतो. ( **यः प्रथते सर्वं जगत् विस्तृणाति स पृथिवी** ) सर्व जगाचा विस्तार करतो म्हणून ईश्वराला " पृथिवी " असें ह्मणतात. ( जल—घातने ) या धातूवरून " जल " शब्द सिद्ध होतो. ( **जलति घातयति दुष्टान्, सङ्घातयति अव्यक्तपरमाण्वादीन् तद्ब्रह्म जलम्** ) दुष्टांनां शासन करतो व परमाणुंचें एकीकरण करतो म्हणून परमेश्वराला " जल " असें म्हणतात. ( काशृ—दीप्तौ ) या धातूवरून " आकाश " शब्द सिद्ध होतो. ( **यः सर्वतः सर्वं जगत् प्रकाशयति स आकाशः** ) जगताला सर्व बाजूंनीं प्रकाशित करतो ह्मणून परमेश्वराला " आकाश " असें नांव आहे. ( अद—भक्षणे ) या धातूवरून " अन्न " शब्द सिद्ध होतो.

**अद्यतेऽत्ति च भूतानि तस्मादन्नंतदुच्यते ॥ १ ॥**

**अहमन्नमहमन्नमहन्नम् । अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः ॥२॥**

तैत्तिरी० २।१०॥

पाठशाळेमध्यें ती कामें करण्यासाठीं स्त्रिया असाव्या. स्त्रियांच्या पाठशाळेमध्यें पांच वर्षाचेंहि मुलानें व मुलांच्या पाठशाळेंत पांच वर्षांच्याहि मुलीनें जाऊं नये, अशी व्यवस्था केलेली असावी. अर्थात् दोघेंहि जोंपर्यंत ब्रह्मचर्यावस्थेंत आहेत तोंपर्यंत दर्शन, स्पर्शन एकान्तसेवन, भाषण, विषयकथा, परस्परक्रीडा, विषयांचें ध्यान व संग या आठ प्रकारच्या मैथुनांपासून त्यांनीं दूर असलें पाहिजे; तसेंच अध्यापक लोकांनींहि त्या दुष्ट आचरणापासून त्यांस दूर ठेवावें. याच्या योगानें ते उत्तम विद्वान्, सुशिक्षित, सुशील, सुस्वभावी, शारीरिक व आत्मिक बलानें युक्त होऊन, ते नेहेमीं आनंदाला वाढविणारे होतील. नगरापासून किंवा गांवापासून चार कोस दूर पाठशाळा असावी. त्याठिकाणीं वस्त्र, पात्र, खाणेंपिणें, आसन, शयन हीं सर्वांनां अर्थात् राजकुमार किंवा दरिद्री लोकांचीं मुलें या सर्वांनासारखीं दिलीं जावी. सर्वांनीं, घराकडची चैन सोडून तपस्व्यांप्रमाणें तेथें राहून, ब्रह्मचर्य पालन केलें पाहिजे. आईबाप व मुलें यांची परस्पर भेट ब्रह्मचर्य संपेपर्यंत होऊं देऊं नये व एकमेकांचा एकमेकांशीं पत्रव्यवहारहि ठेवण्याची मनाई असावी कारण, त्यापासून गृहसंबंधीं चिंता विद्यार्थ्यांच्या मनामध्यें उत्पन्न होऊन विद्या शिकण्यांत विघ्नें उत्पन्न होण्याचा संभव आहे. विद्यार्थ्यांना विद्या वाढविण्याचीच एक चिंता असावी. ज्यावेळीं मुलें फिरावयास जातील तेव्हां त्यांच्या बरोबर अध्यापकानें असावें, म्हणजे ती कोणत्याहि प्रकारची कुचेष्टा व आलस्यादि प्रमाद करूं शकणार नाहींत.

**कन्यानां संप्रदानं च कुमाराणां च रक्षणम् ॥ मनु० अ० ७।१५२ ॥**

याचा अभिप्राय असा आहे कीं, राजनियम व जातिनियम असा झाला पाहिजे कीं, लोकांनीं आपल्या मुलांनां व मुलींनां पांचव्या वर्षांपासून तों आठव्या वर्षापर्यंत अवश्य पाठशाळेंत पाठविलेंच पाहिजे. जे न पाठवितील ते दंडनीय होतील. प्रथमतः मुलांचा यज्ञोपवीतसंस्कार घरीं होऊन दुसरा पाठशालेमध्यें किंवा आचार्यकुलामध्यें व्हावा. माता, पिता किंवा आचार्य यांनीं आपल्या मुलांनां व मुलींना खालील अर्थासह गायत्री मंत्राचा उपदेश करावा:—

**( २ ) गायत्री मंत्र.**

**ओ३म् । भूर्भुवःस्वः । तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ॥**

**धियो यो नः प्रचोदयात् ॥ यजु० ॥ ३६।३ ॥**

" ( ओ३म् ) या शब्दाचा अर्थ प्रथमसमुल्लासामध्यें केला आहे. तो तेथें पहावा. आतां तीन महाव्याहृतीचे अर्थ संक्षेपानें येथें देतो. ( **भूरिति वै प्राणः । यः प्राणयति चराचरं जगत् स भूः स्वयंभूरीश्वरः** ) परमेश्वर सर्व जगाच्या जीवनाला आधार आहे, स्वयंभू व प्राणाहूनहि प्रिय आहे, म्हणून त्याला प्राण किंवा " भू " असें ह्मणतात. ( **भूवरित्यपानः । यः सर्वं दुःखमपानयति सोऽपानः** ) परमेश्वर स्वतः दुःखरहित आहे व जे जीव त्याचा आश्रय करतात, त्याचींहि दुःखें तो नाहींशीं करतो ह्मणून त्यालाच अपान किंवा " भुव " असें नांव आहे ( **स्वरिति व्यानः योविविधंजगत् व्यानयति व्याप्नोति स व्यानः** ) परमेश्वर सर्वत्र व्याप्त व सर्वांचें धारण करणारा आहे ह्मणून त्याला व्यान किंवा " स्वः " असें ह्मणतात. हीं वरील तीनहि वचनें तैत्तिरीय आरण्यक प्रपा० ७।५ मध्यें आहेत ( **सवितुः । यः सुनोत्युत्पादयति सर्वं जगत् स सविता, तस्य** ) जो सर्व जगाचा उत्पन्न करणारा व सर्वांना ऐश्वर्य देणारा आहे, तो " सविता " समजावा. ( **देवस्य** ) **यो दीव्यति दीव्यते वा स देवः** सर्व सुखें प्राप्त करून देणाऱ्या व ज्याच्या प्राप्तीची इच्छा सर्व करीत आहेत, अशा परमात्म्याचें ( **वरेण्यम् । वर्तुमर्हम्** ) स्वीकार करण्यास योग्य असें अति श्रेष्ठ (**भर्गः शुद्धस्वरूपम्**) शुद्ध स्वरूप अथवा सर्वांनां पवित्र करणारें चेतन—ब्रह्मस्वरूप जें आहे, ( **तत्** ) त्याचें स्वरूप आह्मी ( **धीमहि धरेमहि** ) धारण करतों. कारण, ( **यः जगदीश्वरः** ) तो जगदुत्पादक परमात्मा ( **नः** ) आमच्या ( **धियः** ) बुद्धीला **प्रचोदयात् प्रेरयेत्** ) प्रेरणा करतो. अर्थात् त्यानें आह्मांला वाईट कर्मांपासून दूर करून आम्हांला सत्कर्मांमध्यें प्रवृत्त करावें. तात्पर्य " **हे परमेश्वर ! हे सच्चिदानंन्दस्वरूप ! हे नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव ! हे निरञ्जन ! निर्विकार ! सर्वान्तर्यामिन् सर्वाधार जगत्पदे ! सकलजगदुत्पादक ! हे अनादि विश्वम्भर ! सर्वव्यापिन् ! हे करुणामृतवारिधे ! सवितुः देवस्य तव यत् ओम् भूर्भुवःस्वः वरेण्यं भर्गोऽन्ति तद्वयं धीमहि दधीमहि धरेमहि ध्यायेम वा कस्मै प्रयोजनायेत्यत्राह । हे भगवन् ! यः सविता देवः परमेश्वरो भगवान् अस्माकं धियः प्रचोदयात् स एवास्माकं पूज्य उपासनीय इष्टदेवो भवतु नातोऽर्यं भवत्तुल्यंभवतोऽधिकं च कंचित् कदा-**

चित् मन्यामहे. ” हे मनुष्यहो ! जो सर्व समर्थ्यांमध्यें समर्थ, सच्चिदानंदानन्तस्वरूप, नित्य शुद्ध, नित्य बुद्ध, नित्य मुक्त आहे व जो कृपासागर, योग्य न्याय करणारा, जन्ममरणादि क्लेशरहित, आकाररहित, सर्वज्ञ, सर्वांचा धर्मपिता, सर्वांना उत्पन्न करणारा, अन्नादिकांनीं सर्वांचें पोषण करणारा, सकल ऐश्वर्ययुक्त, जगत्कर्ता, शुद्धस्वरूप, प्राप्ति करून घेण्यास योग्य असा जो शुद्ध चेतनस्वरूप परमात्मा आहे, त्याचीच आम्ही धारणा किंवा ध्यान करितों; कारण तो परमात्मा आमच्या आत्म्यांमध्यें व बुद्धीमध्येंहि व्यापक असल्यामुळें आम्हांला अधर्मयुक्त मार्ग व दुराचार यांपासून दूर करून सत्याचरणयुक्त श्रेष्ठ मार्गामधून जाण्याविषयीं प्रेरणा करील. या परमात्म्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि पदार्थांचें ध्यान करण्यांत आम्ही कधींहि लागतां नये; कारण, त्याच्याशीं तुल्यहि दुसरा कोणी नाहीं व त्याहून मोठाहि दुसरा कोणी नाहीं. तोच सर्वांतर्यामि परमात्मा आमचा पिता, राजा, न्यायाधीश व सर्व सुखें प्राप्त करून देणारा आहे. ”

याप्रमाणें अर्थासह गायत्रीमंत्राचा उपदेश करावा व स्नान, आचमन, प्राणायाम, मार्जनादि क्रियारूप असलेलें संध्योपासनहि त्याला शिकवावें. प्रातःकाळीं स्नान करावें, स्नानापासून बाह्य अवयवांची शुद्धि व त्यामुळें आरोग्य प्राप्त होतें. पहा—

**अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मनः सत्येन शुध्यति ॥**
**विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति ॥ १०९ ॥**

मनु० अ० ५

“ पाण्यानें शरीराच्या बाहेरील अवयवांची शुद्धि होते. सत्यचरणानें मन निर्मळ होतें, विद्या व तप अर्थात् सर्व प्रकारचे कष्ट सहन करून धर्माचरण केल्यानें जीवात्मा शुद्ध होतो व पृथिवीपासून परमेश्वरापर्यंत असलेल्या सर्व पदार्थांच्या ज्ञानानें बुद्धि शुद्ध होते. ” म्हणून शरीर सुद्धीसाठीं स्नान प्रथम करणें आवश्यक आहे. प्राणायामापासून पुढें लिहिलेला लाभ होतो—

**प्राणायामादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिराविवेकख्यातेः ॥**

योगदर्शन साधन० २८

“ मनुष्य जसा जसा प्राणायाम करतो त्या त्याचप्रमाणें त्याच्या अशुद्धींचा नाश होऊन, त्याच्यामध्यें ज्ञानाचा प्रकाश पडूं लागतो व मुक्ति प्राप्त होईपर्यंत आत्मज्ञान प्रतिक्षणीं वाढत जातें. ” तसेंच—

**दह्यन्ते ध्मायमानानां धातूनां हि यथा मलाः ॥**
**तथेन्द्रियाणांदह्यन्ते दोषाः प्राणस्य निग्रहात् ॥** मनु. ६।७१ ॥

" ज्याप्रमाणें अग्नीमध्यें तापवून सुवर्णादिक धातूंचे मल नाहींसे होतात, त्याचप्रमाणें प्राणायामाच्या योगानें इंद्रियांतील दोष नाहींसे होऊन तीं निर्मल होतात. "

## ( ३ ) प्राणायामाचा विधि.

**प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ॥** योगद० समादि० ३४ ॥

ज्याप्रमाणें वमनसमयीं कोठ्यांतून अन्न, जलवगैरे जोरानें बाहेर पडतें, त्याचप्रमाणें प्राणवायूला बाहेर फेंकणें व यथाशक्ति बाहेरच स्थिर करणें, ही प्राणायामाची एक रीत आहे. याप्रमाणें ज्यावेळीं प्राणवायूला बाहेर रेचक करावयाचा असेल, तेव्हां मूलेंद्रियाला वर आकर्षित करावें लागतें तेव्हांच वायु बाहेर स्थिर होतो. याप्रमाणें रेचक करून प्राणवायु बाहेरच स्थिर केला ह्मणजे जीव थोड्याच वेळांत घाबरा होऊं लागतो, असें होण्यापूर्वीच हळू हळू प्राणावायूला पुनः आंत घ्यावा व पुनः पूर्ववत् रेचक करावा. आपल्या सामर्थ्याप्रमाणें हे प्राणायाम करतांना मनांत " ओ३म् " काराचा जय करावा. याप्रमाणें केल्यानें आत्मा व मन यांची पवित्रता होऊन स्थिरता होते. यालाच " बाह्यविषय " प्राणायाम असें म्हणतात. दुसरा, ' अभ्यंतर " प्राणायाम यांत प्राणवायूचें आंतच स्थिरीकरण—कुंभक—होईल तितका करावयाचा असतो. तिसरा " स्तंभवृत्ति. " एकाच वेळीं आंतला आंत, बाहेरचा बाहेर प्राणवायु स्थिर करणें हा होय. चौथा "बाह्याभ्यन्तराक्षेपी" अर्थात् जेव्हां प्राणवायु आंतून बाहेर निघूं लागेल, तेव्हां त्याला बाहेर जाऊं न देतां बाहेरून प्राणवायु आंत घेणें व ज्यावेळीं प्राणवायु बाहेरून आंत येऊं लागेल, तेव्हां त्याला आंत येऊं न देतां, आंतून बाहेरच्या वायूला धक्का देऊन रोखून धरणें. याप्रमाणें परस्परविरुद्ध क्रिया केल्या असतां, प्राण आपल्याला वश होतो व त्यायोगें मन व इंद्रियेंहि आपल्या स्वाधीन होतात. प्राणायामाच्या योगानें बल व पुरुषार्थ वाढून बुद्धि तीव्र व सूक्ष्म होते; त्यायोगें अति कठीण विषयाचेंहि सहज ज्ञान होऊं शकतें. प्राणायामाच्या योगानें शरीरांत वीर्य वाढून तें स्थिर होतें व बल, बुद्धि, पराक्रम व जितेन्द्रियता हे गुण अंगीं येऊन अनेक शास्त्रांचें थोडक्या अवधींत अध्ययन करतां येऊन, केलेलें अध्ययन विसरलें जात नाहीं.

स्त्रियांनींहि याप्रमाणेंच प्राणायामादि योगांचा अभ्यास करावा. या शिक्षणा-प्रमाणेंच भोजन, आच्छादन, बसणें, उठणें, चालणें, लहानमोठे व्यवहार योग्यरीतीनें करणें इत्यादि व्यावहारिक शिक्षणहि विद्यार्थ्यांस द्यावें. **संध्योपासनाला ब्रह्मयज्ञ** असेंहि ह्मणतात. त्यामध्यें "**आचमन**" विधि आहे, तो असा. तळहातावर पाणी घेऊन त्याच्या मूल व मध्य प्रदेशांत ओंठ लावून तें कंठाच्या खालीं हृदयापर्यंत पोंचेल अशा बेतानें पिणें. हें पाणी हृदयापर्यंत पोंचेल या बेतानेंच घेतलेलें असावें. जास्तहि घेऊं नये, व कमीहि घेऊं नये. आचमनाच्या योगानें कंठस्थ कफ व पित्त यांची थोडीशी निवृत्ति होते. नंतर "**मार्जन**" विधि सांगितला आहे मार्जन करावयाचें असतां, मध्यमा व अनामिका या बोटांनीं पाणी घेऊन नेत्रादिक अवयवावर शिंतोडे पडतील अशा बेतानें फेंकावें. मार्जनाच्या योगानें आळस नाहींसा होतो. पाणी नसेल तर विधि करूं नयेत पण संध्या करावी. हे विधि विद्यार्थ्यांना शिकवून झाले ह्मणजे मग "समंत्रक प्राणायाम, मनसा परिक्रम उपस्थान," हीं शिकवून नंतर परमेश्वराची "स्तुति, प्रार्थना व उपासना," ह्यांची रीति शिकवावी. नंतर "**अघमर्षण**" शिकवावें. अघमर्षण ह्मणजे पापनाशन—पाप करण्याची इच्छाहि न करणें. हें संध्योपासन एकान्त स्थलीं एकाग्रचित्त करून दररोज करावें.

**अपां समीपे नियतो नैत्यिकं विधिमास्थितः ॥**
**सावित्रीमप्यधीयीत गत्वारण्यं समाहितः ॥** मनु० २।१०४ ॥

"अरण्यांत एकान्त प्रदेशांत जाऊन, जलाशयाजवळ बसून, सावधान चित्तानें नित्यकर्म करून गायत्रीमंत्राचें अर्थज्ञानपूर्वक उच्चारण करावें" व त्याप्रमाणें आपली वर्तणूक ठेवावी. गायत्रीमंत्राचें अध्ययन करणें व जप मनानें करणें अत्यंत उत्तम आहे असें जाणावें.

## ( ४ ) देवयज्ञ.

पंचमहायज्ञापैकीं संध्योपासन किंवा ब्रह्मयज्ञ हा पहिला असून "देवयज्ञ" हा दुसरा यज्ञ आहे. हे दोनहि यज्ञ, सकाळीं व संध्याकाळीं दिवस व रात्रीच्यावेळीं, केलेच पाहिजेत. या संधीसमयीं निदान एक घण्टाभर ( एक तासपर्यंत ) तरीं परमेश्वराचें ध्यान एकाग्र अंतःकरणानें करावें. ज्याप्रमाणें योगी लोक समाधिस्थ होऊन परमात्मध्यान करतात, त्याचप्रमाणें संध्योपास-

नहि एकाग्रचित्तानें केलें पाहिजे. अग्निहोत्रालाच देवयज्ञ असें म्हणतात. तो सूर्योदयानंतर सकाळींच व सूर्यास्तापूर्वीं संध्याकाळीं करावा.

अग्निहोत्रासाठीं एक धातूचें किंवा मातीचें "अग्निकुंड" असावें व त्याच्या तोंडाची लांबीरुंदी १२ किंवा १६ अंगुळें असून त्याच्या तळाची लांबीरुंदी ३ किंवा ४ अंगुळें असावी. हें कुंड चौरस असावें. त्याचप्रमाणें वेदी करावयाची असेल, तर तीहि तोंडाच्या आकाराच्या चतुर्थांश तळाचा आकार, या प्रमाणांत असावी. हवनासाठीं चंदन, पलाश, आम्र, खदिर, रुई वगैरे श्रेष्ठ लांकडाच्या समिधा वेदीच्या व कुंडाच्या प्रमाणानें, लहान मोठ्या असाव्या. कुंडामध्यें पूर्वोक्त समिधा कांहीं घालून मध्यें अग्नि स्थापन करावा व त्यावर पुन: समिधा ठेवाव्या.

एक **प्रोक्षणीपात्र**, एक **प्रणीतापात्र**, एक **आज्यस्थाली** व एक **चमस** इतकीं पात्रें घ्यावीं. आज्यपात्र हें तूप ठेवण्यासाठीं सोईचें भांडें आहे. चमस हा सोनें, चांदी किंवा लांकूड यांपैकीं कशाचाहि असला तरी हरकत नाहीं. असो. याप्रमाणें यज्ञाचीं उपकरणें घेऊन प्रणीता व प्रोक्षणीपात्रांत पाणी घालावें व आज्यस्थालीमध्यें तूप घालावें. तूप तापवून पातळ करावें. प्रणीतादि पात्रांतून हात वगैरे धुण्यासाठीं पाणी घेण्यास सोईचें होईल, अशा बेतानें तीं पात्रें मांडावीं. नंतर तें तूप सन्निध ठेवून पुढील मंत्रांनीं हवन करावें.

**ओम् भूरग्नये प्राणाय स्वाहा । भुवर्वायवेऽपानाय स्वाहा ।**
**स्वरादित्याय व्यानाय स्वाहा । भूर्भुवःस्वरग्निवाय्वादित्येभ्यः**
**प्राणापानव्यानेभ्यः स्वाहा ।।**

इत्यादि अग्निहोत्राच्या मंत्रांनीं एक एक आहुति देऊन अधिक आहुति देणें असेल तर—

**विश्वानि देव सवितर्दुरितानि परासुव ॥**
**यद्भद्रं तन्न आसुव ॥** यजु० अ० ३० । ३ ॥

या मंत्रानें किंवा पूर्वीं लिहिलेल्या "तत्सवितु०" या सावित्री मंत्रानें घाव्या. "ओम्" "भू:" "प्राण:" वगैरे परमेश्वराच्या नांवांचे अर्थ पूर्वी,

दिलेले आहेतच. ज्या मंत्रानें हवन केलें जातें त्याच्या शेवटीं "स्वाहा" हा शब्द म्हटला पाहिजे. "स्वाहा" शब्दाचा अर्थ ( "सु+आह" ) आत्म्यामध्यें जसें तत्वज्ञान असेल तसेंच बोलावें व परमेश्वरानें जगतामध्यें प्राण्यांच्या सुखा-साठीं जसे अनंत उपकार केले आहेत तसे मनुष्यानेंहि करावे." असा आहे.

## ( ५ ) होमाचें फल.

( प्रश्न ) होमापासून काय उपकार होतो ? ( उत्तर ) सर्व लोकांस हें माहित आहे कीं, बिघडलेल्या दुर्गंधयुक्त वायु व जल यांच्यायोगानें रोग उत्पन्न होतात व त्याच्यायोगानें मनुष्यांना दुःख होतें, म्हणून सुगंधयुक्त वायु व जल यांच्यायोगानें आरोग्य वाढून रोगनिवृत्ति होते व त्यामुळें सुखप्राप्ति होते. ( प्रश्न ) चंदन उगाळून चहूंकडे लावावें व तूपवगैरे पदार्थ मनुष्यांनां खाण्यासाठीं द्यावे म्हणजेहि आपण म्हणतां ते उपकार होतील. मग ते सर्व पदार्थ अग्नींत जाळून कां व्यर्थ घालवितां ? (उत्तर) जर तुम्हाला पदार्थवि-द्येची माहिती असती तर तुम्ही असें कधींहि म्हटलें नसतें. वास्तविक पाहतां कोणत्याही द्रव्याचा अभाव होत नाहीं. पहा ज्या ठिकाणीं हवन होत असतें त्या ठिकाणाहून दूर स्थळीं असणाऱ्या मनुष्यालाहि त्या त्या हवनीय द्रव्यांचा वास येतो, त्याचप्रमाणें एके ठिकाणीं असणाऱ्या दुर्गंधाचाहि येतो. या एका गोष्टीवरून समजा कीं, हवन करण्यासाठीं अग्नींत घातलेला पदार्थ सूक्ष्म होऊन वायूंत मिसळतो व आसपासच्या सर्व प्रदेशांतील हवा स्वच्छ करून तेथील रोगोत्पादक दुर्गंधाची निवृत्ति करतो. ( प्रश्न ) जर असें असेल तर केशर, कस्तुरी, अत्तर, सुगंधित फुलें घरांत ठेवावी म्हणजे वायु सुगंधित होऊन सुखकारक होईल. ( उ० ) पहा. नुसत्या सुगंधामध्यें भेदकशक्ति नसल्यामुळें, घरांतील बिघडलेली व दुर्गंधित हवा बाहेर घालवून त्याठिकाणीं स्वच्छ व सुगंधित हवा आणणें, हें काम त्याच्याकडून होऊं शकत नाहीं. ही भेदकशक्ति अग्नीमध्यें आहे. अग्नीच्या योगानें घरांतील किंवा प्रदेशांतील बिघ-डलेला वायु पृथक्करणापासून हलका होतो, व तो वर जातो व तेथील प्रदेशीं दुसऱ्या ठिकाणचा स्वच्छ वायु येतो. त्या योगानें तेथील आरोग्य वाढतें व रोगराई कमी होते. ( प्र० ) असें असल्यास हवनाच्या वेळीं मंत्र म्हणण्याचें काय प्रयोजन आहे ? ( उ० ) हवनमंत्रांमध्यें होमापासून काय

काय लाभ *होतात ते सांगितलेलें असतें. पुनः पुन्हां मंत्र म्हटल्यामुळें ते कंठस्थ होतात व वेदांचें पठनपाठण व रक्षणाहि होण्यास साहाय्य होतें. याप्रकारें मंत्र म्हटल्यानें लाभ आहेत. (प्र०) होम केला नाहीं तर पाप होतें काय? (उ०) होय. कारण मनुष्याच्या शरीरापासुन अनेक प्रकारचा रोगोत्पादक दुर्गंध उत्पन्न होतो, व त्यामुळें प्रत्यहीं हवा व पाणी हीं बिघडत असतात; याकारणानें अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होऊन प्राणिमात्राला दुःखें भोगावी लागतात. हें सर्व पाप मनुष्याच्याच माथीं लागतें. हें पाप नाहींसें करण्यासाठीं जितका वायु आपणांकडून बिघडला असेल तितका किंवा त्याहून अधिक स्वच्छ करणें व त्या ठिकाणीं सुगंधाचा फैलाव करणें हें मनुष्याचें अवश्य कर्तव्य आहे. हें सर्व प्रत्यहीं हवन केल्यानें सहज होतें. आतां कोणी म्हणेल कीं, एकाद्याला ते पदार्थ खावयास दिले तर तो लाभ होईल कीं नाहीं? नाहीं. कारण त्यापासून त्या एकाच व्यक्तीला लाभ होईल, पण हवन केल्यानें त्याचा सुपरिणाम हवेंत राहत असल्यामुळें लाखों लोकांना लाभ होऊं शकतो. घृतादि पदार्थ खाऊं नयेत असें आमचें म्हणणें नाहीं. शरीरामध्यें बल उत्पन्न करण्यासाठीं ते अवश्य खाल्लेच पाहिजेत. तसें होम करण्यापासून आरोग्य वाढतें म्हणून तेंहि केलेंच पाहिजेत. (प्र०) प्रत्येक मनुष्यानें किती आहुति द्याव्या व प्रत्येक आहुतीचें प्रमाण काय काय असावें? (उ०) प्रत्येक मनुष्यानें एक वेळ निदान सोळा तरी आहुति दिल्या पाहिजेत व प्रत्येक आहुतिमध्यें सहा मासे वजन तूप तरी निदान असलें पाहिजे. यापेक्षां जास्त केलें तर फारच चांगलें. म्हणूनच पूर्वकालीन आर्यवरशिरोमणिमहाशय, ऋषि-महर्षि राजेमहाराजे लोक स्वतः मोठमोठे होम करून दुसऱ्याकडूनहि करवीत असत. जोंपर्यंत या हवनांचा क्रम अबाधित चालत होता, तोंपर्यंत या आर्यावर्त देशांत रोग नव्हते व सर्व लोक सुखी होते. जर पुनः होमहवनें सुरू

* होमाच्या बाह्य कर्मापासून स्थूलदृष्ट्या होणारा हवाशुद्धि वगैरेचा लाभ सर्वांस समजण्यासारखा आहे परंतु बाह्य कर्माबरोबर जें अन्तरङ्ग कर्म करावयाचें असतें, तें त्या त्या मंत्रांचा अर्थ समजल्याशिवाय कळूं लागत नाहीं; म्हणून शक्तिसामर्थ्यानुसार अश्वमेधापर्यंत कोणत्याहि प्रकारचा होम करणें असेल, तेव्हां त्या त्या कर्मांत येणाऱ्या मंत्रांचें अर्थज्ञान करून घेऊन मग तें करावें. या होमानें बाह्य अग्नीच्या स्थूल अग्नीबरोबर अन्तरान्तर ज्ञानाग्नि प्रज्वलित होऊन दृष्टान्तात्मक बाह्य कर्माबरोबर अभ्यन्तर सत्कर्में करावयाचीं असतात, याचा बोध होईल.

होतील, तर तसेंच आरोग्य पुन्हांहि प्राप्त होईल यांत शंका नाहीं. असो. याप्रमाणें हे दोन यज्ञ आहेत. पहिला "ब्रह्मयज्ञ" यांत विद्या शिकणें व शिकविणें, संध्योपासन, ईश्वराची स्तुति, प्रार्थना व उपासना करणें यांचा अंतर्भाव होतो. दुसरा "देवयज्ञ" यांत अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञ व विद्वानांची सेवा, संगति व परोपकार यांचा अंतर्भाव होतो. पण ब्रह्मचर्यामध्यें केवळ ब्रह्मयज्ञ व अग्निहोत्र हींच कर्मे करावयाचीं असतात.

## (६) उपनयनसंस्कार.

**ब्राह्मणस्त्रयाणां वर्णानामुपनयनं कर्तुमर्हति । राजन्यो द्वयोश्च । वैश्यो वैश्यस्यैवेति । शूद्रमपि कुलगुणसंपन्नं मन्त्रवर्जमनुपनीतमध्यापयेदित्येके ॥** सुश्रुत सूत्रस्थान अ. २ ॥

"ब्राह्मणानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांचें, क्षत्रियानें क्षत्रिय व वैश्य यांचें व वैश्यानें फक्त वैश्यांचें उपनयन करावें व त्यांनां अध्ययन शिकवावें. तसेंच जो कुलगुलसंपन्न शूद्र असेल, त्याचें उपनयन न करतां, त्याला वेदमंत्राशिवाय इतर शास्त्रें शिकवावीत. असें अनेक आचार्यांचें मत आहे." पांचव्या किंवा आठव्या वर्षी मुलांनां व मुलींनां त्याच्या शाळेंत पाठवून द्यावें. पाठशाळेमध्यें पुढें दिल्याप्रमाणें अध्ययनाचा क्रम असावा.

## (७) ब्रह्मचर्याची मर्यादा.

**षट्त्रिंशदाब्दिकं चर्यं गुरौ त्रैवेदिकं व्रतम् ॥**
**तदर्धिकं पादिकं वा ग्रहणान्तिकमेव वा ॥** मनु० ३।१॥

"गुरुकुलामध्यें राहून सांगोपांग तीनहि वेदांचें अध्ययन करावें. प्रत्येक वेदाच्या अध्ययनाला बारा वर्षें याप्रमाणें तीनहि वेदांच्या अध्ययनाला छत्तीस वर्षें लागतात. उपनयन आठव्या वर्षी झालें असल्यास तीन वेदांचें अध्ययन संपेपर्यंत (३६+८) चव्वेचाळीस वर्षांचें वय, होतें, त्याचप्रमाणें हें पूर्ण ब्रह्मचर्य पाळलें जाणें शक्य नसल्यास अठरा वर्षांचें अर्धें ब्रह्मचर्य पालन करावें. हें संपेपर्यंत (१८+८) सव्वीस वर्षांचें वय होतें. किंवा नऊ वर्षांचें ब्रह्मचर्य तरी निदान धारण करावें अथवा विद्या समाप्त होईपर्यंत ब्रह्मचर्य धारण करावें.

**पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विंशतिवर्षाणि तत्प्रातः सवनम् । चतुर्विंशत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रातः सवनम् । तदस्य वसवोऽ**

न्वायत्ताः प्राणा वाव वसवः एते हीद९ सर्वं वासयन्ति ॥ १ ॥
तं चेदेतस्मिन्वयसि किञ्चिदुपतपेत् स ब्रूयात् प्राणा वसव इदं
मे प्रातः सवनं माध्यन्दिन ९ सवनमनुसंतनुतेति माहं प्राणानां
वसूनां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ २ ॥
अथ यानि चतुश्चत्वारि ९ शद्वर्षाणि तस्माध्यन्दिन ९ सवनं चतुश्च
त्वारि ९ शदक्षरा त्रिष्टुप् त्रैष्टुभं माध्यान्दिन ९ सवनं तदस्य रुद्रा
अन्वायत्ताः प्राणा वाव रुद्रा एते हीद९ सर्वं रोदयन्ति ॥ ३ ॥
तं चेदस्मिन्वासि किंचिदुपतपेत् स ब्रुयात्प्राणा रुद्रा इदं मे माध्यं
दिन९ सवनं तृतीयसवनमनुसंतनुतेति माहं प्राणानां रुद्राणां
मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ ४ ॥
अथ यान्यष्ट चत्वारि ९ शद्वर्षाणि तृतीय ९ सवनमष्टाचत्वारि
९ शदक्षरा जगती जागतं तृतीयसवनं तदस्यादित्या अन्वायत्ताः
प्राणा वा वादित्या एते हीद ९ सर्वमाददते ॥ ५ ॥ तं चेदेतस्मि-
न्वयासि किंचिदुपतपेत् स ब्रुयात् प्राणा आदित्या इदं मे तृतीय-
सवनमायुरनुसंतनुतेति माहं प्राणानामादित्यानां मध्ये यज्ञो विलो-
प्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो हैव भवति ॥ ६ ॥ छान्दोग्य उप०
प्रपा० ३ खं १६ ।

ब्रह्मचर्य तीन प्रकारचें आहे, कनिष्ट, मध्यम व उत्तम. चोवीस वर्षांचें हें कनिष्ट ब्रह्मचर्य होय. जो पुरुष चोवीस वर्षेपर्यंत जितेंद्रिय राहून, विषयलंपटता वगैरे कुविचार व दुराचरणें न करतां सदाचणानें राहून वेदादि विद्यांचें व सुशिक्षणाचें ग्रहण करतो, त्याच्या अन्तरसमय शरीरामध्यें वीर्य स्थिर राहिल्यानें तें बलवान होतें, प्राण बलवान् होतात व शरीरांत असणारा जीवात्मा—जो शुभगुणयुक्त असल्यामुळें सत्कारार्ह, यजनीय आहे व ज्याला " यज्ञ " असें ह्मणतात—तोहि सुसंस्कृत होतो किंवा शुभगुणयुक्त होतो. या प्रथम वयामध्यें जो आचार्य ब्रह्मचाऱ्याला विद्यारूपी तपानें तापवितो—शुद्ध करतो, त्यानें त्याला तसाच उत्तम उपदेश करावा. ब्रह्मचाऱ्यानें मनांत असा निश्चय करावा कीं, जर मी या प्रथम वयामध्यें नियमांप्रमाणें ब्रह्मचर्या पालन केलें तर माझें शरीर व आत्मा आरोग्ययुक्त व बलवान होऊन, माझ्यामध्यें शुभगुण उत्पन्न होतील व माझे प्राणहि

शुभगुणयुक्त व बलवान होतील. हे मनुष्यहो ! तुम्हीहि याप्रमाणें आपली सुखें वाढवा. मी जर ब्रह्मचर्याचा चोवीस वर्षेपर्यंत लोप केला नाहीं, चोवीस वर्षे ब्रह्मचर्य पाळून मग गृहस्थाश्रम स्वीकारला तर मी निरोगी राहून माझें आयुष्यहि ७० किंवा ८० वर्षें पर्यंत होईल. मध्यम ब्रह्मचर्य हें आहे कीं, चवेचाळीस वर्षें पर्यंत ब्रह्मचारी राहून वेदाभ्यास व विद्याध्ययन करणें. या ब्रह्मचर्याच्या सामर्थ्यानें त्याचे प्राण, इंद्रियें, अंत:करण व आत्माहि आपापल्या शक्तीनें बलवान् होऊन, तो मध्यम ब्रह्मचारी दुष्टानां रडविणारा व सज्जनांचें पालन करणारा होतो. शिष्यानें असें समजावें कीं, " जर मी या प्रथम वयामध्यें आपल्या सांगण्याप्रमाणें ब्रह्मचर्यरूपी तप करीन तर रुद्ररूपी प्राणयुक्त माझें मध्यम ब्रह्मचर्य पूर्ण होईल. " हे ब्रह्मचारी लोकहो ! ज्याप्रमाणें ब्रह्मचर्याचा लोप न करतां यज्ञस्वरूप होऊन, आचार्यकुलामध्यें विद्याध्ययन करून व सत्कर्म करून मी बलवान् व रोगरहित झालों आहे, त्याचप्रमाणें तुम्हीहि ब्रह्मचर्य धारण करून रहा. " उत्तम ब्रह्मचर्य अठेचाळीस वर्षांचे आहे. ज्याप्रमाणें ४८ अक्षरांचें जगतीवृत्त असतें तसेंच हें अठेचाळीस वर्षांचें ब्रह्मचर्य आहे. जो याचें पालन करतो त्याचे प्राण त्याच्या स्वाधीन होऊन, तो सर्व विद्या जाणणारा होऊं शकतो. आचार्य, माता व पिता यांनीं आपल्या मुलांना प्रथम वयामध्यें, त्यांनीं विद्वान् व सद्गुणी व्हावें म्हणून गुरुकुलांत पाठवून त्यांच्याकडून ब्रह्मचर्य व अध्ययनरूपी तप करून त्यांना तपस्वी बनवावें व त्यांना त्याविषयींच उपदेश करावा कीं, ज्याच्या योगानें ते अखंडित उत्तम ब्रह्मचर्याचें पालन करून पूर्णायुषी-अर्थात् चारशें वर्षेपर्यंत जगणारे होतील. जे या पूर्ण ब्रह्मचर्याचें नियमपूर्वक पालन करतात, मध्यें केव्हांहि लोप करीत नाहींत, त्यांना कधींहि रोगांनीं जर्जर होत नाहींत, अर्थात् ते सदैव उत्साही राहून धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांना प्राप्त करून घेतात.

## ( ८ ) विवाहाचा काल.

चतस्रोऽवस्थाःशरीरस्य वृद्धिर्यौवनं संपूर्णता किंचित् परिहाणिश्चेति । आषोडशाद्वृद्धिः । आपञ्चविंशतेर्यौवनम् । आचत्वारिंशतः संपूर्णता । ततः किंचित्परिहाणिश्चेति ॥ पञ्चविंशे ततो वर्षे पुमान् नारी तु षोडशे ॥ समत्वागतवीर्यौ तौ जानीयात्कुशलो भिषक् ॥ सुश्रुत-सूत्रस्था० ३५॥

या शरीराच्या चार अवस्था आहेत. ( १ ) सोळा वर्षांपासून पंचवीस वर्षांपर्यंत सप्त धातूची वृद्धि होते, म्हणून या पहिल्या अवस्थेला " वृद्धि " असें ह्मणतात. ( २ ) पंचविस वर्षांपासून पुढें " यौवन " अवस्था येते. ( ३ ) तिसरी " संपूर्ण " अवस्था होय. ही पंचविसाव्या वर्षांपासून चाळीसाव्यां वर्षांपर्यंत असते. या मुदतींत सर्व शरीरांतील सप्त धातूंची, पूर्णता–पुष्टि–होते ह्मणुन हिला " संपूर्णता " असें ह्मणतात. ( ४ ) चवथी अवस्था " किंचित्परिहाणि ", ही आहे. चाळीस वर्षेपर्यंत सर्व शरीर उत्तम रीतीनें पुष्ट झाल्यानंतर जे धातु बनतात ते स्थिर रहात नाहींत; स्वप्न, प्रस्वेदादिकांच्या द्वारानें बाहेर पडतात. ह्मणून या अवस्थेला " परिहाणि " असें म्हणतात. चाळीसाव्या वर्षी सर्व शरीर वाढून पूर्ण अवस्थेला प्राप्त होतें; ह्मणून विवाह करण्यास हें वय उत्तम आहे. अडेचाळीसाव्या वर्षी विवाह करणें हें सर्वोत्तम होय. ( प्रश्न ) हा ब्रह्मचर्याचा नियम स्त्री व पुरुष या दोघां-नांहि तुल्य आहे काय ? ( उत्तर ) नाहीं. पुरुषानें २५ वर्षेपर्यंत पालन केलें तर स्त्रीनें १६ वर्षेपर्यंत, पुरुष तीस वर्षे पर्यंत ब्रह्मचारी राहील तर स्त्रीनें १७ वर्षेपर्यंत, पुरुष ३२ वर्षेपर्यंत राहिला तर स्त्रीनें १८ वर्षेपर्यंत, पुरुष ४० वर्षेपर्यंत, राहिल्या तर स्त्रीनें २० वर्षेपर्यंत, पुरुष ४४ वर्षेपर्यंत राहिला तर स्त्रीनें २२ वर्षेपर्यंत व पुरुष ४८ वर्षेपर्यंत राहिला तर स्त्रीनें २४ वर्षेपर्यंत रहावें. ज्या स्त्रीपुरुषांनां विवाह करावयाचा असेल त्यांनीं, ४८ वर्षांपुढें पुरु-षानें व २४ वर्षांपुढें स्त्रीनें ब्रह्मचर्यव्रत धरूं नये, विवाह करावा; पण ज्यांनां आजन्म ब्रह्मचारी राहावयाचें असेल त्यांनीं ब्रह्मचर्यव्रतानेंच रहावें. असें आजन्म अविवाहित राहणें हें पूर्णविद्वान, जितेंद्रिय, निर्दोष, सदाचरणी व योगी स्त्रीपुरुषांचेंच काम आहे. कारण, कामविकाराला ताब्यांत ठेवून जितें-द्रियता कायम ठेवणें हें फार कठीण आहे.

## ( ९ ) यम व नियम.

ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च ॥
तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च ॥
शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च ॥
अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च । अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च ॥

**मानुषं च स्वाध्यायप्रवचने च। प्रजा च स्वाध्यायप्रवचने च ॥ प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च ॥**

—तैत्तिरीयोपनिषद प्रपा० ७।९ ॥

हे पठणपाठन करणारांचे नियम आहेत. ( ऋतं० ) यथार्थ आचरणपूर्वक शिकावें व शिकवावें, ( सत्यं० ) सत्याचारपूर्वक सत्य विद्या शिकाव्या व शिकवाव्या, ( तप० ) धर्मानुष्ठानरूपी तप करून वेदादि शास्त्रें शिकावीं, ( दमः० ) बाह्य इंद्रियांनीं वाईट कामें व दुराचरणें यांतुन परावृत्त करून विद्या शिकावी, व शिकवावी (शम०) मनाला सर्व दोषांपासून दूर ठेवून शिकावें व शिकवावें, ( अग्नय० ) आहवनीय व विद्युत् वगैरे अग्नीला जाणून शिकावें व शिकवावें, ( अग्निहोत्रं० ) अग्निहोत्र करून पठणपाठन करावें, ( अतिथय ) अतिथींचा सत्कार करून, ( प्रजा० ) संतान व राज्यांतील प्रजा यांचें पालन करून, ( मानुषं० ) मनुष्यसंबंधीं सर्व व्यवहार करून, ( प्रजन० ) वीर्याचें रक्षण व त्याची वृद्धि करून, ( प्रजाति० ) आपले पुत्र व शिष्य यांचें पालन करून शिकावें व शिकवावें.

**यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान् बुधः ।**
**यमान्पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन् ॥२०४॥मनु०अ० ४**
**तत्राहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ ३० ॥**
**शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥ ३२ ॥**

**—योगदर्शने साधनपादे.**

( १ ) ( अहिंसा ) वैरत्याग, ( २ ) ( सत्य ) सत्य मानणें, सत्य बोलणें व सत्य आचरण करणें, (३) ( अस्तेय ) कायावाचामनेंकरून चोरी न करणें, ( ४ ) ( ब्रह्मचर्य ) उपस्थ इंद्रियाचा संयम, ( ५ ) ( अपरिग्रह ) अत्यंत लोलुपता सोडून स्वत्वाभिमानारहित होणें, हे पांच "यम" आहेत यांचें सेवन मनुष्यमात्रानें सदैव करावें. तसेंच ( १ ) ( शौच ) स्नानादिकांनीं होणारी पवित्रता, ( २ ) ( संतोष ) निरुद्योगीपणाचा अवलंब करून प्रसन्न रहाणें हा संतोष नव्हे, तर जितका पुरुषार्थ होणें शक्य असेल तितका करून, हानि किंवा लाभ यांत शोक किंवा हर्ष न मानणें व मनाचा समतोल पणा ठेवणें हा संतोष होय, ( ३ ) ( तप ) धर्मानुष्ठान करण्यांत कष्ट

झाले तरी ते सहन करणें, ( ४ ) ( स्वाध्याय ) अध्ययन, अध्यापन, (५) ( ईश्वरप्रणिधान ) ईश्वराच्या भक्तीमध्यें आत्म्याला अर्पण करणें हे पांच "नियम" आहेत. यांचेंहि सेवन केलें पाहिजे. वरील यमांचें सेवन न करितां फक्त या नियमांचेंच सेवन करूं नये, दोहोंचेंहि सारख्या प्रमाणानें सेवन करावें. जो यम सोडून नियमांचेच पालन करतो त्याची उन्नति होत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याची संसारामध्यें अधोगति होते:—

**कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता ॥**
**काम्यो हि वेदाधिगमः कर्मयोगश्च वैदिकः ॥** मनु० २।२ ॥

"अत्यंत कामातुरता किंवा अगदीं निष्कामता कोणालाहि लाभदायक होणार नाहीं, कारण जर कामना नसेल तर वेदांचें ज्ञान व वैदिक कर्में कोणीहि करणार नाहीं."

**स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः ॥**
**महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥** मनु० २।२८ ॥

"( स्वाध्यायेन ) सकल वेदांचें अध्ययन व अध्यापन, ( व्रत ) ब्रह्मचर्य सत्यभाषणादि नियम, ( होम ) अग्निहोत्र, सत्याचें ग्रहण व असत्याचा त्याग, सत्यविद्यांचें दान ( त्रैविद्येन ) वेदांतील ज्ञान, कर्म व उपासना, ( इज्यया ) पक्षांतील इष्टी, ( सुतैः ) सुसंतानोत्पत्ति, ( महायज्ञैः ) ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ व नृयज्ञ हे पंचमहायज्ञ, ( यज्ञैः ) अग्निष्टोम व शिल्पविद्या-विज्ञानादि यज्ञ या सर्व साधनांच्या योगानें ( ब्राह्मीयंतनुः ) ब्रह्मप्राप्तीला सानुकूल असें मनुष्यशरीर तयार ( क्रियते ) केलें जातें."

**इन्द्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु ॥**
**संयमे यत्नमातिष्ठेद् विद्वान् यन्तेव वाजिनाम् ॥** मनु० २।८८॥

"ज्याप्रमाणें उत्तम सारथि घोड्याला आपल्या ताब्यांत ठेवतो, त्याप्रमाणें विद्वानानें मन व आत्मा यांनीं नीच कामांमध्यें घेऊन जाणाऱ्या विषयांत आपलीं इंद्रियें लागत आहेत, असें पाहतांच त्यांचा त्वरित निग्रह करण्याचा प्रयत्न करावा." कारण—

**इन्द्रियाणां प्रसङ्गेन दोषमृच्छत्यसंशयम् ॥**
**सन्नियम्य तु तान्येव ततः सिद्धिं नियच्छति ॥** मनु० २।९३॥

वेदास्त्यागश्च नियमाश्च तपांसि च ।
न विप्रदुष्टभावस्य सिद्धिं गच्छन्ति कर्हिचित् ॥ मनु० २।९७॥

"ज्यावेळीं जीवात्मा इंद्रियांच्या आधीन होतो तेव्हां त्याला फार दोष लागतात व जेव्हां तो इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवतो तेव्हां त्याला सिद्धि प्राप्त होतात." "दुराचारी व अजितेन्द्रिय पुरुषांनी वेदाध्ययन, दान, यज्ञ, नियम, तप व अन्य कृत्यें जरी केलीं तरी त्यांनी त्यांपासून मिळणारी सिद्धि प्राप्त होत नाहीं."

वेदोपकरणे चैव स्वाध्याये चैव नैत्यिके ।
नानुरोधोऽस्त्यनध्याये होममन्त्रेषु चैव हि ॥ १०५ ।
नैत्यिके नास्त्यनध्यायो ब्रह्मसत्रं हि तत्स्मृतम् ॥
ब्रह्माहुतिहुतं पुण्यमनध्यायवषट्कृतम् ॥ १०६ मनु० अ० २

वेदांचें व वेदांगांचें अध्ययन व अध्यापन, संध्योपासनादि पंचमहायज्ञ, होमहवन या कृत्यांना कधींहि अनध्याय-प्रतिबंध नाहीं कारण नित्यकर्मे करण्यास कधींहि अनध्याय नसतो. श्वासोच्छ्वास जसे सदासर्वदा चालू असतात त्याचप्रमाणें नित्यकर्मेंहि केलीच पाहिजेत; कोणत्याहि दिवशीं तीं सोडतां नये. जसें सदोदित अग्निहोत्रादिक कृत्यें केल्यानें पुण्य मिळतें, त्याचप्रमाणें असत्य भाषण वगैरे दोष केल्यानें सदैव पाप लागतें. म्हणून वाईट कर्माला सदैव अनध्याय व चांगल्या कर्माला सदा स्वाध्याय आहे, असें समजावें अर्थात् सत्कर्मे सदैव करीत रहावें.

अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।
चत्वारि तस्य वर्धन्ते आयुर्विद्यायशोबलम् ॥ मनु० २।१२१ ॥

"जो सदा नम्र, सुशील, विद्वान् व वृद्ध यांची सेवा करणारा असतो, त्याचें आयुष्य, विद्या, कीर्ति व बल हीं वाढतात व जो वरील प्रकारचें आचरण करीत नाहीं, त्याला वरील आयुष्यादिक फळेंहि मिळत नाहींत."

अहिंसयैव भूतानां कार्यं श्रेयोनुशासनम् ।
वाक्चैव मधुरा श्लक्ष्णा प्रयोज्या धर्ममिच्छता ॥ १५९ ॥
यस्य वाङ्मनसी शुद्धे सम्यग्गुप्ते च सर्वदा ।
स वै सर्वमवाप्नोति वेदान्तोपगतं फलम् ॥ १६० मनु० अ० २।

" विद्वान् व विद्यार्थी यांनीं वैरभाव व हिंसाबुद्धि सोडून सर्व मनुष्यांनां कल्याणकारक मार्गाचा उपदेश करावा, उपदेश करणारानें सदैव मधुर व सुशीलतायुक्त वाणीनें बोलावें. धर्माची उन्नति करण्याची इच्छा धरून सदैव सत्याप्रमाणें आचरण ठेऊन सत्याचाच उपदेश करावा. ज्या मनुष्याची वाणी व मन शुद्ध व सुरक्षित असतात, त्यालाच वेदान्तानें--अर्थात् वेदांच्या सिद्धांतानें—सांगितलेलें फळ प्राप्त होतें. "

सम्मानाद्ब्राह्मणो नित्यमुद्विजेत विषादिव ॥
अमृतस्येव चाकाङ्क्षेदवमानस्य सर्वदा ॥ मनु० २।१६२ ॥

" जो विषाप्रमाणें प्रतिष्ठेला भितो व अपमानाला अमृताप्रमाणें मानतो तोच ब्राह्मण वेद व परमेश्वर यांनां जाणूं शकतो. "

**अनेन क्रमयोगेन संस्कृतात्मा द्विजः शनैः । गुरौ वसन्संचिनुयाद् ब्रह्माधिगमिकं तपः ॥ १६४ ॥ योऽनधीत्य द्विजो वेदमन्यत्र कुरुते श्रमम् ॥ स जीवन्नेव शूद्रत्वमाशु गच्छति सान्वयः ॥ १६८ ॥**

मनु० अ० २ ॥

" याप्रमाणें उपनयनादि करून द्विज ब्रह्मचारिणीकुमारिका यांनीं हलके हलके वेदाच्या अर्थज्ञानरूपी तपाला वाढवावें. " " जो वेद न शिकतां अन्यत्र श्रम करतो, तो आपल्या पुत्रपौत्रांसह शीघ्र शूद्रत्वाला प्राप्त होतो. "

**वर्जयेन्मधु मांसं च गन्धं माल्यं रसान् स्त्रियः ॥ शुक्तानि यानि सर्वाणि प्राणिनां चैव हिंसनम् ॥ १७७ ॥ अभ्यङ्गमञ्जनं चाक्ष्णोरुपानच्छत्रधारणम् ॥ कामं क्रोधं च लोभं च नर्तनं गीतवादनम् ॥ १७८ ॥ द्यूतं च जनवादं च परिवादं तथाऽनृतम् ॥ स्त्रीणां च प्रेक्षणालम्भमुपघातं परस्य च ॥ १७९ ॥ एकः शयीत सर्वत्र न रेतः स्कन्दयेत्क्वचित् ॥ कामाद्धि स्कन्दयन् रेतो हिनस्ति व्रतमात्मनः ॥ १८० ॥**

मनु० अ० २ ॥

" मद्य, मांस, गंध, माळा, रस यांचें सेवन, स्त्रीपुरुषांचा संग, आंबट, तिखट पदार्थ, प्राण्यांची हिंसा, अंगांचें मर्दन, उपस्थेंद्रियाला स्पर्श करणें,

डोळ्यांत अंजन घालणें, उपानत् व छत्री यांचा उपयोग करणें, काम, क्रोध, लोभ, मोह, भय, शोक, ईर्ष्या, द्वेष याचा अवलंबन करणें, नाचणें, गाणें व बाजा वगैरे वगैरे वाजविणें, द्यूत खेळणें, वाईट गोष्टी, निंदा, मिथ्याभाषण, स्त्रियांना पाहणें व सान्निध्य करणें व इतर हानिकारक कुमार्ग यांचा ब्रह्मचारी व ब्रह्मचारिणी यांनीं सदैव त्याग करावा. वरील गोष्टी कधींहि त्यानीं करूं नयेत, सर्वत्र एकटें निजावें, वीर्यस्खलन कधींहि करूं नये. जो कामनापूर्वक वीर्याचें स्खलन करतो त्याचें ब्रम्हचर्य भ्रष्ट झालें असें समजावें."

## (१०) गुरुचा उपदेश.

**वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति । सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजान्ततुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् ॥ स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥ १ ॥ देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि ॥ २ ॥ यान्यस्माक ँ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि । ये के चास्मच्छ्रेया ँसो ब्राह्मणा स्तेषां त्वयाऽसनेन प्रश्वसितव्यम् । श्रद्धया देयम् । अश्रद्धया देयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविकित्सा वा स्यात् ॥ ३ ॥ ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनो युक्ता अयुक्ताः अलूक्षा धर्मकामास्स्युर्यथा ते तत्र वर्तेरन् । तथा तत्र वर्तेथाः । एष आदेशः एष उपदेशः एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपा सितव्यम् । एवमुचैतदुपास्यम् ॥ ४ ॥**

तैत्तिरीय० प्रपा० ७ अनु० ११ क० १।२।३।४॥

" आचार्यानें आपल्या शिष्यांना असा उपदेश करावा कीं, तूं खरें बोल, धर्माचरण कर, प्रमादरहित होऊन व ब्रम्हचर्याच्या नियमाचें पालन करून सर्व विद्यांचें अध्ययन कर, विद्याग्रहण झाल्यावर आचार्याला इष्ट धन दिल्यावर

विवाह करून संतानोत्पत्ति कर. चुकीनेंहि कधीं खोटें बोलूं नको, धर्माचाहि प्रमादानें त्याग करूं नको, प्रमाद करून आरोग्य व चतुराई यांचा त्याग करूं नको, उत्तम ऐश्वर्याची वृद्धि होत असतां चुकीनेंहि हानि करून घेऊं नको, प्रमाद करून अध्ययन व अध्यापन यांत विघ्न आणूं नको, विद्वान् व मातापिता यांची सेवा करण्यांत प्रमाद करूं नको, मातापिता, विद्वान् व अतिथि यांचा सत्कार कर, जीं सत्यभाषणादिक अनिंदित कर्में असतील तींच कर व मिथ्याभाषणादिक निंदित कर्में कधींहि करूं नको. आमचीं जी कांहीं धर्मयुक्त आचरणें असतील त्यांचा तुम्ही अंगिकार करा व आमचीं जी कांहीं पापाचरणें असतील तीं सोडून द्या. जो कोणी आमच्यामध्यें उत्तम विद्वान् ब्राम्हण असेल त्याच्या जवळ जाऊन तुम्हीं बसा व त्याच्यावरच विश्वास ठेवा. श्रद्धेनें द्यावें, अश्रद्धेनें द्यावें, शोभेसाठीं द्यावें, लज्जेनें द्यावें, भयानें द्यावें किंवा प्रतिज्ञेचें उल्लंघन होऊं नये म्हणून द्यावें. ज्यावेळीं तुम्हांला कर्म, शील, उपासना व ज्ञान इत्यादिकांविषयीं संशय उत्पन्न होईल, त्यावेळीं तेथें जे योगी, आर्द्रचित्त धर्मात्मे, पक्षपातरहित, विचारशील लोक असतील व ते जसे वागत असतील व सांगत असतील त्याप्रमाणें तुह्मी वागा. हीच आमची आज्ञा, हाच आमचा उपदेश व हीच वेदांतील उपनिषद् आहे. हेंच तुह्मांला उत्तम शिक्षण आहे व याचप्रमाणें तुह्मी आपलें वर्तन ठेवावें, ह्मणजे तुमचें कल्याण होईल.

" जें जें कांहीं मनुष्य करतो तें तें कांहींतरी प्रेरक इच्छेवांचून करीत नाहीं, कारण निष्काम पुरुषाचे नेत्रहि संकोच व विकास पावूं शकणार नाहींत मग त्यांकडून काम होणें तर फारच कठीण. "

अकामस्य क्रिया काचिद् दृश्यते नेह कर्हिचित् ॥ यद्यद्धि कुरुते किंचित्तत्कामस्य चेष्टितम् ॥ मनु० २।४ ॥

आचारः प्रथमोधर्मः श्रुत्युक्तः स्मार्त एव च ॥
तस्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान् द्विजः ॥ १०८ ॥
आचाराद्धि च्युतो विप्रो न वेदफलमश्नुते ॥
आचारेण तु संयुक्तः संपूर्ण फलभाग्भवेत् ॥१०९॥ मनु० अ०१॥

" वेद व वेदानुकूल स्मृतिग्रंथ यांत सांगितलेला जो आचार तोच खरा धर्म होय. ( हेंच श्रवण, मनन, अध्ययन, अध्यापन, यांचें फल आहे ) अशा

वेदप्रणित धर्माचें आचरण सर्वांनीं सर्वदा करावें. जो मनुष्य सदाचार सोडतो त्याला वेदप्रणित धर्मापासून मिळणारें सुखमय फल मिळत नाहीं; पण जो सदाचारसंपन्न असतो त्याला तें संपूर्ण फल मिळतें. ”

योऽवमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद्द्विजः ॥
स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेदनिन्दकः ॥ ११ ॥
वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ॥
एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ १२ ॥ मनु० अ० २

“ जो मनुष्य वेद व वेदानुकूल आप्तपुरुषप्रणित शास्त्रें यांचें प्रमाण मानीत नाहीं, त्यांचा अपमान करतो, तो वेदनिंदक असल्यामुळें नास्तिक आहे असें समजावें. त्याला जातींतून, पंक्तींतून किंवा देशांतून साधु--सदाचरणीपुरुषांनीं बाहेर घालवावा. ” “ वेद, वेदानुकूल आप्तपुरुषप्रणीत मनुस्मृत्यादिक शास्त्रें-सदाचारसत्पुरुषांचा आचार, जो सनातन वेदद्वारा परमेश्वरप्रणित कर्माचरण-रूप आचार तो–सदाचार, आपल्या आत्म्याला जें प्रिय अर्थात् सत्यभाषणादिक, हीं चार धर्माचीं लक्षणें आहेत, अर्थात् यां चार लक्षणांनीं धर्माविषयीं निश्चय होऊं शकतो. ” पक्षपातरहित, न्यायानुसार, असत्याला सोडून व सत्याला अनुलक्षून जो आचार असेल तोच धर्म जाणावा. व याच्या उलट अर्थात पक्षपातयुक्त, न्यायरहित, सत्याला सोडून व असत्याप्रमाणें जें आचरण असेल, तो अधर्म असें जाणावें.

अर्थकामेष्वसक्तानां धर्मज्ञानं विधीयते ॥
धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ॥ मनु० २।१३ ॥

जो पुरुष द्रव्य व विषय यांत फसलेला नसतो, त्यालाच धर्माचें ज्ञान प्राप्त होतें, ज्यांना धर्म जाणावयाचा असेल त्यांनीं वेदाच्या द्वारानें धर्म जाणावा, कारण वेदांमध्येंच धर्म व अधर्म यांचा योग्य निश्चय केलेला आहे. ”

### ( ११ ) चारहि वर्णांस शिक्षणाची आवश्यकता.

या प्रमाणें गुरूनें आपल्या शिष्याला उपदेश करावा. ज्याप्रमाणें ब्राह्मणांना विद्येची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें राजेलोक, इतर क्षत्रिय, वैश्य व उत्तम शूद्र यांना आहेच ह्मणून त्यानांहि विद्याभ्यास करूं द्यावा. केवळ ब्राह्मणांनींच विद्याभ्यास केला व इतरांनीं न केला तर राज्यरक्षण, धनसमृद्धि

वगैरे इतर वर्णांचीं कामें त्यास करतां येणार नाहींत व त्यामुळें विद्या व धर्म ही वाढणार नाहींत. ब्राह्मण तर अध्ययन, अध्यापन करून क्षत्रियादिकांकडून उपजीविका मिळवून असतात. जिविकेसाठीं क्षत्रियादिकांच्या आज्ञेप्रमाणें ते सध्यां वागत आहेत व दिवसानुदिवस पाखंडी बनत आहेत. जर क्षत्रियादिक सज्ञान व यथार्थपरीक्षक असतील तर ब्राह्मणांलाही उत्तम विद्याभ्यास करून, विद्वान् व सदाचरणी बनून राहावेंच लागेल, कारण इतर सज्ञान जातीपुढें त्यांचें पाखंड मग चालणार नाहीं. पण जर क्षत्रियादिक अविद्वान् असले, तर हे ब्राह्मण मन मानेल तसें त्यांना समजावून सांगतील व तसें त्यांच्याकडून करवून घेतील. ( ही उदाहरणें प्रत्यक्ष आहेत ) ह्मणून ब्राह्मणांला जर आपल्या कल्याणाची इच्छा असेल, तर त्यांनीं स्वतः व क्षत्रियादिकांकडून वेदाभ्यास व शास्त्राभ्यास करविणें अवश्य आहे; कारण क्षत्रियादिकच विद्या, धर्म, राज्य, लक्ष्मी इत्यादिकांची वृद्धि करणारे आहेत. त्यांनीं कधींहि भिक्षावृत्तिहि करतां नये व पक्षपातयुक्त व्यवहारहि करतां नये. ज्यावेळीं सर्व वर्ण सुशिक्षित होतील तव्हां कोणाचाहि पाखंडयुक्त मिथ्याव्यवहार चालूं शकणार नाहीं. यावरून उघड ठरतें कीं, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना उपदेश करून सुनियमांनीं चालावयास लावणारे संन्यासी व ब्राह्मण होत व तसेंच ब्राह्मण संन्यासी वगैरेनां सुनियमाप्रमाणें वर्तन ठेवण्यास लावणारे क्षत्रियादिक होत. ह्मणून सर्व वर्णांच्या स्त्रीपुरुषांनीं अवश्य विद्या शिकून धर्माचा प्रसार केलाच पाहिजे. जें जें शिकावयाचें असेल तें नीट परीक्षा करून शिकावें किंवा शिकवावें. परीक्षा पांच प्रकारानीं होत असते.

## ( १२ ) पंचविध परीक्षा.

( १ ) वेद व ईश्वराचे गुण--कर्म--स्वभाव यांनां जें अनुकूल असेल तें सत्य व त्याच्या विरुद्ध जें असेल तें असत्य समजावें.

( २ ) सृष्टिक्रमाच्या अनुकूल जें असेल तें सत्य व त्याच्या विरुद्ध सर्व असत्य, जसें " आईबापांशिवाय मुलगा झाला " असें कोणी सांगितलें तर तें असत्य आहे असें समजावें. याचप्रमाणें इतर बाबतींत जाणावें.

( ३ ) धार्मिक, विद्वान, सत्यवादी व निष्कपटी आप्त पुरुषांच्या उपदेशाला अनुकूल जें असेल तें सत्य व प्रतिकूल असेल तें असत्य समजावें.

( ४ ) आपल्या आत्म्याला पवित्रता व विद्या ह्यांस अनुकूल जें प्रिय असेल--अर्थात दुसऱ्यानें आपणाशीं जसें वागावें असें वाटत असेल तसें आपण

दुसऱ्यांशीं वागावें. आपल्याला जसें सुख दुःख होतें, तसेंच तें इतरांनांहि होतें व त्यापासून आपणास जसें बरें वाईट वाटतें, तसेंच इतरांसहि वाटतें अशा आत्मप्रिय बुद्धीनें जें योग्य तें खरें व अयोग्य तें असत्य होय.

( ५ ) प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ऐतिह्य, अर्थापत्ति, संभव व अभाव या आठ प्रमाणांनीं जें ठरेल तें सत्य व इतर असत्य आहे असें समजावें.

## ( १२ ) अष्टविध प्रमाणांची व्याख्या.

**इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारि व्यवसायात्मकं प्रत्यक्षम्** ॥ न्यायदर्शन १।१।१४॥

( १ ) " **प्रत्यक्ष प्रमाण** "—श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा व नासिका या ज्ञानेन्द्रियांचा शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या विषयांशीं संबंध होऊन व तत्कालींच इंद्रियांचा मनाशीं व मनाचा आत्म्याशीं संबंध होऊन जें ज्ञान प्राप्त होतें तें " प्रत्यक्ष " ज्ञान होय, पण तें व्यपदेश्य म्ह० संज्ञासंज्ञीच्या संबंधानें उत्पन्न होणारें नसावें. जसें:—कोणी एकानें दुसऱ्याला सांगितलें कीं, " पाणी घेऊन ये. " त्यानें त्याप्रमाणें पाणी आणून पुढें ठेवलें व म्हणाला कीं, " हें पाणी आहे " या आणलेल्या पाण्याचें ठिकाणीं " पाणी " ही अक्षरयुक्त संज्ञा पाणी मागविणारा व आणणारा पहात नसून ज्या पदार्थाची पाणी ही संज्ञा आहे तेंच प्रत्यक्ष आहे. अशा केवळ संज्ञेशिवाय द्रव्यापासून प्रत्यक्ष होणाऱ्या ज्ञानाला " प्रत्यक्ष " असें म्हणतात. शब्दापासून जें ज्ञान उत्पन्न होतें त्याचा शब्द प्रमाणांत अंतर्भाव होतो. ( अव्यभिचारि ) जसें कोणी रात्रीच्या वेळीं पुढें दिसलेल्या खांबालाच मनुष्य असें जाणलें पण दिवसा उजेडल्यानंतर मनुष्य नव्हे खांब आहे असें समजलें, या प्रकारच्या विनाशी ज्ञानाला "व्यभिचारी" ज्ञान असें म्हणतात. प्रत्यक्ष ज्ञान असें नसतें म्हणून त्याला " अव्यभिचारी " असें म्हणतात. ( व्यवसायात्मकम् ) कोणी नदीच्या वाळूच्या ठिकाणीं, दुरून बरोबर न समजल्यामुळें धोतरें आहेत अशी कल्पना करून म्हणतो कीं, "तीं पहा धोतरें वाळत घातलीं आहेत." तसेंच " हा देवदत्त उभा आहे कीं यज्ञदत्त " अशा तऱ्हेचें अनिश्चयात्मक ज्ञान हें प्रत्यक्ष नव्हे तर ज्यामध्यें व्यपदेश, व्यभिचार यांतील दोष नसून जें अव्यपदेश्य अव्यभिचारी व निश्चयात्मक ज्ञान असेल त्यालाच " प्रत्यक्ष " असें म्हणतात.

अथ तत्पूर्वकं त्रिविधमनुमानं पूर्ववच्छेषवत्सामान्यतो दृष्टं च ॥ न्यायदर्शन १।१।५॥

(२) " अनुमान प्रमाण "—प्रत्यक्षपूर्वक अप्रत्यक्षाचें ज्ञान होणें याचें नाव "अनुमान." जो पदार्थ पूर्णपणें किंवा त्याचा कांहीं अंशरूपानें पूर्वी कोणत्याहि स्थलीं किंवा कोणत्याहि कालीं प्रत्यक्ष पाहिला असेल, त्यापैकीं एखादा देश किंवा अवयव प्रत्यक्ष पाहिला असतां दुसऱ्या अदृष्ट अवयवाचें जें ज्ञान होतें तें "अनुमान" होय. जसें:—पुत्र पाहून बाप असला पाहिजे, पर्वतावर धूर पाहून अग्नि असला पाहिजे, व मनुष्याला होत असलेले दुःख पाहून पूर्वजन्म असला पाहिजे असें म्हणणें हें अनुमान समजावें. याचे तीन भेद आहेत. (१) "पूर्ववत्"—कारणाला पाहून जेथें कार्याचें अनुमान होतें तें पूर्ववत् अनुमान होय. जसें—मेघ पाहून वृष्टी होईल, विवाहित स्त्रीपुरुषें पाहून संतती होईल, शिकत असलेला विद्यार्थी पाहून तो विद्वान् होईल वगैरे. (२) " शेषवत् "—कार्याला पाहून कारणाचें ज्ञान होतें तें, जसें:—नदीचें पाणी वाढलेलें पाहून वर वृष्टी झाली असावी, पुत्राला पाहून बाप असला पाहिजे, सृष्टीला पाहून तिचें अनादिकारण व कर्ता ईश्वर असला पाहिजे, पापपुण्यांवरून सुखदुःखाचें ज्ञान इत्यादि उदाहरणें शेषवत् अनुमानाचीं आहेत. (३) " सामान्यतो दृष्ट "—दोहोंमध्यें कार्यकारण-भाव नसून साधर्म्य मात्र असतें तें " सामान्यतो दृष्ट " अनुमान होय, जसें:—चालल्याशिवाय स्थलांतर होऊं शकत नाहीं, स्थलांतर झालेलें पाहून गमनाचें अनुमान करणें हें सामान्यतो दृष्ट अनुमान जाणावें. ( **अनु अर्थात् प्रत्यक्षस्य पश्चात्—मीयते ज्ञायते येन तदनुमानम्** ) जें प्रत्यक्ष ज्ञाना-पासून उत्पन्न होतें तें अनुमान होय. धुराचें ज्ञान प्रत्यक्ष झालें तर अप्रत्यक्ष अग्नीचें अनुमान होईल. जर धुरच दिसला नाहीं तर अनुमान तरी कसलें होणार. अर्थात् अनुमानाला प्रत्यक्षाची आवश्यकता आहे.

प्रसिद्धसाधर्म्यात्साध्यसाधनमुपमानम् ॥ न्यायद० १।१।३॥

( ३ ) " उपमान प्रमाण "—प्रसिद्ध प्रत्यक्ष पदार्थाच्या साधर्म्यानें साध्य अर्थात् सिद्ध करावयाच्या पदार्थांच्या ज्ञानाची सिद्धि करण्यास जें साधन होतें तें " उपमान " होय. ( **उपमीयते येन तदुपमानम्** ) " ज्यानें उपमा दिली जाते तें उपमान. " जसें—कोणी आपल्या चाकराला

सांगितलें कीं, " तूं विष्णुमित्राला बोलावून आण " तेव्हां तो म्हणतो " मला तो माहीत नाहीं. " तेव्हा त्याला समजावें म्हणून धनी म्हणतो " जसा हा यज्ञदत्त आहे तसाच अगदीं विष्णुमित्रहि आहे. " या ठिकाणीं विष्णुमित्राला यज्ञदत्ताची उपमा दिली. त्याचप्रमाणें " गाईप्रमाणेंच नीलगाय असते. " या ठिकाणीं प्रत्यक्ष असलेल्या गाईंतील साधर्म्यानें साध्य नील गाईचें ज्ञान करून दिलें, त्यामुळें जंगलामध्यें गाई सारखाच पशु पाहून ही नीलगाय असली पाहिजे असा निश्चय करतां येईल हें उपमेनें दाखवलेल्या ज्ञानाचेंच फल आहे.

आप्तोपदेशः शब्दः ॥ न्यायद० १।१।७॥

( ४ ) " शब्द प्रमाण " पूर्ण विद्वान, धार्मिक, परोपकारी, सत्यवादी, पुरुषार्थी, जितेंद्रिय व ज्यानें आत्म्यामध्यें स्वतः अनुभव घेतला आहे व तें हितकारक आहे अशाबद्दल खात्री झाली आहे, अशाच ज्ञानाचा लोककल्याणार्थ उपदेष करणारा तो " आप्त " होय. आप्त पुरुषाला पृथिवीपासून परमेश्वरापर्यंत असणाऱ्या सर्व पदार्थांचें ज्ञान यथावत् झालेलें असतें. म्हणून अशा पुरुषांचे उपदेश प्रमाण मानावेत. तसेंच परमेश्वर हा पूर्ण आप्तपुरुष आहे. त्यानें केलेला उपदेश वेद, याला शब्द प्रमाण मानावा.

न चतुष्ट्वमैतिह्यार्थापत्तिसंभवाभावप्रामाण्यात् ॥ न्यायद० २।२।१॥

( ५ ) " ऐतिह्य प्रमाण " ( इति ह ) " असें खरोखर झालें " किंवा " असें त्यानें केलें " याप्रमाणें असलेले जे जीवनवृत्तान्त ते या प्रमाणांत होतात. " ऐतिह्य " म्हणजे " इतिहास. "

( ६ ) " अर्थापत्ति प्रमाण "—( अर्थादापद्यते सार्थापत्तिः ) केनाचिदुच्यते " सत्सुघनेषु वृष्टिः सति कारणे कार्यंभवतीति किमत्रप्रसज्यते ॥ असत्सुघनेषु वृष्टि रसति कारणे च कार्यं न भवति " । कोणी ह्मटलें कीं, ' मेघ असले तरी वृष्टि होईल, कारण असले तरच कार्य होईल " तर या ह्मणण्यावरून " मेघाशिवाय वर्षाव होणार नाहीं व कारणाशिवाय कार्य होणार नाहीं. " हा जो अर्थ निघतो त्याला " अर्थापत्ति " असें ह्मणतात.

( ७ ) " संभव प्रमाण "—( संभवति यस्मिन् स संभवः ) जें सृष्टिक्रमाप्रमाणें संभवतें तें. कोणी सांगितलें कीं, " मातापित्यावांचून संतानोत्पत्ति झाली, " " मेलेल्यांस जिवंत केलें, डोंगर उचलले " " दगड तरंगले, चंद्राचे तुकडे केले " " सर्वव्यापक परमेश्वराचा अवतार झाला. " मनुष्याला शिंग फुटलें, वंध्येला मुलगा झाला " तर या सर्व गोष्टी सृष्टिक्रमाविरुद्ध असल्यामुळें असंभवनीय आहेत. त्या प्रमाण मानूं नयेत. जी गोष्ट संभवनीय असेल तीच मानावी.

( ८ ) " अभाव प्रमाण "—( न भवति यस्मिन् सोऽभावः ) विद्यमान नसणें याचें नांव " अभाव " होय. कोणी कोणाला सांगितलें कीं, " हत्ती घेऊन ये " तर तो त्या ठिकाणीं हत्तीचा अभाव पाहून जेथें हत्ती असेल तेथून तो घेऊन येतो. याप्रमाणें हीं आठ प्रमाणें आहेत. कोणी शब्दप्रमाणांत ऐतिह्यप्रमाणाचा व अनुमानांमध्यें अर्थापत्ति, संभव व अभाव यांचा अंतर्भाव करतात, त्यांच्या मतें मुख्य चारच प्रमाणें आहेत. या प्रमाणांनीं सत्यासत्यतेविषयीं मनुष्यांनीं निर्णय करावा व सत्याचें ग्रहण करून असत्याचा त्याग करावा.

## ( १४ ) षट् तत्वांचें ज्ञान,

धर्मविशेषप्रसूतात् द्रव्यगुणकर्मसामान्यविशेषसमवायानां पदार्थानां साधर्म्यवैधर्म्याभ्यां तत्त्वज्ञानान्निःश्रेयसम् ॥

—वैशेषिक दर्शन. १।१।४

" जो मनुष्य धर्मानुष्ठानानें पवित्र होऊन " साधर्म्य " व " वैधर्म्य " यांच्या योगानें द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष व समवाय या सहा तत्वांला जाणतो—अर्थात त्यांचे स्वरूप-ज्ञान प्राप्त करून घेतो—तेव्हां त्याला " निःश्रेयस " अर्थात मोक्ष प्राप्त होतो. साधर्म्य ह्मणजे समानधर्म. जलामध्यें व पृथिवीमध्यें " जडत्व " हें साधर्म्य आहे. पण पृथिवीमध्यें " कठोरपणा " व जळामध्यें " कोमळपणा " हें वैधर्म्य आहे. " वैधर्म्य " ह्मणजे " विरुद्ध धर्म " असणें. या सहा तत्वांचें स्पष्टीकरण पुढें दिलें आहे:—

क्रियागुणवत् समवायिकारणमिति द्रव्यलक्षणम् ॥ वैशेषिक. १।१।१५॥

पृथिव्यापस्तेजोवायुराकाशं कालो दिगात्मा मन इति द्रव्याणि ॥
वैशेषिक १।१।५॥

( १ ) " द्रव्यतत्वम् "—( **क्रियाश्च गुणाश्च विद्यन्ते यस्मिन् तत् क्रिया गुणवत्** ) ज्यामध्यें क्रिया व गुण असतात, अथवा ज्यांत केवल गुण असतात त्यांना " द्रव्य " असें ह्मणावें. " पृथिवी, जल, तेज, वायु, मन व आत्मा " हीं सहा द्रव्यें क्रिया गुण यांनीं युक्त आहेत व " आकाश, काल व दिशा " हीं तीन द्रव्यें क्रियारहित व गुणयुक्त आहेत. ( **समवेतुं शीलं यस्य तत् समवायि । प्राग्वृत्तित्वं कारणं समवायिच तत् कारणंच समवायिकारणम् लक्ष्यते येन तल्लक्षणम्** ) तसेंच ज्याचा परस्पर मिळण्याचा स्वभाव असेल, तें समवायि व कार्यांचें जे पूर्वकालीं कारण असेल त्याला समवायिकारण असें ह्मणतात. हीं दोनहि द्रव्याचीं लक्षणें आहेत. " ज्याच्या योगानें लक्ष्य जाणलें जातें तें लक्षण. " या नऊ द्रव्यांचीं लक्षणें पुढें दिलीं आहेत:—

**रूपरसगंधस्पर्शवती पृथिवी ॥ वैशेषिक २।१।१।**
**व्यवस्थितःपृथिव्यां गन्धः ॥ वैशे० २।२।२।**

" रूप, रस, गंध व स्पर्श हे गुण जीमध्यें आहेत ती पृथिवी होय. " पृथिवीमध्यें जलापासून रस, अग्नीपासून रूप व वायूपासून स्पर्श असे तीन द्रव्यांपासून तीन गुण आलेले आहेत. " पृथिवीमध्यें गंध हा गुण स्वाभाविक आहे. " त्याचप्रमाणें जलामध्यें रस, अग्नीमध्यें रूप, वायूमध्यें स्पर्श व आकाशांत शब्द हे स्वाभाविक गुण आहेत.

**रूपरसस्पर्शवत्यापो द्रव्याःस्निग्धाः ॥ वैशे० २।१।२॥**
**अप्सु शीतता ॥ वैशे० २।२।५ ॥**

" रूप, रस व स्पर्श हे गुण ज्यांत आहेत व जें द्रवीभूत व स्निग्ध आहे तें " जल " होय. " जलाचा स्वाभाविक गुण रस हा आहे. रूप व स्पर्श हे अग्नि व वायूच्या योगानें आले आहेत. " जलामध्यें शीतता हा गुण स्वाभाविक आहे. "

**तेजो रूपस्पर्शवत् ॥ वैशे० २।१।३ ॥**
**स्पर्शवान् वायुः ॥ वैशे० २।१।४ ॥**

" रूप व स्पर्श हे गुण ज्यांत आहेत त्याला तेज असें ह्मणतात. " तेजामध्यें रूप हा स्वाभाविक गुण असून, स्पर्श हा वायूच्या योगानें नैमित्तिक

गुण आलेला आहे. "ज्याचा गुण स्पर्श आहे, त्याला वायु असें म्हणतात." यामध्येंहि उष्णता व शीतता हे नैमित्तिक गुण तेज व जल या तत्वांपासून उत्पन्न होतात.

त आकाशे न विद्यन्ते ॥ वैशे० २।१।५ ॥

निष्क्रमणं प्रवेशनमित्याकाशस्य लिङ्गम् ॥ वैशे० २।१।२० ॥

कार्यान्तराप्रादुर्भावाच्च शब्दः स्पर्शवतामगुणः ॥ वैशे० २।१।२५॥

"रूप, रस, गंध व स्पर्श हे चार गुण आकाशांत नाहींत." आकाशाचा शब्द हा स्वाभाविक गुण आहे. "ज्याच्या योगानें प्रवेश व बाहेर येणें ( निष्क्रमण ) होतें त्याला आकाश असें म्हणतात." तसेंच "स्पर्शगुणानें युक्त असणाऱ्या पृथिवी आदिक कार्यांमध्यें प्रगट होत नाहीं म्हणून पृथिवी आदिकांचा तो गुण नव्हे." शब्द हा आकाशाचा गुण आहे.

अपरस्मिन्नपरं युगपच्चिरं क्षिप्रमिति काललिङ्गानि ॥ वैशे २।२।६॥

नित्येष्वभावादनित्येषु भावात्कारणे कालाख्येति॥ वैशे० २।२।९॥

"ज्यामध्यें अपर, पर, ( युगपत् ) एकवार, ( चिरम् ) फार वेळ, ( क्षिप्रम् ) शीघ्र इत्यादि प्रयोग होतात, त्याला "काल" असें म्हणतात." "काल हा नित्य पदार्थांमध्यें असत नाहीं व अनित्य पदार्थांच्या कारणामध्यें असतो म्हणून त्याला काल ही संज्ञा लावतात.

इत इदमिति यतस्तद् दिश्यं लिङ्गम् ॥ वैशे० २।२।१० ॥

आदित्यसंयोगाद् भूतपूर्वाद् भविष्यतो भूताच्च प्राची ॥ वैशे०२।२।१४॥

एतेन दिगन्तरालानि व्याख्यातानि ॥ वैशे० २।२।१६ ॥

"ज्यामध्यें वर, खालीं, येथून तेथें, पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर इत्यादि व्यवहार होतात, तिला "दिशा" असे म्हणतात." "ज्या दिशेला प्रथम आदित्याचें दर्शन झालें, सध्यां होत आहे व पुढें होईल त्या दिशेला पूर्व असें म्हणतात." ज्या दिशेला सूर्यास्त होतो ती पश्चिम दिशा समजावी. पूर्व दिशेला तोंड करून उभें राहिलें असतां समोरची पूर्व, पाठीमागची पश्चिम, उजव्या हाताची दक्षिण व डाव्या हाताची उत्तर दिशा जाणावी. "यावरून इतर दिशा जाणाव्या." पूर्व व दक्षिण यांमध्यें आग्नेयी, दक्षिण व पश्चिम यांमध्यें

नैऋत्य, पश्चिम व उत्तर यांत वायव्य, उत्तर व पूर्व यांत ऐशानी याप्रमाणें उपदिशा आहेत.

इच्छाद्वेषप्रयत्नसुखदुःखज्ञानान्यात्मनो लिङ्गमिति ॥ न्यायद० १।१०॥

ज्याच्यामध्यें ( इच्छा ) प्रीति, ( द्वेष ) वैर, ( प्रयत्न ) पुरुषार्थ, सुख, दुःख व ज्ञान हे गुण आहेत, त्याला जीवात्मा असें म्हणतात. तसेंच—

प्राणापाननिमेषोन्मेषजीवनमनोगतीन्द्रियान्तर्विकाराः
सुखदुःखेच्छाद्वेषप्रयत्नाश्चात्मनो लिङ्गानि ॥ वैशे० ३।२।४॥

( प्राण ) बाहेरचा वायु आंत घेणें, ( अपान ) आंतला वायु बाहेर फेकणें, ( निमेष ) डोळे मिटणें, ( उन्मेष ) डोळे उघडणें, ( जीवन ) प्राणधारणा करणें, ( मनः ) मनन, विचार करणें, ( गति ) यथेच्छ गमन करणें, ( इन्द्रिय ) इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण करणें, ( अन्तर्विकाराः ) क्षुधा, तृषा, ज्वर, पीडा इत्यादि विकार होणें, तसेंच सुख दुःख, इच्छा, द्वेष व प्रयत्न हे गुण ज्याच्यामुळें तो आत्मा होय. असें कणाद महर्षि म्हणतात.

युगपज्ज्ञानानुत्पत्तिर्मनसो लिङ्गम् ॥ न्याय० १।१।१६॥

" एकाच वेळीं अनेक पदार्थांचें ज्ञान उत्पन्न न होणें हें मनाचें लक्षण आहे. " ज्याच्या योगानें एकाच कालीं दोन पदार्थांचें ज्ञान होत नाहीं त्याला मन असें म्हणतात. याप्रमाणें नऊ द्रव्यांचें वर्णन झालें, आतां गुणांचें वर्णन पुढें दिलें आहे.

रूपरसगन्धस्पर्शाःसङ्ख्याः परिमाणानि पृथक्त्वं संयोगविभागौ
परत्वापरत्वे बुद्धयः सुखदुःखे इच्छाद्वेषौ प्रयत्नाश्चगुणाः॥वैशे०१।१।६॥

( २ ) " गुण "—रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिणाम, पृथकत्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, ( व सूत्रांतील " च " कारामुळें समाविष्ट केलेले ) गुरुत्व, द्रव्य, स्नेह, संस्कार, धर्म, अधर्म व शब्द हे चोवीस गुण आहेत.

द्रव्याश्रयगुणवान् संयोगविभागेष्वकारणमनपेक्ष इति गुणलक्षणम् ॥

" जो द्रव्याच्या आश्रयानें असतो, ज्याला अन्य गुणांचा आश्रय नसतो, संयोग व विभाग यांना जो कारणीभूत नसतो व जो दुसऱ्या कशाची अपेक्षा करीत नाहीं, त्याला " गुण " असें म्हणतात. गुण चोवीस आहेत, ते वर

एकः पापानि कुरुते फलं भुङ्क्ते महाजनः ॥
भोक्तारो विप्रमुच्यन्ते कर्ता दोषेण लिप्यते ॥ म. भार. उद्योगप. अ ३२
मृतं शरीरमुत्सृज्य काष्ठलोष्ठसमं क्षितौ ॥
विमुखा बान्धवा यान्ति धर्मस्तमनुगच्छति ॥ मनु. ४। २४१ ॥

ज्याप्रमाणें हळू हळू प्रयत्न करून, मुंग्या वारूळ बनवितात, त्याचप्रमाणें स्त्रीपुरुषांनीं, प्रयत्न करून, कोणाल्याही पीडा न देतां परलोक अर्थात् परजन्मामध्यें सहाय्य व्हावें म्हणून, धर्माचा संचय करावा. कारण कीं, परलोकामध्यें माता, पिता, पुत्र, स्त्री व स्वज्ञातीचे लोक सहाय्य करूं शकत नाहींत. त्याला फक्त त्यावेळीं धर्मच साहाय्य करूं शकतो. पहा एकटाच उत्पन्न होतो व एकटाच मरण पावतो; व एकटाच धर्माचें किंवा अधर्माचें सुख किंवा दुःख हें फल भोगतो. हेंहि ध्यानांत ठेवावें कीं, कुटुंबांतील एक मनुष्य पाप करून धन मिळवतो व त्याचा इतर लोक उपभोग घेतात ते उपभोग घेणारे दोषाचे भागीदार होत नाहींत. पण जो अधर्म करणारा असतो त्यालाच दोषाचें फल भोगावें लागतें. जेव्हां कोणी मनुष्य मरतो तेव्हां त्याचें मातीच्या ढेकळाप्रमाणें असणारें शरीर जमिनीवर फेंकून त्याचे बंधुवर्ग विमुख होऊन मागें फिरतात. तेव्हां त्याच्याबरोबर धर्मच एकटा जातो.

तस्माद्धर्मं सहाय्यार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः ॥
धर्मेण हि सहाय्येन तमस्तरति दुस्तरम् ॥ २४२ ॥
धर्मप्रधानं पुरुषं तपसा हत किल्बिषम् ॥
परलोकं नयत्याशु भास्वन्तं स्वशरीरिणम् ॥ २४३ ॥ मनु० ४

यासाठीं परलोकीं अर्थात् परजन्मीं सहाय्य व सुख व्हावें म्हणून नित्य धर्माचा संचय करीत असावें. जीव धर्माच्याच सहाय्यानें दुस्तर दुःखसागरांतून सहज तरून जातो. जो पुरुष धर्मालाच प्रधान समजतो, ज्याचें धर्माच्या अनुष्ठानानें पाप दूर झालें आहे, त्याला त्यानें केलेला धर्म, ( भास्वन्तम् ) जो स्वयंप्रकाश आहे व ( स्वशरीरिणम् ) ज्याला आकाश हें शरीराप्रमाणें आहे अशा ( पर लोकम् ) परमदर्शनीय परमात्म्याला शीघ्र प्राप्त करून देतो. म्हणून—

दृढकारी मृदुर्दान्तः क्रूराचारैरसंवसन् ॥
अहिंस्रो दमदानाभ्यां जयेत्स्वर्गं तथा व्रतः ॥ २४६ ॥

वाच्यर्था नियताः सर्वे वाङ्मूला वाग्विनिःसृताः ॥
तान्तु यःस्तेनयेद्वाचं स सर्वस्तेयकृन्नरः ॥ २५६ ॥
नाचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः ॥
आचाराद्धनमक्षय्यमाचारो हन्त्यलक्षणम् ॥ १५६ ॥ मनु० ४

जो पुरुष प्रयत्न करणारा, कोमल स्वभावयुक्त, जितेंद्रिय, हिंसक व दुराचरणी पुरुषांपासून दूर राहणारा, धर्मात्मा, मनाला स्वाधीन ठेवणारा व विद्यादान करणारा असतो त्याला सुख प्राप्त होतें. सर्व अर्थ व व्यवहार वाणीनें निश्चित होतात, सर्वांचें मूल वाचाच आहे व तीपासूनच सर्व व्यवहार सिद्ध होतात. अशा सर्वार्थसाधक वाणीची जो चोरी करतो, अर्थात् खोटें बोलतो, तो सर्व पदार्थांची चोरी करतो असें समजावें. धर्माप्रमाणें अर्थात् ब्रह्मचर्य, जितेंद्रियता इत्यादि नियमांप्रमाणें वागलें असतां आयुष्य वाढतें, उत्तम संतति होतो, अक्षय्य धन प्राप्त होतें व धर्माचरणानें सर्व दुष्ट लक्षणांचा नाश होतो कारण—

दुराचारो हि पुरुषो लोके भवति निन्दितः ॥
दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च ॥ मनु० ४।५७

जो दुराचारी पुरुष असतो त्याची सदाचरणी लोकांत निंदा होते, तो नेहमीं व्याधिग्रस्त व दुःखित असतो व अल्पायु होतो. ह्मणून असा प्रयत्न करावा कीं,—

सुखदुःखलक्षण.

यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् ॥
यद्यदात्मवशं तु स्यात्तत्तत्सेवेत यत्नतः ॥ १५९ ॥
सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ॥
एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥ १६० ॥ मनु. ४

जें पराधीन कर्म असेल तें सोडून द्यावें व जें कर्म स्वाधीन असेल तें प्रयत्नानें करावें. कारण कीं, जी जी परवशता आहे, ती ती सर्व दुःखकारक आहे व जी जी स्वतंत्रता आहे, ती ती सर्व सुखकारक आहे. हेंच सुख व दुख यांचें लक्षण आहे.

पण कांहीं कर्तव्यें अशी असतात कीं, जीं आधीनतेनेंच केलीं पाहिजेत तीं तशीं करावीं. उदाहरणार्थ स्त्रीपुरुषांचीं परस्पर कर्तव्यें. हीं एकमेकांवर अवलंबून आहेत व तीं त्या स्थितींत प्रत्येकानें केलींच पाहिजेत. दोघांचें परस्पर प्रिय व अनुकूल आचरण झालें पाहिजे. कोणीहि व्यभिचार किंवा निषेध कर्मेंहि करतां नये. घरांतील सर्व कार्यें पुरुषाच्या आज्ञेप्रमाणें स्त्रीनें पहावीं व पुरुषानें बाहेरचीं करावीं. जेव्हां दोघांतून एक व्यसनांत पडूं लागला असेल तेव्हां त्याला उपदेश करून मागें हटवणें, हें परस्परांचें कर्तव्य आहे. दोघांनीं ध्यानांत ठेवावें कीं, विवाह झाल्याबरोबरच स्त्रीचें पुरुषावर व पुरुषाचें स्त्रीवर स्वाधीनत्व आलें. यामुळें परस्पर हावभाव करणें, किंवा परस्परांचे शरीरावर नखशिखाग्रापर्यंत जें कांहीं आहे त्यावर परस्परांची पूर्ण सत्ता असते. म्हणून पुरुषानेंहि आपल्या स्त्रीच्या विरुद्ध व तिला अप्रिय असलेलें परस्त्रीगमन किंवा वेश्यागमन व अशा सारखीं दुसरीं कोणतींहि कृत्यें करूं नयेत. त्याचप्रमाणें स्त्रीनेंहि परपुरुषगमनादि कृत्यें करूं नयेत. स्त्रीपुरुषांनीं परस्परांवर नेहमीं प्रसन्न रहावें. जे वर्णानें ब्राह्मण असतील त्यांनीं मुलांना विद्या शिकवावी व ज्या त्यांच्या सुशिक्षित स्त्रिया असतील त्यांनीं मुलींनां शिकवावें. नानाप्रकारचे उपदेश व व्याख्यानें देऊन सर्व लोकांना सुशिक्षित करावें. स्त्रियांनीं आपल्या पतीस पूजनीय देव असें मानावें. व पुरुषानें आपल्या स्त्रीस पूजनीय देवी असें मानावें. जोंपर्यंत कन्या व पुत्र गुरुकुलामध्यें राहतील तोंपर्यंत त्यांनीं आपल्या अध्यापकांस आपल्या आईबापांच्या ठिकाणीं मानावें व अध्यापकांनीं आपल्या शिष्याला आपल्या संतानाप्रमाणें मानावें.

### अध्यापक कसे असावे ?

आत्मज्ञानं समारम्भस्तितिक्षा धर्मनित्यता ॥
यमर्था नापकर्षन्ति स वै पण्डित उच्यते ॥ १ ॥
निषेवते प्रशस्तानि निन्दितानि न सेवते ॥
अनास्तिकः श्रद्धधान एतत्पण्डितलक्षणम् ॥ २ ॥
क्षिप्रं विजानाति चिरं शृणोति विज्ञाय चार्थं भजते न कामात् ॥
नासम्पृष्टो ह्युपयुङ्क्ते परार्थे तत्प्रज्ञानं प्रथमं पण्डितस्य ॥ ३ ॥
नाप्राप्यमभिवाञ्छन्ति नष्टं नेच्छन्ति शोचितुम् ॥
आपत्सु च न मुह्यन्ति नराः पण्डितबुद्धयः ॥ ४ ॥

अनृत्तवाक् चित्रकथ ऊहवान् प्रतिभानवान् ॥
आशु ग्रन्थस्य वक्ता च यः स पण्डित उच्यते ॥ ५ ॥
श्रुतं प्रज्ञानुगं यस्य प्रज्ञा चैव श्रुतानुगा ॥
असम्भिन्नार्यमर्यादः पण्डिताख्यां लभेत सः ॥६॥ भारत उद्योग प. अ. ३२

ज्याला आत्मज्ञान झालें आहे, जो उद्योगी आहे, कधींही आळस करीत नाहीं, सुख, दुःख, हानि, लाभ, मानापमान, निंदा, स्तुति यांमध्यें हर्ष किंवा शोक करीत नाहीं, नेहमीं धर्मामध्यें स्थिर असतो, व ज्याचें मन विषयसंबंधीं पदार्थांनीं आकर्षित होत नाहीं, त्याला पंडित असें म्हणतात. जो सदोदित धर्मयुक्त कामें करतो, अधर्मयुक्त कृत्यांचा त्याग करतो, ईश्वर वेद व सदाचार यांची निंदा करीत नाहीं व ईश्वरावर अत्यंत श्रद्धा ठेवतो त्याला पंडीत असें ह्मणतात. ज्याला कठीण विषय लवकर समजतो, जो पुष्कळ काळपर्यंत शास्त्रांचें अध्ययन, श्रवण व विचार करतो, जें कांहीं ज्ञान प्राप्त झालें असेल त्याचा परोपकारार्थ व्यय करतो, कोणत्याहि कामास स्वार्थानें प्रेरित होत नाहीं, कोणी न विचारतां किंवा अयोग्य वेळीं दुसऱ्याच्या कार्यांत प्रविष्ट होत नाहीं, त्याला पंडित असें ह्मणतात. जो अप्राप्य वस्तूची इच्छा करीत नाहीं, व नष्ट झालेल्याबद्दल शोक करीत नाहीं, आपत्कालीं मोह पावत नाहीं किंवा व्याकुळ होत नाहीं, त्या बुद्धिमानाला पंडित असें ह्मणतात. ज्याची वाणी विद्यांमध्यें व प्रश्नोत्तरें करण्यांत निपुण असते, जो अनेक प्रकारच्या शास्त्रप्रकरणांचें विवारण करूं शकतो, तर्क व स्मृतिग्रंथांचें जो यथार्थ व शीघ्र स्पष्टीकरण करतो त्याला पंडित असें ह्मणतात. ज्याची बुद्धि ऐकलेल्या सत्य अर्थाला अनुकूल असते, व जो केव्हांहि आर्यांचें—अर्थात् श्रेष्ठ पुरुषांच्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं, त्याला पंडित असें ह्मणतात. ज्या गुरुकुलांमध्यें असे अध्यापक असतात, तेथें विद्या, धर्म व उत्तमाचार यांची वृद्धि होते, व त्यामुळें प्रतिदिवशीं आनंद वाढत असतो.

### मुर्खांचीं लक्षणें.

अश्रुतश्च समुन्नद्धो दरिद्रश्च महामनाः ॥
अर्थांश्चाऽकर्मणा प्रेप्सुर्मूढ इत्युच्यते बुधैः ॥ १ ॥
अनाहूतः प्रविशति ह्यपृष्टो बहु भाषते ॥
अविश्वस्ते विश्वसिति मूढचेता नराधमः ॥ २ ॥
भार. उद्यो. अ. ३२.

ज्यानें कोणतेंहि शास्त्र म्हटलें नाहीं व ऐकलेंहि नाहीं, ज्याला घमेंड फार आहे, जो दरिद्री असतांहि मोठे मनोरथ करीत असतो, कर्म केल्यावांचून जो फल प्राप्त व्हावें असें इच्छितो त्याला बुद्धिमान् लोक मूर्ख असें म्हणतात. जो न बोलावतां सभेंत किंवा कोणाच्या घरीं जातो, व तेथें मोठ्या आसनावर बसतो, कोणी न विचारतांहि पुष्कळ बडबडतो, अविश्वासू मनुष्यावर विश्वास ठेवितो, त्याला मूर्ख असें म्हणतात. हा सर्व मनुष्यांत हीन योग्यतेचा समजावा. ज्या ठिकाणीं अशा तऱ्हेचे मूर्ख अध्यापक असतात, तेथील लोकांत अविद्या, अधर्म, असभ्यता, कलह, विरोध व फूट हीं वाढतात व त्यायोगानें सर्वांस दुःख भोगावें लागतें.

विद्यार्थ्यांचें लक्षण.

आलस्यं मदमोहौ च चापलं गोष्ठिरेव च ॥
स्तब्धता चाभिमानित्वं तथाऽत्यागित्वमेव च ॥ १ ॥
एते वै सप्त दोषाः स्युः सदा विद्यार्थिनां मताः ॥
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ॥ २ ॥
सुखार्थी वा त्यजेद्विद्यां विद्यार्थी वा त्यजेत्सुखम् ॥

भा. उद्यो. विदुर प्रजागर अ. ३९.

आलस्य अर्थात् शारीरिक व मानसिक जडत्व, कैफ— मद, मोह अर्थात् कोणत्याही वस्तुसंबंधानें मन फसून जाणें, अस्थिरपणा, इकडच्या तिकडच्या व्यर्थ गोष्टी करणें व ऐकणें, शिकण्या शिकवण्यांत थांबणें, अभिमान, अत्यागी अर्थात् स्वार्थी असणें हे सात दोष विद्यार्थ्यांमध्यें नसावे. जे विद्यार्थी या सात दोषांनीं युक्त असतील त्यांना विद्या येत नाहीं. चैन करण्याची इच्छा करणाराला विद्या कशी येणार ? व विद्या शिकूं इच्छिणाराला चैन कशी भोगतां येणार ? विषयसुखाची जो इच्छा करीत असेल त्यानें विद्या सोडावी व विद्या शिकणारानें विषयसुख सोडावें. याप्रमाणें चैन सोडल्यावांचून विद्या येऊं शकत नाहीं:—

पूर्णविद्वान् होण्याचा उपाय.

सत्ये रतानां सततं दान्तानामूर्ध्वरेतसाम् ॥
ब्रह्मचर्यं दहेद्राजन् सर्वपापान्युपासितम् ॥

" जे सदाचारामध्यें प्रवृत्त असतात, ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन झालीं आहेत, ज्यांचें वीर्य स्खलन झालेलें नांहीं, त्यांचेंच ब्रह्मचर्य पूर्ण होतें व तेच पूर्ण विद्वान् होऊं शकतात. " यासाठीं अध्यापक व अध्यापिका यांनीं आपलें आचरण उत्तम ठेवावें व त्यांनीं आपल्या अंगांत पंडितत्वाचीं सर्व लक्षणें वास करतील असें करावें. अध्यापक लोकांनीं आपल्या शिष्यांला असें शिक्षण द्यावें कीं, ते सत्यवादी, सत्याभिमानी, सत्यकारी, सभ्य, जितेंद्रिय, सुशील, शारीरिक बलानें युक्त, आत्मिकबलानें युक्त, सर्व वेदादिशास्त्रांमध्यें प्रवीण, सर्व उत्तम गुणांनीं युक्त होतील. अध्यापकांच्या साहचर्यानें त्यांच्यांतील कुचेष्टा नाहींशा होऊन ते विद्या शिकण्यांत व शिकवण्यांत आनंद मानणारे होतील, असें सदाचारी व दीर्घोद्योगी अध्यापक असले पाहिजेत. विद्यार्थी लोकांनींहि स्वतः जितेंद्रिय, शांत, विचारशील, प्रयत्नशील सद्गुणी व शिक्षकांवर प्रीति करणारे असें व्हावें व त्यांनीं ब्रह्मचर्यानें पूर्णायुष्य संपादन करावें, पूर्णविद्या मिळवावी, धर्माचें पूर्ण ज्ञान मिळवावें व पुरुषार्थ करण्याची इच्छा वाढवावी, इत्यादि ब्राह्मणवर्णाचीं कामें आहेत. क्षत्रियाचीं कामें पुढें राजधर्म प्रकरणांत सांगण्यांत येतील. वैश्यांचीं कर्तव्यें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत. ब्रह्मचर्याचे नियमांचें पालन करून वेदादि शास्त्रांचें अध्ययन करणें, विद्या पुरी झाल्यावर विवाह करणें, नाना देशांच्या भाषा शिकणें, नाना प्रकारच्या व्यापाराची रीति शिकणें, व्यापरांतील भाव समजून घेणें, खरेदीविक्रीच्या सर्व खुब्या शिकणें, द्वीपद्वीपांतरीं व देशदेशांतरीं जाणें येणें, लाभ व्हावा ह्मणून निरनिराळीं कार्यें आरंभणें, पशूंचें पालन करणें, शेती करणें व ती सुधारण्याचे सर्व उपाय करणें, शेती दुसऱ्यांकडून करवणें, द्रव्य वाढवणें, विद्या व धर्म याची वाढ करण्यासाठीं द्रव्याचा व्यय करणें, सत्यवादी व निष्कपटी होऊन सचोटीनें व्यापार करणें, सर्व पदार्थांचें असें रक्षण करणें कीं, त्यांतील कशाचाहि नाश न होइल. इत्यादि हीं वैश्यांचीं कर्तव्यें आहेत. शूद्र सेवा करण्यांत चतुर, पाकविद्येमध्यें निपुण, द्विजांचीं सेवा प्रेमानें करणारे असे असावे. या सेवेवर त्यांनीं आपली उपजीविका करावी. या शूद्रांला खाणें, पिणें, वस्त्रपात्र, स्थान, विवाह वगैरेसाठीं जो खर्च लागतो तो सर्व द्विजांनीं द्यावा. किंवा मासिक वेतन त्यांना द्यावें. तात्पर्य चारहि वर्णांनीं परस्परांत प्रीति, उपकार, सज्जनतापूर्वक वागावें, तसेंच सर्वांनीं सुखदुःख,

ज्ञानी, धाम वगैरे सर्वांनी ऐक्यमत्यानें राहून राज्य व प्रजा यांची उन्नति करण्यासाठी तन, मन व धन यांचा व्यय करण्यास तयार असावें.

### स्त्रिया बिघडण्याचें कारण.

पानं दुर्जनसंसर्गः पत्या च विरहोऽटनम् ।
स्वप्नोऽन्यगेहवासश्च नारीणां दूषणानि षट् ॥ मनु० ९।१३।

मद्य, भांग आदिक मादक द्रव्यांचें सेवन करणें, दुष्ट पुरुषांशीं सहवास करणें, पतीचा वियोग होणें, एकटी इकडे तिकडे ( पाखंडी किंवा ढोंगी लोकांच्या दर्शन [illegible] ) व्यर्थ फिरणें, दुसऱ्याच्या घरीं वास्तव्य करणें व तेथेंच [illegible] हे सहा प्रकार स्त्रीला दूषित करणारे आहेत. या सहा दूषणांच्या अनुरोधानें पुरुष [illegible] दूषित होतो हेंहि जाणावें. स्त्रीपुरुषांचा वियोग दोन प्रकारचा आहे. (१) कार्यार्थ देशांतरीं पुरुष जातो तेव्हां त्याचा स्त्रीशीं वियोग होतो तो साधारण वियोग [illegible] तो पुरुषानीं स्त्रिला आपल्या बरोबर घेऊन जावें हें चांगलें. कारण स्त्रीपुरुषांचा वियोग फार दिवस होणें योग्य नाहीं. (२) मृत्युनें जो स्त्रीपुरुषामध्यें वियोग होतो तो [illegible] प्रकारचा वियोग आहे असें समजावें.

### पुनर्विवाह व वियोग.

(प्रश्न) स्त्रीपुरुषांनीं पुष्कळ विवाह करावे कीं नाहीं? (उत्तर) युगपत अर्थात् एकाच समयीं स्त्रीपुरुषांनीं पुष्कळ विवाह करूं नयेत. (प्र.) काय विशिष्ट समयीं केले तर चालतील? (उ०) असें मनु म्हणतो. पहा—

सा चेदक्षतयोनिःस्याद् गतप्रत्यागतापि वा ॥
पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति ।.मनु० ९।१७६ ॥

ज्या स्त्रीचें पाणिग्रहण मात्र झालें असेल व स्त्रीपुरुष संयोग झाला नसेल, अशा अक्षत योनि विधवेचा पुनर्विवाह व्हावा हें योग्य आहे. त्याचप्रमाणें जो पुरुष अक्षतवीर्य असता विधुर झाला असेल त्यानेंहि आपला दुसरा विवाह करावा. ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य या द्विजातींनी, क्षत–योनि झाल्यावर स्त्रीनें, क्षतवीर्य झाल्यानंतर पुरुषानें पुनर्विवाह करूं नये. (प्र०) पुनर्विवाह करण्यांत दोष काय? (उ०) पाहिजे तेव्हां स्त्रीपुरुषानीं एकमेकांस सोडचिठी देऊन द्वितीय विवाह करण्यापासून परस्परांत प्रीति वाढत नाहीं, हा पहिला दोष आहे. दूसरा दोष असा कीं, जेव्हां स्त्री मेल्यानंतर पुरुष, किंवा पुरुष मेल्यावर

स्त्री पुनर्विवाह करूं लागले, तेव्हां पहिल्या स्त्रीचे किंवा पुरूषाचे सर्व पदार्थ नाहींसे केले जातात व त्यामुळें त्यांच्या कुटुंबामध्यें व संबंधी लोकांमध्यें तंटे उत्पन्न होतात. तिसरा दोष असा कीं, अशा योगानें पुष्कळ भद्रपुरूषांचें नांव, गांव, पत्ता नाहींसा होतो, कारण पुनर्विवाहानें स्त्री दुसऱ्याच्या घरीं जाते व पूर्वीच्या घराशीं तिचा कांहीं संबंध रहात नसल्यामुळें त्या पूर्वपतिच्या सर्व वस्तूंचा नाश होतो. चौथा दोष हा आहे कीं, पतिव्रता व स्त्रीव्रत हे धर्म नष्ट होतात. इत्यादि अनेक दोष उत्पन्न होतात म्हणून द्विजामध्यें क्षतयोनि स्त्रिचा व क्षतवीर्य पुरुषाचा पुनर्विवाह करीत नाहींत. (प्र.) संतान नसल्यामुळें निर्वंश होऊन कुल नष्ट होऊं लागलें तरीहि पुनर्विवाह करूं नये काय ? स्त्रीपुरुष व्यभिचार करूं लागतील व त्यामुळें गर्भपतनादि अनेक दुष्ट कृत्यें सुरू होतील, त्यापेक्षां पुनर्विवाह चांगला आहे कीं नाहीं ? ( उ० ) नाहीं. ( १ )*विधवा स्त्रीनें व त्याचप्रमाणें विधुर पतीनें आमरणान्त

---

* विधवा स्त्रियांना संन्यासदीक्षा देऊन त्या दीक्षेचें यथावत् पालन व्हावें म्हणून चार मैलांच्या आसपास वस्ती नाहीं अशा प्रकारचीं स्थलें त्या ठिकाणीं त्यांचे विधवा सन्यासाश्रम स्थापन केले व ते चालण्याकरितां त्या त्या विधवेचें जें स्त्रीधन आहे तें तिच्या स्वाधीन केलें; व त्या धनाचा उपयोग या आश्रमाकडे केला तर विधवांचें अतोनात कल्याण होईल. मनुष्याच्या मनाची स्थिति अशा आहे कीं, त्याला ज्या परिस्थितींत ठेवावें तदाकारवत् तें बनतें. म्हणून विधवा अशा ठिकाणीं ठेवून त्यांना अध्यात्मिक विद्यांचा व्यासंग ठेवला तर संसाराच्या जंजालापेक्षां त्यांना तेथें विशेष समाधान वाटेल. ४०।५० वर्षें वय झालेली विधवा व कमींत कमी १२ वर्षें अध्यात्मिक विद्येनें समाधान वृत्तीचा अभ्यास झालेली विधवा अध्यापिका व उपदेशिका बनून लोकांवर उपकार करूं इच्छित असली तर तिच्याकडून जें काम होईल तें कोणाच्यानेंही होणार नाहीं. व हा जो निरुपयोगी विधवा मनुष्यसमूह समाजामध्यें लोकांच्या तिरस्कारांत राहिलेला आहे तो मोठा आदरणीय पदवीला पावेल. समाजहितचिंतकानें याचा विचार करण्यासारखा आहे. याप्रमाणें विधुरांच्या संस्थेपासूनहि योग्य उपदेशक व अध्यापक तयार होऊं शकतील व त्यापासून जनतेला मोठा लाभ होईल. सामान्य नियम असा आहे कीं, जेव्हां कोणाही स्त्रीपुरुषांचा खास किंवा विवाक्षित मनुष्यावर असलेला प्रेमभाव नष्ट होतो तेव्हां तो सर्वांवर प्रेम करूं लागतो, याच नियमाला धरून ज्याची जगांतील प्रेमाची जागा नष्ट झाली, अशा योध्यांनीं जिवावर उदार होऊन मोठमोठे जगाला थक्क करणारे पराक्रम केलेले आहेत.

ब्रह्मचर्य धारण करून राहणें हें फारच चांगलें. त्यापासून कांहीं उपद्रव होणार नाहीं.

( २ ) ज्याला आपलें कुल नष्ट होऊं नये असें वाटत असेल तो हवा तर आपल्या वर्णांतील मुलगा दत्तक घेईल ह्मणजे कुल नाश पावणार नाहीं. ( ३ ) पण ज्यांनीं ब्रह्मचर्य पालन करणें अगदीं अशक्य आहे असें वाटत असेल, त्यांनीं नियोग करून संतान उत्पन्न करावें. ( प्र० ) पुनर्विवाह व नियोग यांत भेद काय? ( उ० ) यांत मुख्य भेद आहेत ते—( १ ) ज्याप्रमाणें विवाहित कन्या पित्याचें घर सोडून पतीच्या घरीं जाऊन राहते, व पित्याच्या घराशीं कांहीं संबंध ठेवित नाहीं त्याचप्रमाणें विधवास्त्री पुनर्विवाह झाल्यावर ती आपल्या दुसऱ्या पतीच्या घरीं जाऊन राहते. (२) पुनर्विवाहित स्त्रीचे पुत्र पुनर्विवाहित पतीच्या मालमत्तेचे हक्कदार प्रथमविवाहित स्त्रीच्या पुत्राप्रमाणेंच होतात, पण नियोग केलेल्या स्त्रीचे पुत्र मृतपतीचे वंशज समजले जातात. वीर्यदान करणाऱ्या पुरुषाचें गोत्र त्यांना प्राप्त होत नसून ते पूर्णपणें मृतपतीचे पुत्र व गोत्रज समजले जातात व ते त्याचेच दायभागी होतात व त्याच्याच घरांत राहतात. ( ३ ) विवाहित स्त्रीपुरुषांनीं परस्परांची सेवा करणें आवश्यक असतें, पण नियुक्त स्त्रीपुरुषांचा तसा कांहीं संबंध नसतो. ( ४ ) विवाहित स्त्रीपुरुषांचा संबंध मरणापर्यंत असतो पण नियुक्त स्त्रीपुरुषांचा संबंध संतानोत्पत्तीचें कार्य संपेपर्यंत असतो. ( ५ ) विवाहित स्त्रीपुरुष एकाच घरांत राहतात व तेथेंच सर्व कार्यें करतात, पण नियुक्त स्त्रीपुरुष आपआपल्या पूर्वींच्या घरींच राहतात व आपआपल्या पूर्वींच्या घरासंबंधीं सर्व कृत्यें करीत असतात. याप्रमाणें *पुनर्विवाह व *नियोगामध्यें भेद आहेत. ( प्र० ) विवाह

*विवाह, धर्माचरणानें संतानोत्पत्ति करण्याकरितां आहे. विवाह करूनहि विषयसुखोपभोगांत आसक्त राहून त्यालाच प्रधान मानणारे स्त्रीपुरुष व्यभिचारीवर्गांत गणले जातात. ज्यांना कळलें त्यांना आपत्काळीं संतानोत्पत्ति करण्याची जरूरी असली तर नियोगविधि श्रेष्ठ आहे असें वाटलेंच पाहिजे. विषयासक्तीच्या आचाराला ऊत येऊं लागल्यापासून विधुर स्थितींत राजरोसपणें विषयसुखोपभोग घेण्याची यंत्रें सदैव जवळ रहावीं या हेतूनें या पुरुषांच्या पुनर्विवाहाची शास्त्रविरुद्ध चाल रूढींत आलेली दिसते; व स्त्रियांनीं या पुरुषांना सुद्धां आचाराला आळा घालूं नये व पुनर्विवाहाचा हक्क मागूं नये. त्यांना पुरुषसत्ता न्यायानें वपन करण्यास लावून विद्रूप करून टाकण्याचा प्रघात पडलेला दिसतो. ह्मणून विवाह व नियोग हेच शास्त्रसिद्ध संतानोत्पत्तीचे आचार

व नियोग यांचें नियम एकच आहेत कीं त्यांत भिन्नता आहे? ( उ० ) [illegible] त्यांत भेद आहे. कांहीं भेद पूर्वी सांगितले आहेत व आणखी जे [illegible] येथें सांगतो. विवाहित स्त्रीपुरुषांनी फार तर दहा मुलेंच उत्पन्न करावीं असा धर्माचा नियम आहे. पण नियुक्त स्त्रीपुरुषांनी एक पती व स्त्री मिळून दोन किंवा फारतर चारच मुलें उत्पन्न करावीं या पेक्षा जास्त करूं नयेत, असा प्रतिबंध आहे. कुमार व कुमारिका यांचा जो लग्नसंबंध होतो त्यास विवाह असें म्हणतात. ( अक्षतयोनि स्त्री व अक्षतवीर्य पुरुष यांचा जो पुनः लग्नसंबंध होतो त्याला पुनर्विवाह म्हणतात ) क्षतयोनी विधवा स्त्री व क्षतवीर्य विधुर पुरुष यांचा विशिष्ट नियमांप्रमाणें संतानोत्पत्तीपर्यंत जो संबंध असतो त्यास नियोग असें म्हणतात. कुमारकुमारिकांचा नियोग होत नाहीं.

विवाहित स्त्री पुरुष ज्याप्रमाणें सदोदित एकमेकांच्या सहवासांत राहतात, त्याप्रमाणें नियुक्त पुरुषांनी राहतां नये. प्रतिमासीं [illegible] त्या दोघांचा एकत्र वास असावा. [illegible] एकत्र होऊं नये. जर स्त्रीनें आपणासाठीं नियोग केला असेल तर दुसरा गर्भ धारण झाल्या दिवसापासून नियुक्त पुरुषाशीं संबंध ठेवूं नये. जर पुरुषानें आपणासाठीं नियोग केला असल्यास [illegible] गर्भ राहिल्या दिवसापासून त्या स्त्रीशीं त्यानें संबंध ठेवूं नये. स्त्रीनें मात्र दोन तीन वर्षेपर्यंत त्या मुलाचें पालन करून नंतर ते [illegible] नियुक्त पुरुषास द्यावें. याप्रमाणें एक विधवा स्त्री विधुर पुरुषाशीं नियोग करून आपणासाठीं दोन व त्या पुरुषासाठीं जरूर असल्यास दोन याप्रमाणें चार [illegible] उत्पन्न करूं शकेल. एक विधवा स्त्री जरूर असल्यास फार तर चार नियोग करूं शकेल व त्याचप्रमाणें एक विधुर पुरुष× चार नियोग करूं शकतो. अर्थात् चार नियुक्त पुरुषापासून ती आपल्या [illegible] दहा मुलें उत्पन्न करूं शकते. दोन आपणाकरितां व चार पुरुषांकरितां प्रत्येकीं दोन दोन मिळून

( मागील पानावरून चालू )

आहेत. क्षतयोनी स्त्री किंवा क्षतवीर्य पुरुष यांचा पुनर्विवाह [illegible] त्यांना नष्ट करणारा, असें [illegible] आहे असें [illegible].

× विवाहित स्त्रीपुरुषांना दहा संतानोत्पत्तीची [illegible] संतानोत्पत्ती [illegible].

दहा संतान त्याचप्रमाणें पुरुषहि चार स्त्रियांशीं नियोग करून दहापर्यंत संतान उत्पन्न करूं शकतो असें जाणावें. पहा—

इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ॥
दशास्यां पुत्राना धेहि पतिमेकादशं कृधि ॥ ऋ मं० १०।८५।४४॥

हे ( मीढ्व इन्द्र ) वीर्य सेचन करण्यांत समर्थ व ऐश्वर्ययुक्त पुरुषा, ( इमाम् ) या विवाहित स्त्रीला व नियुक्त विधवा स्त्रीला ( सुपुत्राम् ) श्रेष्ठ पुत्रांनीं युक्त व ( सुभगाम् ) सौभाग्ययुक्त ( कृणु ) कर. हे पुरुषा ! तूं हिच्या ठिकाणीं दहा पुत्र उत्पन्न कर व नंतर अकरावी ती आहे असें समज. तसेंच हे स्त्रिये ! तूंहि या विवाहित अथवा नियुक्त पुरुषापासून दहा पुत्र उत्पन्न कर, पतीला अकरावा समज. या वेदाच्या आज्ञेप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजांतील स्त्रीपुरुषांनीं दहापेक्षां जास्त मुलें उत्पन्न करूं नयेत असें ठरलें. कारण जास्त संतती झाल्यानें ती निर्बल, निर्बुद्ध व अल्पायु होते व स्त्रीपुरुषहि निर्बल, अल्पायु व रोगी होतात व त्यांस वार्धक्यामध्यें अनेक रोग होऊन फार दुःख होतें.

प्र० हा नियोग व्यभिचारासारखा दिसत नाहीं काय ? ( उ० ) ज्याप्रमाणें अविवाहित स्त्रीपुरुषांच्या संगमाला व्यभिचार असें म्हणतात त्याचप्रमाणें अनियुक्त स्त्रीपुरुषांच्या समागमालाहि व्यभिचार असें म्हणतात. विवाहित व नियुक्त स्त्रीपुरुषांच्या समागमाला व्यभिचार म्हणत नाहींत. कारण असें शास्त्रांत आहेत. ज्याकरितां शास्त्राप्रमाणें विवाहविधि करून दुसऱ्याच्या मुलीशीं पाणिग्रहण झाल्यावर संबंध ठेवण्यास कोणासहि लज्जा वाटत नाहीं, त्याचप्रमाणें विधिपूर्वक धर्मशास्त्राप्रमाणें नियोग केल्यास त्यांत पाप किंवा लज्जा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. (प्र०) हें ठीक आहे. पण हें वेश्यागमनासारखें दिसत नाहीं काय ? (उ०) नाहीं. पहा. वेश्यागमनामध्यें निश्चित स्त्रीपुरुषांचाच संबंध नसतो, ज्याप्रमाणें विवाहामध्यें त्याचप्रमाणें नियोगामध्येंहि निश्चित स्त्रीपुरुषांचा संबंध घडत असतो. ज्याप्रमाणें विवाह केल्यानंतर आपल्या विवाहित स्त्रीशीं संबंध ठेवण्यास हरकत नाहीं, त्याचप्रमाणें नियोग केल्यावरहि स्त्रीपुरुषांना संयोग लज्जास्पद मानला जाणार नाहीं. ज्यांचा स्वभाव व्यभिचार करावयाचा असेल त्या स्त्रीपुरुषांकडून योग्य पद्धतीनें विवाह झाल्यावरहि व्यभिचार घडत असतो, तेव्हां नियोगानें असें पाप आलें पाहिजे असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. ( प्र० ) आमच्या दृष्टीनें नियोगामध्यें पाप दिसतें, तेव्हां कसें ?

( उ० ) जर आपणांस विधिपूर्वक नियोग करण्यांत पाप दिसतें तर मग आपण विवाहामध्यें कां नाहीं पाप समजत ? वैराग्यवान् व पूर्ण विद्वान् योगी यांची गोष्ट निराळी, पण साधारण जनतेच्या स्वभावाकडे व सृष्टिक्रमाकडे पाहिलें असतां नियोगाला प्रतिबंध करण्यापासून पाप घडतें असें आपणास आढळेल. गर्भपात, भ्रूणहत्या, विधवा व विधुरांपासून होणारीं अनंत संतापजनक कृत्यें हीं नियोगाला प्रतिबंध केल्यापासूनच उत्पन्न झालेलीं आहेत. जेव्हां स्त्रीपुरुषें तरुण असतात, संतानोत्पत्तीची व विषयोपभोगाची प्रबल इच्छा त्यांच्या मनांत स्फुरण पावत असते, वैधव्यानें व विधुरतेनें त्यांच्या त्या इच्छांना प्रतिबंध होऊं लागला व राज्यव्यवहार व जातिव्यवहाराच्या योगानें त्यांना त्या इच्छा सफल करून घेणें शक्य नसलें ह्मणजे गुप्तपणानें पूर्वीं लिहिलेलीं कुकर्में करून आपणावर अनेक अनर्थ ओढवून घेतात. **जे स्त्रीपुरुष विधवा व विधुर स्थितींत नियोग न करतां जितेंद्रिय राहून आपला काल धर्मार्जनांत घालवतात ते खरोखर धन्य व श्रेष्ठ होत.** पण जे या श्रेष्ठ दर्जाचे लोक नसतात व जे जितेंद्रिय राहूं शकत नाहींत, त्यांनी अक्षतयोनी स्त्री व अक्षतवीर्य पुरुष यांचा पुनर्विवाह व इतरांचा आपत्कालच्या धर्माप्रमाणें नियोग केला तर पूर्वोक्त व्यभिचार व कुकर्में कमी होतील. मनुष्यामध्यें प्रेमाची वृद्धि होऊन प्रजावृद्धि होईल, गर्भपातादि अनर्थ होणार नाहींत. नीच पुरुषांशीं उत्तम स्त्रीचा संबंध व वेश्यादि नीच स्त्रियांशीं उत्तम पुरुषाचा संबंध होण्याचें कमी होईल, कुल कलंकित होणार नाहीं, वंशाचा उच्छेद होणार नाहीं, स्त्रीपुरुषांमध्यें संताप व भ्रूणहत्या इत्यादिकुकर्में होणार नाहींत. यासाठीं विवाह व नियोग या पद्धती आवश्यक आहेत. ( प्र० ) नियोगामध्यें काय काय गोष्टी झाल्या पाहिजेत ? ( उ० ) ज्याप्रमाणें विवाह उघड होतो त्याचप्रमाणें नियोगहि प्रसिद्धपणें व्हावा. ज्याप्रमाणें विवाहामध्यें चांगल्या पुरुषांची अनुमति असते व वधू वर प्रसन्न असतात, त्याचप्रमाणें नियोगांतहि असावें. जेव्हां स्त्रीपुरुषांचा नियोग व्हावयाचें ठरेल तेव्हां त्यांनीं आपआपल्या कुटुंबांतील स्त्रीपुरुषांपुढें सांगावें कीं, “आह्मी संतानोत्पत्तीसाठीं नियोग करीत आहों, जेव्हां नियोगाचा नियम पूर्ण होईल तेव्हां आमचा परस्पर संबंध कांहीं राहणार नाहीं व जर नंतर आह्मी संबंध ठेवला, तर आह्मी पापी होऊं व राजा व ज्ञाति यांच्याकडून दंडनीय होऊं. महिन्यांतून एक वेळ ऋतुकाळींच आह्मी गर्भाधान कर्म करूं व गर्भधारणा झाल्यावर एक वर्षांपर्यंत पृथक् राहूं.”

(प्र०) नियोग आपल्या वर्णांमध्येंच व्हावा कीं अन्य वर्णांशींही व्हावा? (उ०) आपल्या वर्णांतील व आपल्यापेक्षां उत्तम वर्णस्थ पुरुषाशीं नियोग करावा. वैश्य स्त्रीनें वैश्य, क्षत्रिय किंवा ब्राह्मण पुरुषाशीं, क्षत्रिय स्त्रीनें क्षत्रिय व ब्राह्मण याशीं व ब्राह्मणीनें ब्राह्मणाशींच नियोग करावा. तात्पर्य हें आहे कीं, वीर्य आपणापेक्षां उत्तम किंवा आपल्या समान वर्णाचें असलें पाहिजे. नीच वर्णाचें असूं नये. स्त्रीपुरुषांनीं वेदोक्त धर्माप्रमाणेंच आपले विवाह व नियोग हे विधि करावे हें त्यास योग्य आहे. ( प्र० ) पुरुषाला नियोग करण्याची काय आवश्यकता आहे? कारण तो दुसरा विवाह करूं शकतो. ( उ० ) आम्ही पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, वेदादि शास्त्रांमध्यें द्विज स्त्रीपुरुषांनीं एक वेळच विवाह करावा असें आहे. त्यांनीं दुसरा विवाह करतां नये. कुमार व कुमारिका यांचा विवाह होणें हा न्याय होय; पण विधवा स्त्रीचा कुमाराशीं व कुमारीचा विधुर पुरुषाशीं विवाह होणें हा अन्याय व अधर्म आहे. ज्याप्रमाणें विधवेशीं पुरुष विवाह करूं इच्छित नाहीं त्याचप्रमाणें विधुराशीं विवाह करावा असे कुमारिकेलाहि वाटत नाहीं. ज्याअर्थीं विधवेशीं कुमार व विधुराशीं कुमारिका विवाह करूं इच्छित नाहीं त्याअर्थीं विधवा व विधुर यांमध्यें नियोग व्हावा हें उचित आहे. समान धर्मीयाशीं संबंध होणें हाच खरा धर्म आहे. ( प्र० ) ज्याप्रमाणें विवाहाविषयीं वेदादि शास्त्रांमध्यें प्रमाणें आहेत त्याचप्रमाणें नियोगाबद्दलहि आहेत काय? ( उ० ) पुष्कळ प्रमाणें आहेत. पहा—

कुहस्विद्दोषा कुह वस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः ॥
को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥

ऋ मं. १०।४०।२.

हे ( अश्विना ) स्त्रीपुरुषहो ! ज्याप्रमाणें ( देवरम् ) देवराशीं ( विधवेव ) विधवा व ( योषा ) विवाहित स्त्री ( मर्यं न ) जशी आपल्या पतीशीं ( सधस्थे ) शय्या व स्थान यांमध्यें एकत्र होऊन संतानोत्पत्ति ( आ—कृणुते ) करते त्याप्रमाणें तुम्हीहि करावें. ( कुहस्वित् दोषा ) रात्रीमध्यें कुठें ( कुह वस्तोः ) व दिवसाला कुठें असतां? ( कुहाभिपित्वं ) पदार्थांची प्राप्ति कुठें ( करतः ) केली? ( कुहऊषतुः ) कोणत्यावेळीं कोठें होतां? ( कः वां शयुत्रा ) तुमचें शयनस्थान कोठें आहे? किंवा तुम्ही कोणत्या देशांतील राहणारे आहां? या वेदमंत्रांतील प्रश्नांवरून उघड होतें कीं, स्त्री व पुरुष

यांनीं स्वदेशीं व विदेशीं एकत्र रहावें. त्याप्रमाणें विधवेनें विवाहित पतिप्रमाणेंच नियुक्त पतीला ग्रहण करून संताननोत्पत्ति करावी. ( प्र० ) या मंत्रांत देवराशीं नियोग करावा असें आहे पण जिच्या पतीला लहान भाऊ नसेल तिनें कोणाशीं नियोग करावा ? (उ०) देवर शब्दाचा तुम्हीं समजतां तसा अर्थ नाहीं, " देवरः कस्माद्द्वितीयो वर उच्यते । निरु. ३।१५॥ " द्वितीय वराला देवर असें ह्मणतात, मग तो पतीचा लहान भाऊ असो, किंवा मोठा असो, आपल्या वर्णाचा किंवा आपल्याहून उच्च वर्णाचा असो. ज्याच्याशीं नियोग होतो त्याला देवर असें ह्मणतात. तसेंच---

उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुपशेषएहि ॥
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि सं बभूथ ।

ऋ.मं.१०।१८।८

हे ( नारी ) विधवा स्त्रिये ( एतं गतासुम् ) या मेलेल्या पतीची आशा सोडून ( शेषे ) बाकी राहिलेल्या पुरुषांमधील ( अभि, जीवलोकम् ) जीवंत असलेल्या वराला ( उपैहि ) प्राप्त हो. ( उदीर्ष्व ) या गोष्टीचा विचार कर कीं, ( हस्तग्राभस्य दिधिषोः ) तुझें पाणिग्रहण करणाऱ्या नियुक्त पतीसाठीं तुझा नियोग झाला असला तर ( इदम् ) हें ( जनित्वम् ) बालक त्या नियुक्त ( पत्युः ) पतीचे होईल व जर तूं तुझ्यासाठीं नियोग करशील तर तें ( तव) तुझें होईल. हा नियम मनांत धारण कर व ( अभि, सं, बभूथ ) नियमयुक्त हो. याचप्रमाणें नियुक्त पुरुषानेंहि या नियमांचें पालन करावें. तसेंच—

अदेवृघ्न्यपतिघ्नी हैधि शिवा पशुभ्यः सुयमा सुवर्चाः ॥
प्रजावती वीरसूर्देवृकामा स्योनेममग्निं गार्हपत्यं सपर्य ।

अथर्व.कां.१४।२।१८

हे ( अपतिघ्नी ) पतीला दुःख न देणाऱ्या व ( अदेवृघ्नी ) देवराला दुःख न देणाऱ्या स्त्रिये, ( इह ) या गृहस्थाश्रमामध्यें ( पशुभ्यः ) पशूंचें ( शिवा) कल्याण करणारी, ( सुयमाः ) उत्तम प्रकारें नियमाचें पालन करणारी, ( सुवर्चाः ) सौंदर्ययुक्त व शास्त्र जाणणारी, ( प्रजावती ) उत्तम पुत्रपौत्रादिकांनीं युक्त, ( वीरसूः ) शूरवीर अशा पुत्राला उत्पन्न करणारी, ( देवृकामा ) देवराची कामना पुरी करणारी, ( स्योना ) सुख देणारी, अशी तूं पति किंवा

देवर यांना ( एधि ) प्राप्त हो व ( इमम् ) या ( गार्हपत्यं ) गृहस्थसंबंधी ( अग्निम् ) अग्निहोत्राचें ( सपर्य ) सेवन कर. तसेंच—

**तामनेन विधानेन निजो विन्देत देवरः ॥** मनु ९।६९.

जी अक्षतयोनी स्त्री विधवा झाली असेल, तिच्याशीं तिच्या पतीच्या लहान भावानें विवाह करावा. ( प्र० ) एका स्त्रीनें व एका पुरुषानें किती नियोग करावे ? व विवाहित नियुक्त पतींचीं नांवें काय ? ( उ० )—

**सोमः प्रथमो वि॑विदे गन्धर्वो वि॑विद उत्तरः ॥**

**तृतीयो अग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजाः ॥** ऋ. मं. १०।८५।४०॥

हे स्त्रिये ! जो ( ते ) तुला ( प्रथमः ) पहिला विवाहित ( पतिः ) पति ( विवेद ) प्राप्त होतो, त्याला ( सोमः ) त्याच्या ठिकाणीं सुकुमारत्वादि गुण असल्यामुळें सोम असें म्हणतात. जो तुला नियोग करून दुसरा पति ( विवेद ) प्राप्त होतो त्याला, ( गन्धर्वः ) त्याणे स्त्रीशीं पूर्वी संभोग केला असल्यामुळें, गंधर्व असें म्हणतात. जो ( तृतीय उत्तरः ) या दोघांनंतर तिसरा पति तुला मिळतो, त्याला ( अग्निः ) त्याच्या शरीरांत उष्णता फार असल्यामुळें, अग्नि असें म्हणतात. व जे ( ते ) तुला ( तुरीयः ) चवथ्यापासून अकराव्यापर्यंत पती मिळतील, त्यांना ( मनुष्यजाः ) मनुष्य असें म्हणतात. 'इमां त्वमिन्द्र०' या मंत्रावरून स्त्रीनें [illegible] नियोग करावे व त्याचप्रमाणें पुरुषानेंहि अकरा नियोग करावे [illegible]. ( प्र० ) [illegible] मंत्रांतील "एकादश" या शब्दाचा अर्थ "दहा पुत्र व अकरावा पति" असा कां समजूं नये ? ( उ० ) जर असा अर्थ केला तर "विधेव देवरम् ।" "देवरः कस्माद् द्वितीयो वर उच्यते ।" "अदेवृघ्नी" "गन्धर्वो विविद उत्तरः ।" इत्यादि वेदवाक्यांच्या विरुद्ध अर्थ होईल. कारण [illegible] असतां दुसऱ्या पतीची प्राप्ति होत नाहीं; मग "[illegible]" [illegible] अर्थ कसा होणार ? तसेंच —

[illegible] या प्रकरणांत लक्षांत ठेवण्याजोगें आहे कीं, विवाहित [illegible] [illegible] पेक्षां जास्त सन्तानोत्पत्ती करूं नये, व त्याकरितां [illegible] [illegible] ११ पेक्षां जास्त वेळां पतीला धारण करूं नये. [illegible] [illegible] आपल्याचा [illegible] आहे.

देवराद्वा सपिण्डाद्वा स्त्रिया सम्यङ् नियुक्तया ॥
प्रजेप्सिताधिगन्तव्या सन्तानस्य परिक्षये ॥ ५९ ॥
ज्येष्ठो यवीयसो भार्यां यवीयान् वाग्रजस्त्रियम् ॥
पतितौ भवतो गत्वा नियुक्तावप्यनापदि ॥ ५८ ॥
औरसः क्षेत्रजश्चैव० ॥ मनु० अ० ९ ॥ १५९ ॥

सपिंड अर्थात् पतीच्या सहा पिढ्यांमध्यें येणारा पतीचा लहान किंवा मोठा भाऊ स्वजातीय अथवा आपल्यापेक्षां उत्तम जातिस्थ पुरुष यांशीं विधवा स्त्रीचा नियोग व्हावा. विधुर व विधवा यांचा संतानोत्पत्तीसाठींच नियोग होतो. किंवा पूर्वसंतानाचा नाश झाल्यानंतर नियोग करावा. आपत्काल नसतां अर्थात् संतानादिकांची अपेक्षा नसतां केवळ विषयसुखाच्या अनावर इच्छेनें जे नियोग करतात, मोठ्या भावाच्या स्त्रीशीं लहान भावाचा किंवा लहान भावाच्या स्त्रीशीं मोठ्या भावाचा पुत्र असतांना जो नियोग केला जातो, त्या योगानें, ते सर्व पतित होतात. तसेंच नियोगाचें संतानोत्पत्ति हें कार्य संपल्यावर जे नियुक्त स्त्रीपुरुष परस्पर समागम करतात तेंहि पतित होतात. दुसरा गर्भधारण होईपर्यंतच एका नियोगाची अवधि आहे. ह्मणून गर्भ धारण झाल्यावर परस्परांनीं संबंध ठेवूं नये. व जर दोघांनीं परस्परासाठीं नियोग केला असेल तर चवथा गर्भ राहीपर्यंत समागम करावा. याप्रमाणें पूर्वोक्त पद्धतीनें वागलें असतां दहा मुलें उत्पन्न होऊं शकतात. यापुढें समागम करणें हें विषयासक्तीचें दर्शक आहे. अर्थात् त्याच्या योगानें मनुष्य पतित होतो. त्याचप्रमाणें विवाहित स्त्रीपुरुष दहापेक्षां ज्यास्त मुलें होईपर्यंत समागम करतील तर तीं कामातुर आहेत असें समजावें. तीं निंदनीय होत. अर्थात् विवाह किंवा नियोग केवळ संतानोत्पत्तिसाठींच केले जातात, पशूंप्रमाणें क्रीडा करण्यासाठीं नाहीं. (प्र०) पति मरण पावल्यावरच नियोग केला जातो कीं तो जिवंत असतानांहि करतां येतो ? ( उ० ) पति जिवंत असतानांहि करतां येतो, पण तो संतानोत्पत्तीला असमर्थ असला पाहिजे. पहा——

अन्यामिच्छस्व सुभगे पतिं मत् ॥ ऋ. मं. १०।१०।१०

जेव्हां पति संतानोत्पत्ती करण्यास असमर्थ होईल तेव्हां त्यानें आपल्या पत्नीस अशी आज्ञा करावी कीं, "हे ( सुभगे ) सौभाग्याची इच्छा करणाऱ्या स्त्रिये! तूं ( मत् ) माझ्याहून ( अन्यम् ) दुसऱ्या ( पतिम् ) पतीची ( इच्छस्व ) इच्छा कर कारण माझ्याकडून आतां संतानोत्पत्ती होणार नाहीं." अशी आज्ञा आल्यावर त्या स्त्रीनें दुसऱ्याशीं नियोग करून संतानोत्पत्ती करावी. परंतु त्या स्त्रीनें आपल्या विवाहित पतीच्या सेवेमध्यें सदैव तत्पर असले पाहिजे. याचप्रमाणें जेव्हां स्त्री रोगादि दोषांनीं ग्रस्त होईल तेव्हां तिनेंहि आपल्या पतीस असें सांगावें कीं, "हे स्वामिन् ! आपण मजकडून संतानोत्पत्तीची आशा सोडून द्या व दुसऱ्या विधवा स्त्रीशीं नियोग करून संतानोत्पत्ती करा." या कथानुसारच पूर्वी पांडु राजाच्या कुंति नामक व माद्रि नामक स्त्रियांनीं नियोग केले होते. त्याचप्रमाणें व्यास ऋषींनीं, चित्रांगद, व विचित्रवीर्य मरण पावल्यावर, आपल्या भावाच्या स्त्रियांशीं नियोग करून अंबाअंबीकेच्या ठिकाणीं धृतराष्ट्र व अंबालिकेच्या ठिकाणीं पांडु व दासीच्या ठिकाणीं विदुर याप्रमाणें पुत्र उत्पन्न केले होते. या इतिहासावरूनहि पूर्वोक्त नियोगविषयक विधान खरें ठरतें. तसेंच—

प्रोषितो धर्मकार्यार्थं प्रतीक्ष्योऽष्टौ नरः समाः ।
विद्यार्थं षड् यशोर्थं वा कामार्थं त्रींस्तु वत्सरान् ॥ ८ ॥
वन्ध्याष्टमेऽधिवेद्याब्दे दशमे तु मृतप्रजा ॥
एकादशे स्त्री जननी सद्यस्त्वप्रियवादिनी ८१ ॥ मनु. ९.

विवाहित स्त्रीनें, जर पती धर्मकार्यासाठीं विदेशीं गेला असेल तर आठ वर्षे वाट पहावी, विद्या व कीर्तीसाठीं गेला असेल तर सहा वर्षें वाट पहावी, धनासाठीं गेला असल्यास तीन वर्षें वाट पहावी व नंतर नियोग करावा व संतानोत्पत्ती करावी. जेव्हां विवाहित पति येईल तेव्हां नियुक्त पतीशीं संबंध ठेऊं नये. याचप्रमाणें वंध्या स्त्री असेल तर विवाहापासून आठ वर्षांनीं, मुलें उपजून मरत असतील तर दहा वर्षांनीं, पुत्र मुळींच होत नसतील व कन्याच मात्र होत असतील तर अकरा वर्षांनीं व अप्रिय भाषण करणारी स्त्री असेल तर तावडतोब, दुसऱ्या स्त्रीशीं नियोग करून संतानोत्पत्ती करावी. जर पुरुष अत्यंत दुःखदायक असेल तर स्त्रीनें त्याला सोडून दुसऱ्या पुरुषाशीं नियोग करून संतानोत्पत्ति करावी व त्या विवाहित पतीला दायभाग होणारीं मुलें

उत्पन्न करावी. इत्यादि प्रमाणानुसार व युक्तीला धरून स्वयंवर, विवाह व नियोग करून आपआपल्या कुलाची उन्नति करावी. विवाहित पत्नीपासून जो मुलगा उत्पन्न होतो त्याला " औरस " असें ह्मणतात. हा पित्याच्या सर्व मालमत्तेचा स्वामी होतो. नियोग करून उत्पन्न झालेल्या पुत्राला " क्षेत्रज " असें ह्मणतात. हाहि मृत पित्याचा दायभागी होतो. आता या ठिकाणीं स्त्रीपुरुषांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, आपल्या शरीरांत असलेलें रज व वीर्य अमूल्य आहेत. जे कोणी या अमूल्य पदार्थांचा, वेश्येचे संगानें किंवा दुष्ट पुरुषांच्या संगानें व्यय करतात, त्यांना महामूर्ख असें समजावें. साधारण शेतकरी किंवा माळी आपणाकडे असलेलें बीज आपल्या शेताशिवाय किंवा बागेशिवाय दुसरीकडे पेरीत नाहीं. जर तो आपलें शेत टाकून दुसरीकडे तें बीज फेकूं लागला तर त्यास मूर्ख ह्मणतात. याप्रमाणें जर साधारण मनुष्याची स्थिति आहे, तर मग जो पुरुष आपल्या शरीररूपी उत्तम वृक्षाच्या बीजाला वेश्यादिक वाईट क्षेत्रांत फेंकून देतो त्याला महामूर्ख ह्मटलें तर वावगें होणार नाहीं. कारण त्या पेरलेल्या बीजाचें फल त्यास मिळत नाहीं. पहा " आत्मा वै जायते पुत्रः । " असें ब्राह्मण ग्रंथांत सांगितलें आहे. तसेंच —

अङ्गादङ्गात्संभवसि हृदयादधिजायसे ॥

आत्मा वै पुत्रनामासि सजीव शरदः शतम् ॥ निरु० [illegible]

हे पुत्रा ! तूं प्रत्येक अंगापासून उत्पन्न झालेल्या वीर्यापासून व हृदयापासून उत्पन्न होतोस; ह्मणून तूं माझा आत्मा आहेस. माझ्यापूर्वी मरूं नको, शंभर वर्षेंपर्यंत जिवंत रहा. ज्या वीर्यापासून मोठमोठे महात्मे व महाशय उत्पन्न होतात त्या वीर्याचा वेश्यादिक दुष्ट क्षेत्रांमध्यें नाश करणें, किंवा दुष्ट बीजानें बीज-वीर्य—उत्तम क्षेत्रामध्यें पेरणें, हीं दोनहि कृत्यें फारच हानीकारक आहेत.

| प्र० | विवाह कां करावा ? विवाहाच्या योगानें स्त्री व पुरुष बंधनामध्यें पडून, दोघांलाहि फार संकोच होतो व दुःख भोगावें लागतें. ह्मणून ज्यामध्यें प्रीति उत्पन्न होईल त्यांनीं इष्ट वाटेल तोंपर्यंत एके ठिकाणीं रहावें व जेव्हां प्रीतीमध्यें बिघाड होईल तेव्हां संबंध सोडून द्यावा. असें केलें असतां बरें नाहीं काय ? ( उ० ) असें करणें हा पशुपक्षि व्यवहार आहे मनुष्यांचा नाहीं. जर मनुष्यांमध्यें विवाहाचा निर्बंध राहणार नाहीं तर गृहस्थाश्रमांतील उत्तम उत्तम व्यवहार नष्ट भ्रष्ट होऊन जातील. वृद्धावस्थेमध्यें कोणी कोणाची सेवा करणार

नाहीं. सर्वत्र व्यभिचार वाढून सर्व लोक रोगी, निर्बळ व अल्पायु होतील व शीघ्र नामशेष होऊन जातील. कोणी कोणाला भिणार नाहीं व कसलेंहि कृत्य केलें तरी कोणाला लज्जा वाटणार नाहीं, व अनाचार फार वाढला जाऊन सर्व कुळें नष्ट होऊन जातील. कोणी कोणाच्या पदार्थांचा हक्कदार होणार नाहीं व कोणाचेंहि कोणच्याहि पदार्थावर दीर्घकालपर्यंत स्वत्व राहणार नाहीं. इत्यादि दोष उत्पन्न होऊं नयेत म्हणून विवाह नियमानुसार व्हावे हें उचित आहे. (प्र०) विवाह एकदांच केला तर एका पुरुषाला एक स्त्री व एक स्त्रीला एक पुरुष याप्रमाणें ठीक व्यवस्था होईल हें खरें पण जर दोहोंतून एक दीर्घरोगानें ग्रस्त झालें व दुसऱ्यांची युवावस्था असली तर त्यानें काय करावें ? किंवा स्त्री गर्भवती असेल तर पुरुषानें काय करावें ? (उ०) याचें प्रत्युत्तर नियोग विषयाचे वेळीं पूर्वीच दिलें आहे. स्त्री गर्भवती असतां एक वर्षापर्यंत समागम करूं नये. त्याचप्रमाणें स्त्रीपुरुषांमध्यें जर कोणी दीर्घरोगानें ग्रस्त होईल तर त्याशींहि इतरानें समागम करूं नये. अशा स्थितींत जर त्या विषयासक्तांना स्वस्थ राहणें शक्य नसलें तर पूर्वोक्त पद्धतीप्रमाणें नियोग करावा. परंतु वेश्यागमन अथवा व्यभिचार करूं नये. असो.

अप्राप्त धनाची मनुष्यांनीं इच्छा करावी, मिळविलेल्याचें रक्षण करावें, राखलेल्याची वाढ करावी, व अशा रीतीनें वाढलेल्या धनाचा देशोपकारार्थ कामीं खर्च करावा. सर्वप्रकारच्या आपआपल्या वर्णाश्रमसंबंधीं व्यवहार, उत्साह प्रयत्नपूर्वक करून, तन, मन व धन यांच्या योगानें सर्वदा परोपकार करावा. आपल्या माता, पिता, सासु, श्वशुर यांची शुश्रूषा करावी; तसेंच आपले मित्र, शेजारी, संबंधी, राजा, विद्वान्, वैद्य व सत्पुरुष यांच्यावर प्रीति करावी. दुष्ट व अधर्मी लोकांचा द्वेष न करतां त्यांविषयीं उदास रहावें व त्यांची सुधारणा होईल असा यत्न करावा. शक्य असेल त्याप्रमाणें मुलांला विद्वान् बनविण्यासाठींच आपल्या धनादि पदार्थांचा व्यय करून त्यांस विद्वान् व सुशिक्षित करावें. आपण धर्मयुक्त व्यवहार करून मोक्षाचें साधन करीत असावें. असें वागलें असतां परम आनंदाची प्राप्ति खात्रीनें होईल. तसेंच पुढें लिहिल्याप्रमाणें जे श्लोक असतील ते कोणींहि प्रमाण मानूं नये:—

पतितोऽपि द्विजः श्रेष्ठो न च शूद्रो जितेन्द्रियः ॥
निर्दुग्धाचापि गौः पूज्या न च दुग्धवती खरी ॥

**अश्वालम्भं गवालम्भं संन्यासं पलपैत्रिकम् ॥**
**देवराच्च सुतोत्पत्तिं कलौ पञ्च विवर्जयेत् ॥**
**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ॥**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**

हे कपोलकल्पित पाराशरीचे श्लोक आहेत. दुष्टकर्म करणारा द्विज श्रेष्ठ व सत्कर्म करणारा शूद्र नीच मानणें यापेक्षां दुसरा जास्त अन्याय, व अधर्म कोणता असणार? दुध देणारी व न देणारी अशा दोनहि प्रकारच्या गाईवर गोपालांचें प्रेम सारखेंच असतें काय? ते दोघांचें पालन सारखेंच करतात काय? कुंभार लोक गाढवें पाळीत नाहींत काय? गाय व गाढवी यांमध्यें जसा भेद आहे त्याप्रमाणें द्विज, शूद्र यांमध्यें नसल्यामुळें हा दृष्टांतहि विषम आहे. कदाचित् द्विज व शूद्र जसे एका मनुष्य जातींत आहेत त्याचप्रमाणें गाय व गाढवी हि एकाच पशुजातींत आहेत असें मानल्यास एकांशामध्यें दृष्टान्त व दार्ष्टांत हे मिळतात, तथापि यांचा आशय अयोग्य व अधर्म वाढवणारा असल्यामुळें असले श्लोक विद्वानांनीं मानण्यास योग्य नाहींत.

( अश्वालम्भ ) घोडा मारून त्याचा होम करणें, ( गवालम्भ ) गाय मारून त्याचा त्याचा होम करणें हीं कर्में वेदविहित नाहींत, ह्मणून त्याचा कलियुगापुरताच निषेध करणेंहि वेदविरुद्धच समजावें. जर कलियुगांमध्यें यांचा निषेध केला तर कृतत्रेतादि युगांमध्यें त्यांचा विधि होईल. अशीं दुष्ट कामें श्रेष्ठ युगामध्यें होणें सर्वथा असंभवनीय आहे. वेदादि शास्त्रांमध्यें संन्यास धारण करण्याचा विधि आहे, ह्मणून त्याचा निषेध करणें असमंजसपणाचें आहे. मांसाचा निषेध सर्व काळीं सारखाच आहे. देवरापासून पुत्रोत्पत्ति करणें हें वेदांमध्यें सांगितले आहे, त्याचा निषेध करण्याचा या श्लोककर्त्यास मुळींच अधिकार नाहीं.

( प्रश्न ) ( नष्टे ) पती देशदेशांतरीं गेला असतां घरीं स्त्रीनें नियोग करावा काय? जर अशा रीतीनें नियोग केला व पती घरीं आला तर ती स्त्री कोणाची समजावी? आपण विवाहित पतीची असें ह्मणाल तर तें खरें, पण असें पराशरीमध्यें कोठेंहि ह्मटलें नाहीं. ( उत्तर ) या श्लोकांत लिहिलेले पांचच आपत्काल स्त्रीला येणें शक्य आहेत, आणखी नाहींत? लढाईमध्यें पती

मरणें, रोगानें ग्रस्त होणें हे आपत्ती आतांकाल नाहींत काय ? यांची गणना आहे कोठें ? म्हणून असले श्लोक प्रमाण मानण्यास योग्य नाहींत.

( प्र० ) तुम्ही पराशर मुनींचें वचनहि मानीत नाहीं काय ? ( उ० ) कोणाचेंहि वचन जर तें वेदविरुद्ध असेल तर आम्ही मानीत नाहीं. हें तर पराशरांचें वचनहि नाहीं. पुष्कळ ढोंगी लोक " ब्रह्मोवाच, वसिष्ठ उवाच, राम उवाच, शिव उवाच, विष्णुरुवाच, देव्युवाच " याप्रमाणें श्रेष्ठांचें नांव घालून ग्रंथरचना करतात, ती याकरतां कीं, ते आपले ग्रंथ सर्वमान्य होऊन संसारभर त्यांचा प्रसार व्हावा व त्यायोगानें आपली उपजीविका उत्तम प्रकारें चालावी. या स्वार्थमय बुद्धीनें हे अनर्थकारक गाथाग्रंथ बनवितात; सर्व स्मृतींमध्यें मनुस्मृतीच—कांहीं प्रक्षिप्त श्लोक खेरीज करून वेदानुकूल आहे. अन्य स्मृती तशा नाहींत. याप्रमाणेंच अन्य भ्रमजाल वाढवणाऱ्या ग्रंथांविषयीं जाणावें.

( प्र० ) गृहस्थाश्रम सर्वांत श्रेष्ठ आहे कीं नाहीं ? ( उ० ) आपापल्या कर्तव्याच्या मानानें सर्व आश्रम श्रेष्ठच आहेत, परंतु:—

यथा नदीनदाः सर्वे सागरे यान्ति संस्थितिम् ॥
तथैवाश्रमिणः सर्वे गृहस्थे यान्ति संस्थितिम् ॥ म० ६।९० ॥
यथा वायुं समाश्रित्य वर्तन्ते सर्वजन्तवः
तथा गृहस्थमाश्रित्य वर्तन्ते सर्व आश्रमाः ॥ ७७ ॥
यस्मात्त्रयोप्याश्रमिणो दानेनान्नेन चान्वहम् ॥
गृहस्थेनैव धार्यन्ते तस्माज्ज्येष्ठाश्रमो गृही ॥ ७८ ॥
स संधार्यः प्रयत्नेन स्वर्गमक्षय्यमिच्छता ॥
सुखं चेहेच्छता नित्यं योऽधार्यो दुर्बलेन्द्रियैः ७९ ॥मनु० अ० ३।

ज्याप्रमाणें समुद्र मिळेपर्यंत नदी व नद भ्रमण करीत असतात व समुद्र मिळाल्या असतां त्याच्या आश्रयानें स्थिर होतात, त्याचप्रमाणें गृहस्थाच्या आश्रयानें इतर आश्रम स्थिर होतात. गृहस्थाच्या सहाय्यावांचून कोणाचेंहि व्यवहार नीट चालत नाहींत. ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यासी या तीनहि आश्रमांतील माणसांना गृहस्थच प्रतिदिवशीं अनेक पदार्थांचें व अन्नादिकांचें दान करून त्यांचे पोषण व धारण करतो, म्हणून गृहस्थाश्रम हाच सर्वांत

श्रेष्ठ व धुरंधर आहे, ह्मणून मोक्षाची व संसारसुखाची इच्छा करणारानें प्रयत्नानें गृहस्थाश्रमाचें अवलंबन करावें.

दुर्बलेंद्रिय, भीरु व निर्बल पुरुष या गृहस्थाश्रमाचें धारण करूं शकत नाहींत. ज्याला हा स्वीकारावयाचा असेल त्यानें उत्तम धारण व पालन करावें. या सर्व संसारामध्यें जो कांहीं व्यवहार आहे तो सर्व गृहस्थाश्रमावर अवलंबून आहे, जर गृहस्थाश्रम नसता तर संतानोत्पत्ति न झाल्यामुळें ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास हे कसे साधले असते ? जो गृहस्थाश्रमाची निंदा करतो तोच निंदनीय समजावा व जो प्रशंसा करीत असेल तो प्रशंसनीय समजावा. जेव्हां स्त्री व पुरुष हीं दोघेंहि परस्परांवर प्रसन्न, विद्वान, पुरुषार्थी व सर्व प्रकारच्या व्यवहारांला जाणणारीं असतील, तेव्हांच गृहस्थाश्रम सुखदायक होतो. गृहस्थाश्रमामध्यें सुख व्हावें अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं प्रथमतः ब्रह्मचर्य पालन करावें व नंतर स्वयंवर विवाह करून गृहस्थी व्हावें.

याप्रमाणें संक्षेपानें समावर्तन, विवाह व गृहस्थाश्रम यांविषयीं विवरण झालें; यापुढें वानप्रस्थ व संन्यास या दोन आश्रमांविषयीं लिहावयाचें.

इति सुभाषाविभूषितः समावर्तन–विवाह–गृहस्थाश्रम–विषये
चतुर्थः समुल्लासः संपूर्णः ॥ ४ ॥



घेऊन, जितेन्द्रिय बनून अरण्यांत जाऊन रहावें. ॥ ४ ॥ ऋषि, मुनि भक्षण करतात त्या नानाप्रकारच्या पवित्र अन्नाच्या योगानें व सुंदर शाक, मूळ, फल, फूल व कंद वगैरे प्रकारच्या अन्नानें पंचमहायज्ञ करावें याच अन्नानें अतिथींची सेवा करावी व स्वतःचा निर्वाहहि त्यानेंच करावा. ॥ ५ ॥

**स्वाध्याये नित्ययुक्तः स्याद्दान्तो मैत्रः समाहितः**
**दाता नित्यमनादाता सर्वभूतानुकम्पकः ॥ ८ ॥**
**अप्रयत्नः सुखार्थेषु ब्रह्मचारी धराशयः ॥**
**शरीरेष्वममश्चैव वृक्षमूलनिकेतनः ॥ २६ ॥** मनु० ॥६ ॥

स्वाध्यायामध्यें-शिकण्याशिकवण्यामध्यें-सदोदित तत्पर, आत्मसंयमन करणारा, सर्वांचा मित्र, इंद्रियांचें दमन करणारा, विद्येचें दान करणारा, सर्वांवर दया करणारा व कोणाकडून कांहींहि न घेणारा, अशा प्रकारें वानप्रस्थाश्रमी मनुष्यानें वागावें. ॥ ८ ॥ शरीरसुखासाठीं फार आयास करूं नयेत, ब्रह्मचारी रहावें, स्त्री आपणाजवळ असली तरींहि विषयचेष्टा करूं नयेत. भूमीवर निजावें. आपल्या शरीरावर व त्याचप्रमाणें शरीराच्या आधारानें असणाऱ्या इतर पदार्थांवर ममत्व ठेवूं नये. वृक्षाच्याखालीं वास करावा. ॥ २६ ॥ तसेंच—

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यं चरन्तः ॥**
**सूर्यद्वारेण ते विरजाःप्रयान्ति यत्रामृतःसपुरुषो ह्यव्ययात्मा॥**मुण्ड० २११

जे शान्त व विद्वान् लोक वनांमध्यें राहून, तप व धर्मानुष्ठान करून व सत्यावर श्रद्धा ठेवून, भिक्षावृत्तीचा अवलंब करून वनामध्यें रहातात, ते त्या ठिकाणीं निर्मल होऊन प्राणाच्या द्वारानें अविनाशी, हानिलाभरहित, पूर्णपुरुष अशा परमात्म्याला प्राप्त करून घेऊन आनन्दित होतात. तसेंच—

**अभ्यादधामि समिधमग्ने व्रतपते त्वयि ॥**
**व्रतञ्च श्रद्धां चोपैमीन्धे त्वा दीक्षितो अहम् ॥** यजु० २०२४॥

वानप्रस्थाश्रमांतील मनुष्यानें असें म्हणावें कीं, “ हे ( व्रतपते अग्ने ) अग्निहोत्राला साधनीभूत असणाऱ्या अग्ने ! ( त्वयि ) तुझ्यामध्यें अर्थात् अग्नीमध्यें ( समिधम् ) हवनीय पदार्थांचा ( अभ्यादधामि ) होम करून, ( अहम् ) मी ( दीक्षितः ) दीक्षित होऊन ( व्रतम् ) सत्याचरणरूपी व्रत व

( श्रद्धाम् ) श्रद्धा यांना ( उपैमि ) प्राप्त होईन." अर्थात हवन करून मी दीक्षित होईन व सत्याचरण आणि श्रद्धा यांना प्राप्त करून घेईन. अशी इच्छा वानप्रस्थी मनुष्यानें धरावी. नानाप्रकारची तपश्चर्या करून, सत्संग करून, योगाभ्यास करून, सुविचार मनांत बाळगून, ज्ञान व पवित्रता प्राप्त करून घ्यावी. नंतर जेव्हां संन्यास घेण्याची इच्छा होईल तेव्हां स्त्रीला पुत्रांकडे पाठवून देऊन आपण संन्यास घ्यावा. याप्रमाणें हें संक्षेपानें वानप्रस्थाश्रमाचें व्याख्यान झालें.

अथ संन्यासविधिः ।

वनेषु च विहृत्यैवं तृतीयं भागमायुषः ॥
चतुर्थमायुषो भागं त्यक्त्वा संगान् परिव्रजेत् ॥ मनु० ६।३३ ॥

याप्रमाणें वनामध्यें आयुष्याचा तिसरा भाग— पन्नासाव्या वर्षापासून ७५ वर्षांचें वय होईपर्यंत—वानस्थाश्रमाप्रमाणें घालवून चवथ्या आयुष्याच्या भागामध्यें सर्व-संग-परित्याग करून परिव्राट् अर्थात् संन्यासी व्हावें. ( प्र० ) गृहस्थ व वानप्रस्थ या आश्रमांचा स्वीकार न करतां, एकदम ब्रह्मचर्यांतूनच संन्यास घेतला तर पाप लागतें किंवा कसें? ( उ० ) केव्हां लागतें व केव्हां नाहीं. ( प्र० ) हें कसें? ( उ० ) जे ब्रह्मचर्यांतूनच एकदम विरक्त होतात ते जर कांहीं कारणानें विषयामध्यें फसले तर ते महापापी होतात, व जर ते न फसले तर महान्पुण्यात्मे व सत्पुरुष समजले जातात.

**यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत्, वनाद्वा गृहाद्वा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत्॥**

हें ब्राह्मणग्रंथांतील वचन आहे. " ज्या दिवशीं वैराग्य प्राप्त होईल त्याच दिवशीं गृहस्थाश्रमांतून किंवा वानप्रस्थाश्रमांतून संन्यास घ्यावा." या वचनांत प्रथमतः वनांतूनच संन्यास घ्यावा असें सांगून नंतर पाहिजे त्या आश्रमांतून घ्यावा असा विकल्प सांगितला आहे. ( १ ) वानप्रस्थानंतर संन्यास घ्यावा, ( २ ) गृहस्थाश्रमांतूनही संन्यास घ्यावा; ( ३ ) तसेंच जो पूर्ण विद्वान, जितेन्द्रिय व विषयोपभोगाची इच्छा न धरणारा असेल त्यानें, परोपकाराच्या इच्छेनें युक्त होऊन ब्रह्मचर्याश्रमांतूनहि संन्यासाचें ग्रहण करावें. याचप्रमाणें वेदामध्येंहि " यतयः, ब्राह्मणस्य विजानतः " इत्यादि पदांनीं संन्यासाचें ग्रहण केलेलें आहे. पण—

**नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः ॥**

**नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥** कठ. व० २।२३

ज्यानें दुराचरण सोडले नाहीं, ज्याला शांति मिळाली नाहीं, ज्यानें योग साधला नाहीं, ज्याचें मन शांत नाहीं त्यानें संन्यास घेतला तरीहि, प्रज्ञाच्या योगानें त्याला परमात्मा प्राप्त होत नाहीं. ह्मणून:—

**यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञस्तद्यच्छेद् ज्ञान आत्मनि**

**ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छान्त आत्मनि ॥**कठ.व० ३।१२

बुद्धिमान् संन्याशानें वाणि व मन यांला अधर्मापासून परावृत्त करून, त्यांला ज्ञान व आत्मा यांच्या ठिकाणीं लावावें. व त्या ज्ञान व आत्मा यांना परमात्म्यामध्यें एकाग्र करावें. या योगानें प्राप्त होणारें विज्ञान आपल्या शान्तस्वरूप आत्म्यामध्यें स्थिर करावें. तसेंच—–

**परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायान् नास्त्यकृतः कृतेन ॥**

**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥**

मुंड० २।१२

सर्व लौकिक भोगकर्मांनें संचित झालेले आहेत असें पाहून ( ब्राह्मणः ) संन्याशाला वैराग्य प्राप्त होतें. कारण ( अकृत )—न केलेला असा—परमात्मा ( कृतेनें ) केवळ कर्मांच्या योगानें प्राप्त होत नाहीं. ह्मणून तो गुरूला अर्पण करण्यासाठीं कांहीं पदार्थ हातांत घेऊन, वेद व परमेश्वर यांना जाणणाऱ्या गुरू जवळ, परमेश्वरासंबंधी विज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं जातो व सर्व संदेहांची निवृत्ति करून घेतो. विज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं पुढील प्रकारच्या मनुष्यांची संगति सोडून द्यावी:—–

**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितं मन्यमानाः**

**जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥८॥**

**अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः ॥**

**यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात् तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥९॥**

प्रथम मुंड० खं० २॥

जे अविद्येच्या आत राहूनहि आपण धीर व पंडित आहोंत असें समजतात ते मूढ नीच गतीला प्राप्त होतात. आंधळ्यांच्या आश्रयानें जाणारे आंधळे

त्याप्रमाणें खड्यांत पडतात. त्याप्रमाणें त्यांची स्थिति होते, जे मूढ बहुधा अविद्येमध्यें असतांहि आपण कृतार्थ आहोंत असें अभिमानानें ह्मणतात ते त्याला केवळ कर्मकांडी लोक रागद्वेषानें मोहित होऊन समजूं किंवा समजावूं शकत नाहींत त्यापासून च्युत होऊन व वारंवार दुःखित होऊन जन्ममरणरूप दुःखामध्यें पडतात. ह्मणून—

वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।
ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताःपरिमुच्यन्ति सर्वे ॥ तृतीय मुंड० २।६

जे लोक ( वेदान्त० ) परमेश्वरप्रतिपादक वेदमंत्रांचा अर्थ पूर्णपणें जाणतात व निश्चयानें सदाचाराप्रमाणें वागतात व संन्यासयोगानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे, तेच खरे संन्यासी होत, ते परमेश्वरामध्यें असलेल्या मुक्तीच्या आनंदाला प्राप्त करून घेऊन, जेव्हां मुक्ती सुखाची अवधि पूर्ण होते, तेव्हां तेथून सुटून संसारामध्यें पुनः येतात, मुक्ति प्राप्त झाल्याशिवाय दुःखाचा नाश होत नाहीं. यथा—

न वै सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोरपहतिरस्त्य
शरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥ छान्दो० ८।१२

जो देहधारी जीव असतो तो सुखदुःखांच्या प्राप्तिपासून निराळा राहूं शकत नाहीं, पण मुक्तिमध्यें जेव्हां जीवात्मा शरीररहित होऊन व शुद्ध होऊन परमेश्वराच्या सन्निद्ध जाऊन राहतो तेव्हांच त्याला सांसारिक सुखदुःखांची प्राप्ती होत नाहीं, ह्मणून—

पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च
व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ॥ शत० ब्रा० १४।५।२।१

पुत्र होण्याची इच्छा, धनदौलत मिळण्याची इच्छा, लोकांकडून मान मिळण्याची इच्छा या सोडून, संन्यासी लोक भिक्षावृत्तीचा अवलंब करून रात्रंदिवस मोक्षाच्या साधनांमध्यें तत्पर असतात, तसेंच—

प्राजापत्यां निरूप्येष्टिं तस्यां सर्ववेदसं हुत्वा ब्राह्मणः प्रव्रजेत् ॥
यजुर्वेद ब्राह्मण. ॥

( प्राजापत्याम् ) प्रजापति परमेश्वराची प्राप्ति व्हावी ह्मणून ( इष्टि ) यज्ञ करून, त्यांत यज्ञोपवीत, शिखा वगैरे चिन्हांचा त्याग करून आह-

जीवनहि होणें अशक्य आहे; ह्मणून आदिसृष्टीमध्यें जीवाच्या शरीरांचे साचें बनवणें ईश्वराधीन आहे. नंतर त्यांपासून पुत्रादिकांची उत्पत्ति करणें जीवाचें आहे. ( **नास्तिक** ) जर परमात्मा शाश्वत अनादि चिदानंदस्वरूप आहे तर तो जगत् प्रपंच व दुःख यांत कां पडला ? आनंद सोडून दुःखाचें ग्रहण करणें हें सामान्य मनुष्यहि करील नाहीं. मग तें परमेश्वरानें कां केलें ? ( **आस्तिक** ) परमात्मा कोणत्याही प्रपंचामध्यें किंवा दुःखांत पडत नाहीं व आपल्या आनंदाला सोडीतहि नाहीं, कारण प्रपंचांत पडणें हें जो एकदेशी असेल त्यालाच शक्य असतें सर्व व्यापकाला नाहीं. जर अनादि, चिदानंद, व ज्ञानस्वरूप परमात्मा जगताला बनवणार नाहीं तर त्याला अन्य कोण बनविणार ? जगत् बनवण्याचें जीवामध्यें सामर्थ्य नाहीं व जडामध्यें स्वतःच बनण्याचें सामर्थ्य नाहीं. यावरून हें सिद्ध झालें कीं, परमात्माच जगताला बनवितो व सदा आनंदांत राहतो. ज्याप्रमाणें परमात्मा परमाणूंपासून सृष्टि करतो, त्याचप्रमाणें मातापितारूप निमित्त कारणाच्या योगानें उत्पत्ति होण्याच्या व्यवस्थेचा नियम त्यानें केला आहे. ( **नास्तिक** ) ईश्वर मुक्तिरूप सुख सोडून जगताची सृष्टि करणें, धारण करणें व प्रलय करणें हे बखेडे करण्यांत तो कां पडला ? ( **आस्तिक** ) ईश्वर सदामुक्त असल्यामुळें, साधनांनीं सिद्ध झालेल्या तुमच्या तीर्थंकरांप्रमाणें, एकदेशामध्यें राहणाऱ्या बंधपूर्वक मुक्तीनें युक्त, सनातन परमात्मा नाहीं जो अनंतस्वरूप गुणकर्मस्वभावयुक्त परमात्मा आहे, तो या अल्प जगताला बनवितो, धारण करतो व प्रलय करतो पण तो बंधांत कधींहि पडत नाहीं; कारण बंध व मोक्ष हे सापेक्षत्वानें आहेत. मुक्तीच्या अपेक्षेनें बंध व बंधाच्या अपेक्षेनें मुक्ति होत असते. जो कधींहि बद्ध नव्हता त्याला मुक्त असें कसें ह्मणतां येईल ? जे एकदेशी जीव असतात तेच बद्ध व मुक्त होत असतात. अनंत, सर्वदेशी, सर्वव्यापक ईश्वर बंधन व नैमित्तिक मुक्तीच्या चक्रामध्यें तुमच्या तीर्थंकरांप्रमाणें, कधींहि पडत नाहीं. ह्मणून त्या परमात्म्याला सदैव मुक्त असें ह्मणतात. ( **नास्तिक** ) जीवांनां कर्मांचे फल आपोआपच भोगावें लागेल, जसें भांग प्यालें असतां तिचा मद आपोआपच येतो. त्यांत ईश्वराचें कांहींच काम नाहीं. ( **आस्तिक** ) ज्याप्रमाणें राजावांचून चोर, डाकू, लंपट, दुष्ट मनुष्य स्वयमेव फांशी किंवा कैद होत नाहींत किंवा होऊं इच्छित नाहींत, पण राजाच्या राजनीतीच्या न्यायव्यवस्थानुसार बलात्कारानें पकडून यथोचित दंड राजा त्याला

देतो, त्याचप्रकारें ईश्वर आपल्या न्यायव्यवस्थेच्या योगानें स्वकर्मानुसार यथा-योग्य दंड देतो; कारण कोणीहि जीव आपल्या दुष्ट कर्माचें फल भोगूं इच्छित नाहीं. ह्मणून परमात्मा हा न्यायाधीश अवश्य असला पाहिजे. ( नास्तिक ) जगतामध्यें एक ईश्वरच नाहीं पण जितके मुक्त जीव आहेत तितके सर्व ईश्वरच आहेत. ( आस्तिक ) हें ह्मणणें सर्वथा व्यर्थ आहे; कारण जो प्रथम बद्ध असून मागाहून मुक्त होतो तो पुनः बंदामध्यें अवश्य पडतो; कारण कीं, तो स्वाभाविक सदैव मुक्त नसतो. जसे तुमचे चव्वींस तीर्थंकर प्रथमतः बद्ध होते, व पुनः मुक्त झाले, तें पुनः अवश्यमेव बंधनांत पडतील; जर जीवांप्रमाणें ईश्वरहि अनेक असले तर ते, जसे जीव तंटेबखेडे करीत फिरतात त्याचप्रमाणें हे अनेक ईश्वरहि लडतील व भिडतील. ( नास्तिक ) हे मूढा ! जगताचा कर्ता कोणी नाहीं तें स्वयंसिद्ध आहे. ( आस्तिक ) ही जैनांची केवढी मोठी चूक आहे ? कर्त्यावांचून कोणतेंहि कर्म व कर्मावांचून कोणतेंहि कार्य जगतांमध्यें होतें असें दिसत नाहीं. ही अशी गोष्ट आहे कीं, गव्हाच्या शेतांत गहूं आपोआप दळले जाऊन त्याच्या स्वयं रोट्या बनून त्या आपोआप जैनांच्या पोटांत जाव्यांत ! कापसाचें सूत, कपडा, अंगरखा, फेटा, उपरणें, धोतर, पगडी वगैर आपोआप बनत नाहीं. जर असें होत नाहीं तर कर्त्या ईश्वरावांचून विविध जगत् व नाना प्रकारची रचना कशी बनूं शकेल ? जर हट्ट करून स्वयंसिद्धच जगत् आहे असें मानाल तर कर्त्यावांचून पूर्वोक्त वस्त्रादिक बनतात असें प्रत्यक्ष सिद्ध करून दाखवा. जर असें सिद्ध करूं शकत नाहीं, तर त्या तुमच्या प्रमाणशून्य कथनाला कोण बुद्धिमान् पुरुष मानील ? ( नास्तिक ) ईश्वर विरक्त आहे कीं मोहित ? जर मोहित असेल तर जगत् बनवण्यास समर्थ होणार नाहीं. ( आस्तिक ) परमेश्वरामध्यें वैराग्य किंवा मोह केव्हांच संभवत नाहीं; कारण जो सर्वव्यापक आहे, तो एका पदार्थाचें ग्रहण व दुसऱ्याचा त्याग करूं शकत नाहीं. ईश्वराहून उत्तम पदार्थ किंवा त्याला अप्राप्त असा पदार्थ कोणताच नाहीं, ह्मणून त्याला कशाबद्दलहि मोह होत नाहीं. वैराग्य व मोह होणें हें जीवामध्येंच संभवतें तसें तें परमेश्वरा-मध्यें नाहीं. ( नास्तिक ) जर ईश्वराला जगाचा कर्ता व जीवांला फलें देणारा मानाल तर तो प्रपंची बनून दुःखी होईल. ( आस्तिक ) पहा ! अनेकविध कर्मांचा कर्ता प्राण्यांला फल देणारा, धार्मिक, न्यायाधीश, विद्वान् कर्मांमध्यें फसत नाहीं व प्रपंचीहि बनत नाहीं तर अनंत सामर्थ्य युक्त परमेश्वर प्रपंची

दुःखी कां बरें होईल ? हां ! तुह्मी आपल्यासारखें व आपल्या तीर्थंकरांसारखेंच परमेश्वरालाहि आपल्या अज्ञानानें युक्त समजतां तो तुमच्या अज्ञानाचा खेळ आहे. जर अविद्यादि दोषापासून सुटण्याची तुमची इच्छा असेल तर वेदादि सत्यशास्त्रांचा आश्रय करा, कां बरें भ्रमांत पडून धक्के खात आहांत ?

आतां जैन लोक जगतासंबंधानें जसें मानतात तसें यांच्या सूत्रांच्या अनुसार लिहितो. प्रथमतः सूत्रांचा मूलार्थ संक्षेपानें करून नंतर त्याच्या सत्यासत्याची समीक्षा करतों:—

## ( १ ) जैनसूत्रें व त्यांचें परीक्षण.

**सामि अणाइ अणन्ते च नूगइ संसार घोरकान्तरे ॥**
**मोहाइ कम्मगुरु ठिइ विवाग वसनु भमइ जीव रो ॥**

प्रकरणरत्नाकर भाग २। षष्टिशतक ६०।२.

हा रत्नसारभाग नामक ग्रंथाच्या सम्यक्त्वप्रकाश प्रकरणामधील गौतम व महावीर यांचा संवाद आहे. याचा संक्षेपानें उपयोगी अर्थ हा आहे कीं, " संसार अनादि अनंत आहे, याची उत्पत्ति केव्हांहि झाली नाहीं व नाश केव्हांहि होणार नाहीं. अर्थात् हें जग कोणीहि, बनविलें नाहीं. तेंच आस्तिक नास्तिक संवादामध्यें, " हे मूढ ! जगतकर्ता कोणी नाहीं, हें कधीं बनलें नाहीं व याचा कधींहि नाश होणार नाहीं, " असें लिहिलें आहे. (समीक्षक) जो संयोगापासून उत्पन्न होतो तो अनादि व अनंत कधींहि होऊं शकत नाहीं. उत्पत्ति व विनाश झाल्याशिवाय कर्म रहात नाहीं. जगामध्यें जितके पदार्थ उत्पन्न होतात तितके सर्व जर उत्पत्ति व विनाशयुक्त दिसतात तर मग जग हें उत्पत्ति व विनाशयुक्त कां नाहीं ? ह्मणून तुमच्या तीर्थंकरांला सम्यक् बोध नव्हता हें खरें. जर त्यांना सम्यक् ज्ञान असतें, तर ते अशा असंभव गोष्टी कां लिहिते ? जसे तुमचे गुरु आहेत तसेंच तुम्हीं शिष्यहि आहां ! तुमच्या गोष्टी ऐकणाऱ्यांला पदार्थविज्ञान कधींहि होऊं शकणार नाहीं. जो प्रत्यक्ष संयुक्त पदार्थ दिसतो, त्याची उत्पत्ति व विनाश कां बरें मानीत नाहीं. ? तात्पर्य, यांच्या आचार्यांना भूगोल खगोलविद्याहि येत नव्हती व आतांहि यांच्यांत ही विद्या नाहीं. नाहींतर खालीं लिहिलेल्या असंभव गोष्टी हे कशा मानते व बोलते ? पहा ! या सृष्टीमध्यें पृथिवीकाय अर्थात् पृथिवी हें एक जीवाचें शरीर आहे तसेंच जलकायादि जीवहि आहेत असें मानतात. पण

अन्य कोणीहि यांना मानूं शकत नाहींत. आणखीहि पहा ! ज्या तीर्थंकरांना हे जैन लोक सम्यक् ज्ञानी व परमेश्वर मानतात त्यांच्या असत्य गोष्टींचे नमूने पहा ! " रत्नासारभाग " ( या ग्रंथांला जैन लोक मानतात. हा ग्रंथ इ. स. १८७९ एप्रिल ता. २८ रोजीं बनारस जैनप्रभाकर छापखान्यांत नानकचंद जतीनें छापून प्रसिद्ध केला. ) या ग्रंथाच्या १४५ व्या पृष्ठावर काळाची अशी व्याख्या केली आहे. समयांचें नांव सूक्ष्मकाळ आहे. असंख्यात समयांला आवलि असें ह्मणतात. एककोटी सदसष्ट लक्ष सत्तर हजार दोनशें सोळा आवलींचा एक मूहूर्त होतो. तीस मूहूर्तांचा एक दिवस, पंधरा दिव-सांचा एक पक्ष, दोन पक्षांचा एक महिना, बारा महिन्यांचें एक वर्ष होतें. अशा सत्तरलक्ष छप्पन सहस्र कोटी वर्षांचा एक पूर्व होतो. अशा असंख्यात पूर्वांचा एक पल्योपम काल होतो. असंख्यात ही संज्ञा याला लावतात कीं, चार कोस चौरस व तितकीच खोल अशी एक विहीर खणावी व त्यांत जुगुलि मनुष्याच्या शरीरावरील निम्नलिखित केंसाचे तुकडे भरावे; हल्लींच्या मनुष्याच्या केंशापेक्षां जुगुली मनुष्याचा केंश चार हजार शाण्णवाव्या हिश्शानें सूक्ष्म असतो. जेव्हां जुगुली मनुष्याचे चार हजार शाण्णव केंस एकत्र करावे तेव्हां सध्यांच्या माणसांचा एक केंस होतो. अशा जुगुली मनु-ष्याच्या एका अंगुळा एवढ्या केंसाचें सातवेळ आठ आठ तुकडे करण्यानें २०,९७१५२ वीस लक्ष सत्याण्णव हजार एकशें बावन्न तुकडे होतात. अशा तुकड्यानीं पूर्वोक्त विहार भरावी. त्यांतून शंभर वर्षांनीं एक एक तुकडा काढावा. अशा रीतीनें जेव्हां त्या विहिरींतील सर्व तुकडे निघतील तेव्हां विहीर रिकामी होण्याला लागणाऱ्या त्या कालाला संख्यात काल असें म्हण-तात, व जेव्हां त्या तुकड्यांमधून एक एक तुकड्याचे असंख्यात तुकडे करून त्या तुकड्यांनीं ती विहीर अशी ठांसून भरावी कीं, चक्रवर्ती राजाची सेना जरी त्यावरून गेली तरी तो दबला जाऊं नये, त्या तुकड्यांमधून शंभर वर्षांनी एक तुकडा काढावा, अशा रीतीनें ती विहीर रिकामी होण्याला जो काल लागतो तो असंख्यात काल होय. असे असंख्यात पूर्व झाले ह्मणजे एक पल्योपम काल होतो. हा पल्योपम काल विहीरीच्या दृष्टांतानें जाणावा. जेव्हां दहा कोट्यान्‌कोटी पल्योपम काल जाईल तेव्हां एक सागरोपम काल होतो, व जेव्हां दहा कोट्यान्‌कोटी सागरोपम काल व्यतीत होईल तेव्हां एक उत्सर्पणी काल होतो, व जेव्हां एक उत्सर्पणी व अपसर्पणी काल होतो तेव्हां एक कालचक्र

पुरें होतें. जेव्हां अनंत कालचक्रें होतात तेव्हां एक पुद्गल परावृत होतो. अनंतकाल ह्मणजे काय ? जो सिद्धांत पुस्तकामध्यें नऊ दृष्टांतांनीं कालाची संख्या केलेली आहे, त्याच्या नंतरचा काल जो असतो तो अनंतकाल होय. अनंत पुद्गलपरावृत काल जीवांच्या भ्रमणामध्यें व्यतीत होतात.

गणितविद्याविशारद लोक हो ऐका ! जैनांच्या ग्रंथांतील कालसंख्या तुह्मी करूं शकाल कीं नाहीं ? व तुह्मी हिला सत्य मानाल कीं नाहीं ? पहा ! हे तीर्थंकरही अशी गणितविद्या शिकले होते ! असे असे गुरु व शिष्य यांच्या मतांमध्यें आहेत ! यांच्या अविद्येला कांहीं पारावार नाहीं. आणखीहि यांच्या मतांतील अंधःकार पहाः—

रत्नसार भाग पृ. १३३ पासून जे कांहीं ऋषभदेवापासून तों महावीर-पर्यंत चव्वीस तीर्थंकर झाले आहेत त्यांच्या वचनांचा सारसंग्रह लिहिला आहे, तो पाहण्यासारखा मासलेवाईकच आहे ! रत्नाकर भाग पृ. १४८ मध्यें लिहिलें आहे कीं, पृथिवीकायाचे जीव, माती, पाषाणादि पृथिवीचे भेद जाणावे. त्याच्यामध्यें राहणाऱ्या जीवांच्या शरीराचें परिमाण एक अंगुलाचा असंख्यातला भाग समजावा. अर्थात अत्यंत सूक्ष्म ते असतात. त्यांचें आयुर्मान अधिकाधिक बावीस हजार वर्षेंपर्यंत असतें. (रत्ना पृ. १४९) वनस्पतीच्या एका शरीरांत अनंत जीव असतात त्या सर्वांला साधारण वनस्पति असें ह्मणतात. जे कंदमूल प्रमुख व अनंतकाय प्रमुख असतात त्यांना साधारण वनस्पतीचे जीव ह्मणावें. त्याचें आयुष्य अनंतमुहूर्त असतें; येथें यांचा मुहूर्त पूर्वोक्त समजावा. यांच्या एका शरीरामध्यें एकच स्पर्शइंद्रिय असतें, व त्यांत एक जीव राहतो. यालाच निरनिराळी वनस्पति ह्मणतात. याचें देहमान एक हजार योजन असतें. पौराणिकांचें योजन चार कोसांचें असतें पण याचें योजन १०,००० कोसांचें असतें. अशा चार सहस्र कोसांचें एक शरीर होतें. याचें आयुर्मान अधिकाधिक दहा हजार वर्षांपर्यंत असतें. नंतर दोन इंद्रियांचे जीव होतात. त्यांना एक शरीर व एक मुख असतें यामध्यें, शंख, कवडी, ऊ वगैरेचा अंतर्भाव होतो. याचें देहमान अधिकांत अधिक अठ्ठे-चाळीस कोस स्थूल असतें, व त्यांचें आयुष्मान अधिकाधिक बारा वर्षें असतें. येथें यांची चूक झाली असावी, कारण एवढ्या मोठ्या शरीराचें आयुष्य जास्तीच लिहिलें पाहिजे होतें; व अठ्ठेचाळीस कोस लांबीरुन्दीची ऊ जैनांच्याच शरी-

नजर पडत असेल! व त्यांनींच ती पाहिली असेल, अन्यांचें भाग्य एवढें कोठें आहे कीं ते एवढी मोठी ऊ पाहूं शकतील!!

(रत्नसा. पृ. १५०) पहा! यांचा अंदाधुंद विंचू, ढेकूण, कसर व माशी यांचीं शरीरें एक योजन लांब असतात, यांचें आयुष्य अधिकाधिक सहा महिने असतें. पहा लोकहो! चार कोस लांब विंचू कोणी पाहिलाच नसेल! आठ मैल लांबीचें शरीर विंचवाचें व माशीचें असतें असें जैनांच्या ग्रंथांत आहे! असे विंचू व अशा माशा यांच्याच घरांत असतात व त्यांनाच त्या दिसतात. या संसारांत हे प्राणी दुसऱ्या कोणाच्याहि नजरेस पडले नसतील. जर केव्हां तरी असले विंचू जैनांना चावले तर त्यांचें काय होत असेल! जलचरांचें अर्थात् माशांचें शरीरमान एक हजार योजन अर्थात् १०,००० कोसांचें एक योजन या हिशोबानें १,०००००० एक कोटी कोस शरीर होतें. व एक कोटी पूर्व वर्षांत यांचें आयुष्य असतें. असले स्थूल जलचर जैनांशिवाय दुसऱ्या कोणीहि पाहिले नसतील! चतुष्पाद हत्तीचें देहमान दोन कोसांपासून नऊ कोसांपर्यंत दिलेलें आहे. आयुष्यमान चव्वीस हजार वर्षांचें लिहिलें आहे! असे मोठमोठ्या शरीरांचे जीव जैनांनींच पाहिले असतील व ह्मणूनच ते मानतात. दुसरे कोणी बुद्धिमान् हें मानूं शकत नाहींत. (रत्न पृ. १५१) मध्यें जलचर गर्भज जीवांचें देहमान उत्कृष्ट एक हजार योजनें अर्थात् १,०००००० एक कोट कोस व आयुष्यमान एक कोटी पूर्व वर्षांचें असतें. अशा मोठ्या, शरीराचे व आयुष्याचे जीव यांच्या आचार्यांनींच स्वप्नांत पाहिले असतील, काय ही महा असत्य गोष्ट नव्हे कीं जिचा केव्हांहि संभव नाहीं?

आतां भूमीचे परिमाण ऐका! (रत्न. १५१ पृ.) मध्यें पहा. या तिरछ्या लोकांत असंख्यात द्वीप व असंख्यात समुद्र आहेत. या असंख्यातांचें प्रमाण, अर्डीच सागरोपम कालामध्यें जितके समय होतात तितकीं द्वीपें व तितके समुद्र आहेत, असें जाणावें. आतां या पृथिवीमध्यें जम्बुद्वीप हें प्रथम सर्व द्वीपांच्यामध्यें आहे. याचें माप एक लक्ष योजन अर्थात् एक अब्ज कोस आहे. या देशाच्या चारहि बाजूंनीं लवण समुद्र आहे, याची लांबी दोन लक्ष योजनें अर्थात् दोन अब्ज कोस आहे. या जम्बुद्वीपाच्या चारहि बाजूंला धातकीखंड नामक द्वीप आहे. त्याचा विस्तार चार लक्ष योजनें अर्थात् चार अब्ज कोस आहे. त्याच्या पुढें कालोदधि समुद्र आहे. त्याचें प्रमाण आठ लक्ष योजनें अर्थात् आठ अब्ज कोस आहे. त्याच्यापुढें पुष्करावर्त द्वीप आहे, त्याचें प्रमाण

खोळा कोस आहे. त्या द्वीपाच्या आंत खोरा आहेत. त्या द्विपाच्या अर्ध्या भागांत मनुष्यें राहतात यांच्यापुढें असंख्यात द्वीप व समुद्र आहेत व त्यांच्यात तिर्यक् योनी जीव राहतात. ( रत्नसार १५२ पृ. ) जंबुद्वीपामध्यें एक हिमवन्त, एक ऐरण्डवन्त, एक हरि वर्ष, एक रम्यक, एक देवकुरु, एक उत्तरकुरु, अशीं सहा क्षेत्रें आहेत.

( समीक्षक ) भूगोल विद्या जाणारे लोकहो ऐका ! भूगोलाचें परीमाण करण्यांत तुह्मी चुकलांत कीं जैन चुकले ? जर जैन चुकले असले तर त्यांना तुह्मी समजवा व जर तुह्मी चुकलां असाल तर तुह्मी त्यांच्याकडून शिका. थोडासा विचार केला असतां असेंच वाटतें कीं, जैनांचे आचार्य व शिष्य भूगोल, खगोल व गणितविद्या मुळींच शिकले नव्हते. जर ते शिकले असते तर असल्या असंभव गोष्टी कशा लिहिल्या असत्या ? असले अविद्वान् पुरुष जगत अकर्तृक आहे व ईश्वर नाहीं असें मानतात त्यांत काय आश्चर्य ? ह्मणूनच जैन लोक आपली पुस्तकें कोणत्याहि अन्यमतांतील विद्वानांला देत नाहींत. कारण कीं ज्यांना हे लोक तीर्थंकरांनीं तीं बनवलीं असल्यामुळें प्रामाणिक आहेत असें मानतात त्या ग्रंथांत अशा अविद्यायुक्त गोष्टी भरल्या आहेत. ह्मणूनच कोणाला दाखवीत नाहींत, जर दाखवितील तर आतलें बिंग बाहेर पडेल ! यांच्या वांचून कोणीहि थोडासा विद्वान् मनुष्य केव्हांहि या गप्पाध्यायाला खरें मानणार नाहीं. हा सर्व घोंटाळा जैनांनीं जग अनादि आहे असें मानण्यासाठीं लिहिला आहे पण तें सर्व असत्य आहे. हां, जगताचें कारण अनादि आहे; कारण ते परमाणू आदितत्त्वरूप अकर्तृक आहेत; पण त्यामध्यें नियमपूर्वक बनणें व बिघडणें हें सामर्थ्य मुळींच नाहीं. द्रव्याचे एक एक परमाणु स्वभावानें पृथक् पृथक् आहेत, जड आहेत, ह्मगून ते आपोआप यथायोग्य रीतीनें बनूं शकत नाहींत ह्मगून त्याचा बनविणारा चेतन अवश्य आहे व तो बनविणारा ज्ञानरूप आहे. पहा ! पृथिवीसूर्यादि सर्व लोकांला नियमांमध्यें ठेवणें हें अनंत अनादि चेतन परमात्म्याचेंच काम आहे. ज्याच्यामध्यें संयोग व रचना विशेष दिसते तें स्थूल जग कधींहि अनादि होऊं शकत नाहीं. जर कार्य जगाला नित्य मानाल तर त्याचें कारण मुळींच नसेल, व तेंच कार्य कारणरूप होईल. जर असें तुह्मी ह्मणाल तर आपल्या आपणच कार्य व कारण असें मानण्यामध्यें अन्योन्याश्रयदोष व आत्माश्रयदोष येईल. आपल्या खांद्यावर आपणच चढणें व आपला पिता आपणच होणें हें होऊं शकत

नाहीं. म्हणून जगताचा कर्ता अवश्य मानला पाहिजे. ( प्र० ) ज्या ईश्वराला जगताचा कर्ता तुम्ही मानतां त्या ईश्वराचा कर्ता कोण ? ( उ० ) कर्त्याचा कर्ता व कारणाचें कारण कोणीहि होऊं शकत नाहीं; कारण प्रथमतः कर्ता व कारण असलें तरच कार्य होतें. ज्याच्यामध्यें संयोग व वियोग नसतात, जो प्रथम संयोग व वियोग यांना कारण असतो, त्याचा कर्ता किंवा त्याचें कारण कोणतेंहि असूं शकत नाहीं. याचें विशेष स्पष्टीकरण अष्टमसमुल्लासामध्यें पहावें. या जैन लोकांना स्थूल गोष्टींचेंहि यथावत् ज्ञान नसतें मग परमसूक्ष्म सृष्टीविद्येचें ज्ञान कसें समजणार ? जैन लोक सृष्टीला अनादि मानतात द्रव्यपर्यायांलाहि अनादि मानतात, प्रतिगुण, प्रतिदेश यांमध्यें अनंतपर्याय व प्रतिवस्तुमध्येंहि अनंतपर्याय मानतात असें प्रकरणरत्नाकरांस लिहिलें आहे तें सर्व असत्य आहे. कारण ज्यांना अंत व मर्यादा असते त्यांचे सर्व संबंधी अंत युक्तच असतात. जरी अनंताला असंख्य म्हटलें तरीहि तें ठीक होत नाहीं. पण जीवाच्या अपेक्षेनें ही गोष्ट ठीक होऊं शकते. परमेश्वराच्या अपेक्षेनें नाहीं. कारण एकएका द्रव्यामध्यें आपआपल्या एक एका कार्य कारण सामर्थ्याला अविभागपर्यायांनी अनंत सामर्थ्ययुक्त मानणें केवळ अविद्येची गोष्ट आहे. जर एकां परमाणु द्रव्याची सीमा असते तर त्यांत अनंतविभागरूप पर्याय कसे राहूं शकतील ! अशा एक एका द्रव्यामध्यें अनंत गुण व एका गुणप्रदेशामध्यें अविभागरूप अनंत पर्यायाला अनंत मानणें केवळ बालपणाच्या गोष्टी आहेत. कारण ज्याच्या अधिकरणाला अंत आहे तर त्यांत राहणारांचा अंत का नसेल ? या ग्रंथांत अशाच अनेक मिथ्या गोष्टी लिहिल्या आहेत. जीव व अजीव या दोन पदार्थाविषयीं जैनांचीं निश्चित मतें अशीं आहेत:—

**चेतनालक्षणो जीवः स्यादजीवस्तदन्यकः ॥**
**सत्कर्मपुद्गलाः पुण्यं पापं तस्य विपर्ययः ॥ १ ॥**

हें जिनदत्तसूरीचें वचन आहे व हें प्रकरण रत्नाकराच्या पाहिल्या भागांतील नयचक्रसारामध्यें लिहिलें आहे. "चेतनालक्षण जीव आहे व चेतनारहित अजीव अर्थात जड आहे. सत्कर्मरूप पुद्गल हें पुण्य व पापकर्मरूप पुद्गल हे पाप आहे." (**समीक्षक**) जीव व जड यांचें लक्षण ठीक आहे. पण हे जडरूप पुद्गल आहेत ते पापपुण्यरूप केव्हांहि होऊं शकत नाहींत; कारण पापपुण्य करण्याचा स्वभाव चेतनामध्यें असतो. पहा ! हे जितके जड पदार्थ आहेत तितके सर्व पापपुण्य

विरहित आहेत. जीवाला अनादि मानतात हें जैनांचें मत ठीक आहे; पण त्या अल्प व अल्पज्ञ जीवाला मुक्तिदशेमध्यें सर्वज्ञ मानणें हें खोटें आहे, कारण तो अल्प व अल्पज्ञ आहे त्याचें सामर्थ्यहि नेहमीं ससीमच असणार. जैन लोक जगत्, जीव, जीवाचें कर्म व बंध हे अनादि मानतात, यामध्यें सुद्धां जैनांच्या तीर्थकरांची चुकी आहे; कारण संयुक्त जगताचें कार्यकारण, प्रवाहानें कार्य व जीवांचें कर्म व बंधन हीं अनादि होऊं शकत नाहींत. जर असें तुह्मी मानतां तर कर्म व बंध यांपासून सुटणें कसें मानतां? जो पदार्थ असतो तो कधींहि सुटूं शकत नाहीं. जर अनादीचा नाश होतो असें मानाल तर तुमच्या सर्व अनादि पदार्थांचा नाश होण्याचा प्रसंग येईल. व जर अनादि नित्य आहे असें मानाल तर कर्म व बंध नित्य मानावे लागतील. जेव्हां सर्व कर्मांच्या नाशाचा प्रसंग येईल व जेव्हां अनादीला नित्य मानाल, तेव्हां कर्म व बंधहि नित्य मानावे लागतील. जर तुह्मी सर्व कर्मांपासून सुटणें हींच मुक्ति असें मानतां, तर सर्व कर्में सुटणें हें मुक्तीचें निमित्त झालें, व त्यामुळेंच मुक्ति ही नैमित्तिक झाली, ह्मणून ती सदैव राहणार नाहीं. कर्म व कर्ता यांचा नित्यसंबंध असल्यामुळें केव्हांहि कर्म सुटणार नाहीं व यामुळेंच आपणाला व तीर्थंकरांना नित्यमुक्ति तुह्मी मानलेली आहे ती सत्य होणार नाहीं. ( प्रश्न ) ज्याप्रमाणें धान्याचें वरचें साल निघून गेल्यानंतर किंवा त्याला अग्निसंयोग झाल्यानें जसा त्या बीजाला पुन: अंकुर येत नाहीं त्याप्रमाणें मुक्त झालेल्या जीवाला पुन: जन्ममरणरूप संसारामध्यें यावें लागत नाहीं. ( उ० ) जीव व कर्म यांचा संबंध साल व बीज यांच्यासारखा नाहीं, पण यांचा समवायसंबंध आहे. अनादिकालापासून जीव, व त्यामध्यें कर्म व कर्तृत्व-शक्ति यांचा संबंध आहे. जर त्याच्यामध्यें कर्म करण्याच्या शक्तीचाहि अभाव मानाल, तर सर्व जीव पाषाणवत् होऊन जातील व त्यांच्यात मुक्तीचा उपभोग घेण्याचें सामर्थ्यहि राहणार नाहीं. जसा अनादिकालच्या कर्मबंधांतून सुटून जीव मुक्त होतो, तसाच तो तुमच्या नित्यमुक्तींतून सुटून पुन: बंधांत पडेल; कारण जसें तुह्मी मुक्तीच्या कर्मरूपी साधनापासून सुटून जीव मुक्त होतो असें मानतां त्याचप्रामाणें तो नित्यमुक्तीमधून सुटून बंधनांत पडतो असें कां मानीत नाहीं? साधनांनीं सिद्ध झालेला पदार्थ कधींहि नित्य असूं शकत नाहीं व जर साधनसिद्धिवांचून मुक्ति मानाल तर कर्मांवांचून बंध होऊं शकेल! जसा वस्त्राला मळ लागतो, तो धुतला असतां जातो व पुन: मळ लागतो त्याचप्रमाणें

मिथ्यात्वादि हेतुमुळें व रागद्वेषादि कारणांच्या आश्रयामुळें जीवाला कर्मरूप मळ लागतो व तो सम्यक् ज्ञानदर्शनचारित्रानें निर्मळ होतो. मळ लागण्याच्या कारणानें मळ लागतो असें मानतां तर मुक्त जीव संसारी होतो व संसारी जीव मुक्त होतो असे मानावें लागेल; कारण जशी निमित्तांनी मलीनता सुटते तशी ती निमित्तांनी लागतेहि. ह्मणून प्रवाहरूपानें बंध व मुक्ति ही जीवाला अनादि आहे असें माना. ती अनंतेनें नाहीं. ( प्र० ) जीव कधींहि निर्मळ नव्हता पण तो मल-सहित आहे. ( उ० ) जर तो कधींहि निर्मळ नव्हता तर केव्हांहि तो निर्मळ होणार नाहीं. जर एखादें वस्त्र प्रथमतः शुभ्र असलें व नंतर त्याला मळ लागला तर तो मळ धुऊन जाईल पण त्याच्या स्वाभाविक श्वेतवर्णाला नाहींसें करतां येणार नाहीं. जसा वस्त्राला पुन: मळ लागतो त्याचप्रमाणें मुक्त झाल्यावरहि लागेल. ( प्र० ) जीव पूर्वोपार्जितकर्मांच्या योगानें शरीर धारण करतो, त्यासाठीं ईश्वराला मानणें व्यर्थ आहे. ( उ० ) जर केवळ कर्मच शरीरधारणासाठीं निमित्त आहे व ईश्वर कारण नाहीं, तर तो जीव वाईट जन्म, कीं ज्यांत पुष्कळ दु:खें भोगावीं लागतात तो, घेणार नाहीं. तर सदैव चांगलेच जन्म धारण करील. कर्म प्रतिबंधक आहे असें जर ह्मणाल, तरीहि जसा चोर आपणच बंदिखान्यांत जात नाहीं व स्वत: फांसावर चढत नाहीं, राजा शिक्षा देतो, त्याच-प्रमाणें जीवाला शरीरधारण करण्यास व त्याच्या कर्मानुसार फल देण्यास कारणीभूत असणाऱ्या परमेश्वराला तुह्मी माना. ( प्र० ) मदा ( नशा ) प्रमाण कर्मांचें स्वयमेव फल प्राप्त होतें, त्याला फल देणाऱ्या दुसऱ्याची गरज नाहीं. ( उ० ) जर असें होईल तर नेहमीं मद्यपान करणाऱ्या लोकांना नशा थोडी येते व अन-भ्यस्त माणसाला जास्त येते त्याचप्रमाणें नित्य व फार पापपुण्य करणाराला न्यून फल व कधीं कधीं थोडथोडें पापपुण्य करणारांला जास्त फल मिळालें पाहिजे. थोडें कर्म करणारांला जास्त फळ मिळेल. ( प्र० ) ज्याचा जसा स्वभाव असेल त्याला तसेंच फल मिळत असतें. ( उ० ) जर तें स्वभावामुळें असेल तर तें सुटणें किंवा मिळणें हें असंभव आहे. जसा शुद्ध वस्त्राला निमि-त्तामुळें मळ लागतो व तो निमित्तामुळेंच नाहींसा होतो असें मानाल तर ठीक आहे. ( प्र० ) संयोगावांचून कर्म परिणामाला प्राप्त होऊं शकत नाहीं. जसें दूध व आंबटपणा यांच्या संयोगावांचून दहीं होत नाहीं, त्याचप्रकारें जीव व कर्मांचा परिणाम होत असतो. ( उ० ) जसे दहीं व आंबटपणा यांचें मिश्रण करणारा तिसरा असतो, त्याचप्रमाणें जीव व कर्मांचें फल यांचा संबंध जोड-

णारा तिसरा ईश्वर असला पाहिजे. कारण जड पदार्थ नियमानें संयुक्त होत नाहींत. व जीवहि अल्पज्ञ असल्यामुळें स्वयं आपल्या कर्मफलाला प्राप्त होऊं शकत नाहींत. यावरून हें सिद्ध झालें कीं, ईश्वरस्थापित सृष्टिक्रमाशिवाय कर्मफलाची व्यवस्था होऊं शकत नाहीं. ( प्र० ) जो कर्मांपासून मुक्त होतो त्यालाच ईश्वर ह्मणतात. ( उ० ) ज्या अर्थी अनादिकाळापासून जीवाला कर्म लागलें आहे त्या अर्थी तो त्यांतून मुक्त कधींहि होऊं शकत नाहीं. ( प्र० ) कर्मांचा बंध सादि आहे. (उ०) जर तो सादि आहे तर कर्मांचा योग अनादि नाहीं व संयोगाच्या पूर्वी जीव निष्कर्म होता. जर निष्कर्माला कर्म लागलें तर मुक्तांलाहि लागेल. कर्म व कर्ता यांचा समवाय ह्म० नित्य संबंध असतो व तो सुटत नसतो, ह्मणून जसें नवव्या समुल्लासामध्यें लिहिलें आहे तसेंच मानणें योग्य आहे. जीवानें आपलें कितीहि सामर्थ्य व ज्ञान वाढवलें, तथापि त्याचें ज्ञान परिमित व त्याचें सामर्थ्य ससीम असणार, ईश्वराप्रमाणें अनंत कधींहि होऊं शकत नाहीं. जितकें सामर्थ्य वाढणें उचित आहे तितकें तो योगसाधनानें वाढवूं शकतो.

जैनांमध्यें जे अर्हत लोक आहेत ते देहाच्या परिमाणाबरोबर जीवाचेंहि परिमाण मानतात. त्यांना असें विचारलें पाहिजे कीं, हत्तीचा जीव कीडीमध्यें कीडीचा हत्तीमध्यें कसा राहूं शकेल ? हीहि एक मूर्खपणाचीच गोष्ट आहे. जीव एक सूक्ष्म पदार्थ आहे. तो एक परमाणूं मध्येंच राहूं शकतो. त्याच्या शक्ती शरीरामध्यें विद्युत्, नाडी वगैरे मधून संयुक्त होतात, त्या शक्त्यांच्या द्वारानें शरीरांतील वर्तमान तो जाणतो. उत्तम संगतीनें उत्तम व वाईट संगतीनें वाईट होतो. जैनलोक याप्रकारचा धर्म मानतातः—

रे जीव भवदुहाइं इक्कं चिय हरइ जिणमयं धम्मं ॥
इयराणं परमं तो सुहकप्ये मूढ मुसि ओसि ॥ •

प्र. रत्ना. २ । षष्ठी शत. ६० । ३ ॥

" अरे जीव ! एकच जिनमत, श्रीवीतराग भाषित धर्म, संसारसंबंधी जन्मजरामरणादि दुःखांचें हरण करणारें आहे. याचप्रमाणें सुदेव व सुगुरुंहि जैन मतवाल्याला जाणावा, वीतराग अशा ऋषभ देवापासून तों महावीरापर्यंत झालेला देवांशिवाय जे अन्य हरिहर ब्रह्मादि कुदेवांची आपल्या कल्याणासाठीं पुजा करतात ते सर्व मनुष्य ठकविलें गेले आहेत असें समजावें. " याचा

हा भाव आहे कीं, जैनमताचें सुदेव व सुगुरु व सुधर्म सोडून जो अन्य कुदेव व कुधर्म यांचें सेवन करील यांचें कांहींहि कल्याण होणार नाहीं. ( समीक्षक ) याठिकाणीं विद्वानांनी विचार करावा कीं, कशीं निंदायुक्त यांचीं पुस्तकें आहेत.

**अरिहं देवो सुगुरु सुद्ध धम्मं च पंच नवकारो ॥**
**धन्नाणं कयच्छाणं निरंतरं वसइ हिययम्मि ॥**

प्र. र. २ । ६० । १ ॥

अरिहन् देवेन्द्रकृत पूजादि करण्याप्रमाणें दुसरें कांहींएक उत्तम नाहीं असा जो, देवांचा देव, शोभायमान अरिहन्त देव, ज्ञान क्रियावान् शास्त्रांचा उपदेष्टा, शुद्ध, कषायमलरहित, सम्यक्त्वविनयदयामूल, श्रीजिनभाषित जो धर्म आहे, तोच दुर्गतीमध्यें पडलेल्या प्राण्यांचा उद्धार करण्यास योग्य आहे. अन्य हरिहरादिकांचा धर्म संसारांतून उद्धार करणारा नाहीं. पंच अरिहन्तादिक, परमेष्ठी; तत्संबंधी, यांनां नमस्कार हे चार पदार्थ धन्य आहेत अर्थात् श्रेष्ठ आहेत; क्षमा, दया, सम्यक्त्व ज्ञान, दर्शन व चारित्र हा जैनांचा धर्म आहे. **(समीक्षक)** जी मनुष्यमात्रावर दया नाहीं ती दया नव्हे व क्षमाहि नव्हे, ज्ञानाच्याबद्दल अज्ञान, दर्शनाबद्दल अंधेर व चरित्राबद्दल भुकेनें मरणें ह्यांत कोणती उत्तम गोष्ट आहे ? जैनमताच्या धर्माची प्रशंसा:—

**जइन कुणसि तव चरणं न पढसि न गुणासि देसि नो दाणम् ॥ ता इत्तियं न सक्किसिजं देवो इक्क अरिहन्तो ॥**

प्र. र. भा. २ । ष. सू. २ ॥

" हे मनुष्या ! जर तूं तपचारित्र करूं शकत नाहींस, सूत्रें शिकूं शकत नाहींस, प्रकरणादिकांचा विचार करूं शकत नाहींस व सुपात्रांला दान देऊं शकत नाहींस, तथापि तूं एक अरिहन्त देव आमच्या आराधनेला योग्य आहेस. सुगुरु सुधर्म अशा जैनमतामध्यें श्रद्धा ठेवणें हें सर्वोत्तम व उद्धाराला कारणीभूत आहे. " ( **समीक्षक** ) जरी दया व क्षमा ही उत्तम गोष्ट आहे, पक्षपातामध्यें फसण्यानें दया ही अदया व क्षमा ही अक्षमा होते. या धर्माचें प्रयोजन हें आहे कीं, कोणत्याहि जीवाला दुःख देऊं नये; पण ही गोष्ट सर्वथा होणें असंभव आहे; कारण दुष्टाला दण्ड करणें हीहि एक दयाच गणली आहे.

जर एका दुष्टाला दंड न दिला तर सहस्र मनुष्यांला दुःख होईल. ह्मणून तसली ती दया दया नव्हे व क्षमा क्षमा नव्हे. हे तर ठीक कीं, सर्व प्राण्यांच्या दुःखाचा नाश करणें व सुखाची प्राप्ति करून देण्याचा उपाय करणें ही खरी दया आहे. केवळ पाणी गाळून पिणें, क्षुद्र जंतूचा बचाव करणें, ही दया नव्हे. पण या प्रकारची दया जैनांच्या बोलण्यांतच आहे. कारण ते तसें वर्तन करीत नाहींत. मनुष्य कोणत्याहि मतांमध्यें कां असेना त्यावर दया करणें, त्याचा अन्नपानादिकांनीं सत्कार करणें, दुसऱ्या मतांतीलहि विद्वानांची मानमान्यता करणें ही काय दया नव्हे? जर यांचेपाजवळ खरी दया असती तर पहा विवेकसाराच्या २२१ पृ. वर लिहिलें आहे तें " (१) परमताची स्तुति करणें, (२) दुसऱ्या मतवाल्यांला नमस्कार करणें, ( ३ ) अन्यमतवाल्याशीं चाईट भाषण करणें, ( ४ ) त्यांच्याशीं संलाप करणें, ( ५ ) त्यांना अन्नवस्त्रादि किंवा खाण्यापिण्याचे पदार्थ देणें. ( ६ ) अन्यमतांतलि प्रतिमापूजनाला गंध पुष्पादि देणें " हीं सहा प्रकारचीं कर्में जैनांनीं कधींहि करूं नयेत. [ समीक्षक ] याठिकाणीं बुद्धिमानांनीं विचार करावा कीं, जैन लोकांची अन्यमतानुयायांवर किती अदया कुदृष्टि व द्वेष आहे. ज्या अर्थी अन्यमतस्थ मनुष्यावर अशी यांची अदया आहे त्याअर्थी जैनांला दयाहीन ह्मणणें योग्य आहे; कारण आपल्या घरांतील माणसांचीच सेवा करणें हा विशेष धर्म नाहीं. त्यांच्या मताचे मनुष्य हे त्यांच्या मतासारखेंच आहेत तेव्हां त्यांची ते सेवा करितात, तशी ते अन्यमतवाल्यांची करीत नाहींत, तेव्हां यांना कोण बुद्धिवान् मनुष्य दयाशील समजणार आहे? विवेक. पृ. १०८ मध्यें लिहिलें आहे कीं, मथुरेच्या राजाच्या नमुचि नामक दिवाणाला जैनांनीं आपला विरोधी समजून मारून टाकलें व आलोयणा ह्मणजे प्रायश्चित करून ते शुद्ध झाले! काय ही दया व क्षमा यांचें विनाशक कृत्य नव्हे? ज्या अर्थी अन्यमतवाल्यावर हे त्यांचे प्राण घेण्यापर्यंत वैरबुद्धि ठेवतात त्या अर्थी यांना दयावान् असें कोण ह्मणेल? यांना दयाळू न ह्मणतां हिंसक ह्मणणें सार्थक होईल. सम्यक्त्वदर्शनादिकांची लक्षणें आर्हत प्रवचनसंग्रह परमागमनसार या ग्रंथांमध्यें लिहिलीं आहेत कीं, सम्यक् श्रद्धा, सम्यक् दर्शन, ज्ञान, चारित्र हीं चार मोक्षमार्गाचीं साधनें आहेत. यांची व्याख्या योगदेवानें केली आहे. ज्या रुपानें जीवादिद्रव्य अवस्थित आहे, त्याच रुपानें जिनप्रतिपादित ग्रंथानुसार, विपरीत अभिनिवे-

शादिरहित जी श्रद्धा, अर्थात जिनमतावर प्रीति असते तिला सम्यक् श्रद्धा व सम्यक दर्शन असें ह्मणतात.

**रुचिर्जिनोक्ततत्वेषु सम्यक्श्रद्धानमुच्यते ॥**

जिनोक्त तत्त्वावर सम्यक् श्रद्धा ठेंवली पाहिजे दुसऱ्या कशावर नव्हे.

**यथावस्थिततत्त्वानां संक्षेपाद्विस्तरेण वा ॥**

**यो बोधस्तमत्राहुः सम्यग्ज्ञानं मनीषिणः ॥**

ज्याप्रकारचीं जीवादिक तत्वें आहेत त्यांचा संक्षेपानें किंवा विस्तारानें जो बोध होतो त्यालाच बुद्धिमान् लोक सम्यक् ज्ञान असें ह्मणतात.

**सर्वथाऽनवद्ययोगानां त्यागश्चारित्रमुच्यते ॥**

**कीर्तितं तदहिंसादि व्रतभेदेन पंचधा ॥**

**अहिंसासूनृतास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहाः ॥**

सर्व प्रकारांनीं निंदनीय अन्यमतसंबंधाचा त्याग करणें याला चारित्र असें ह्मणतात, अहिंसादि भेदांनीं व्रत पांच प्रकारचें आहे. ( १ ) **अहिंसा** कोणत्याहि प्राणिमात्राला न दुखाविणें. ( २ ) **सूनृता** प्रियभाषण करणें, ( ३ ) **अस्तेय** चोरी न करणें, ( ४ ) **ब्रह्मचर्य** उपस्थ इंद्रियाचा संयम करणें, ( ५ ) **अपरिग्रह** सर्व वस्तूंचा त्याग करणें. या पांच व्रतांतील पुष्कळ गोष्टी उत्तम आहेत. आहिंसा, चोरी वगैरे निंदनीय कर्मांचा त्याग करणें हें फारच उत्तम आहे. पण हें सर्व अन्यमतांची निंदा करण्यानें होणाऱ्या दोषांनी आच्छादित झाल्यामुळें दोषयुक्त झालें आहे. पहिल्या सूत्रांतच लिहिलें आहे कीं, अन्य हरिहरादिकांचा धर्म उद्धार करणारा नाहीं; काय ही लहान निंदा आहे ? ज्यांचे ग्रंथ पाहिले असतां पूर्ण विद्या व धार्मिकता दिसतें त्यांची निंदा करणें व आपल्या मह्या असंभव गोष्टी, ज्या पूर्वी दाखविल्या आहेत, त्या सांगणाऱ्या आपल्या तीर्थंकरांची स्तुति करणें हा केवळ हट्ट आहे. बरें जर जैन लोक कांहीं चरित्र करूं शकले नाहींत, शिकूं शकले नाहींत, त्यांच्यात दान देण्याचें सामर्थ्य नसलें तर नुसतें जैनमत खरें आहे असें ह्मणण्यानेंच तें उत्तम होईल काय ? व अन्य मतवाले श्रेष्ठ असतांहि अश्रेष्ठ होतील ? असें ह्मणणाऱ्या माणसांना भ्रांत व बालबुद्धि ह्मणूं नये तर ह्मणावें तरी काय ? यामध्यें हेंच विदित होतें कीं, यांचे आचार्य स्वार्थी होते.

ते पूर्ण विद्वान् नव्हते; कारण कीं, जर ते सर्वांची निंदा न करते तर अशा असत्य गोष्टींमध्यें कोणीहि न फसतां व त्यांचें प्रयोजनहि सिद्ध झालें नसतें. पहा ! हें तर सिद्ध होतेंच कीं, जैनांचें मत बुडविणारें व वेदमत सर्वांचा उद्धार करणारें आहे व हरिहरादि देव हे सुदेव व यांचे ऋषभदेवादि सर्व कुदेव होत असें जर दुसऱ्या लोकांनीं ह्मटलें तर तें यांना वाईट लागणार नाहीं काय ? आतां आणखी यांच्या आचार्यांची चूक पहा:—

**जिणवर आणा भंगं उमग्ग उस्सुत्तले सदेसणउ ॥**
**आणा भंगं पावंता जिणमय दुकरं धम्मम् ॥** प्र. २ । ६ । ११ ॥

उन्मार्ग सूत्रांचा लेश दाखवण्यानें, जिनवर अर्थात वीतराग तीर्थंकरांच्या आज्ञेचा जो भंग होतो तो दुःखाचा हेतु आहे व तेंच पाप आहे. जिनेश्वरानें सांगितलेले सम्यक्त्वादि धर्म करणें फार कठीण आहे, ह्मणून ज्या प्रकारें जिनाच्या आज्ञेचा भंग होणार नाहीं त्या प्रकारें वर्तन ठेवावें. ( **समीक्षक** ) आपल्या मुखानें आपली प्रशंसा करणें, आपणच आपल्या धर्माला मोठा ह्मणणें व दुसऱ्याची निंदा करणें हें मूर्खपण आहे. कारण ज्याची दुसरेहि प्रशंसा करतात त्याची प्रशंसा करणें ठीक आहे. चोरहि आपली आपल्या मुखानें प्रशंसा करतात, तेव्हां ते प्रशंसनीय होऊं शकतील काय ? याचप्रकारें यांच्या सर्व गोष्टी आहेत.

**बहुगुणविज्झा निलयो उस्सुत्तभासी तहा विमुत्तव्वो ॥**
**जहवरमणिजुतो विहुविग्धकरो विसहरो लोए ॥** प्र. २।६।१८ ॥

जसा विषधर सर्पांतील मणि त्यागाला योग्य आहे, त्याचप्रमाणें जो जैन मतामध्यें नाहीं, तो कितीहि जरी विद्वान् असला तथापि, त्याचा त्याग करणें जैनाला उचित आहे. ( **समीक्षक** ) पहा, किती चुकीची गोष्ट आहे ! जर यांचे चेले व आचार्य विद्वान् असते तर ते विद्वानांवर प्रेम करते. ज्या अर्थी यांचे तीर्थंकरांसहित सर्व अविद्वान् आहेत, त्या अर्थी ते विद्वानांची मान्यता कां करतील ? सुवर्ण, मळामध्यें किंवा धुळींत पडलें तरी त्याचा त्याग कोणी करील कां ? यावरून हें सिद्ध झालें कीं, जैनासारखे पक्षपाती, हट्टी, दुराग्रही व विद्याहीन दुसरे कोणीहि नाहींत.

**अइ सयपा वियपा वाधम्मि अपव्वे सूतो विपायरवया ॥**
**न चलन्ति सुद्धधम्मा धन्ना किंविपाव पव्वेसु ॥** प्र. २।६।२९॥

अन्यदर्शनें मानणारे कुलिंगी जैनमतविरोधी जे असतील त्यांचें दर्शनहि जैनांनी घेऊं नये. (समीक्षक) बुद्धिमान लोकांनीं विचार करावा कीं, ही किती पामरपणाची गोष्ट आहे ! हें खरें आहे कीं, ज्याचें मत खरें आहे त्याला कशाचीहि भीति वाटत नाहीं. यांचें आचार्य जाणत होते कीं, आपलें मत ठीक नाहीं; जर दुसऱ्यानें ऐकलें तर तो खंडण करील, ह्मणून सर्वांचीं निंदा त्यांनी केली व मूर्ख लोकांना फसविलें.

**नामं पितस्सअ सुहं जेणनिदिठाई मिच्छपव्वाइ ॥**
**जेसिं अणुसंगा उधम्मीणविहोई पावमई ॥ प्र. २।६।२७॥**

जो जैनमताशीं विरुद्ध धर्म आहे तो सर्व मनुष्याला पापी करणारा आहे. ह्मणून कोणाच्याहि अन्य धर्माला न मानतां जैन धर्मालाच मानणें श्रेष्ठ आहे. ( समीक्षक ) यावरून हें सिद्ध होतें कीं, सर्वांशीं वैर, विरोध, निंदा, इर्ष्या आदि दुष्टकर्मरूपसागरामध्यें बुडविणारा जैन धर्म आहे. जसे जैन लोक सर्वांचे निंदक आहेत, तसे दुसऱ्याची निंदा करणारे महानिंदक व अधर्मी दुसरे कोणीहि नसतील. काय एकाच बाजूनें सर्वांची निंदा व आपली प्रशंसा करणें शठ मनुष्यांचें काम नव्हे ? कोणत्याहि मतांतील विवेकी लोक असोत ते चांगल्याला चांगला व वाईटाला वाईट ह्मणणारच.

**हा हा गुरु अ अ कज्झं सामीनहु अच्छिकस्स पुकारिओ ॥**
**कह जिण वयण कह सुगुरु सावया कपहय अकज्झं ॥प्र.२।६।३५॥**

सर्वज्ञ भाषित जिनवचन, जैनांचे सुगुरु व जैनधर्म कोठें व त्याचे विरुद्ध कुगुरु, अन्य मार्गांचे उपदेश कोठें ? अर्थात् आमचे सुगुरु, सुदेव व सुधर्म आणि अन्याचे कुगुरु, कुदेव व कुधर्म आहेत ! ( समीक्षक ) ही गोष्ट बोरें विकणाऱ्या बाईप्रमाणें आहे. जशी ती आपल्या आंबट बोरांना गोड ह्मणते व दुसऱ्यांच्या गोड बोरांना आंबट ह्मणते व तीं निरुपयोगीं आहेत असें भासविते, याचप्रकारें जैनांच्या गोष्टी आहेत. हे लोक आपल्या मतवाल्याशिवाय अन्यमतवाल्यांची सेवा करणें महापाप समजतात.

**सप्पो इक्कं मरणं कुगुरु अणंता इदेइ मरणाइ ॥**
**तोवरिसप्पं गहियुं मा कुगुरुसेवणं भद्दम् ॥ प्र. २।३७॥**

जसें पूर्वीं लिहिलें आहे कीं, सर्पांतील मणी त्याज्य आहे त्याचप्रमाणें अन्यमार्गांतील श्रेष्ठ धार्मिक पुरुषांचाहि त्याग करणें उचित आहे. याहूनहि

अन्यमतवाल्यांची जास्त निंदा आतां करतात. जैनमताशिवाय अन्य सर्व कुगुरु अर्थात ते सर्पाहूनहि वाईट आहेत; त्यांचे दर्शन, सेवन व संग कधींहि करूं नये, कारण सर्पाच्या संगतीनें एकदां मरण येत, पण अन्यमार्गी कुगुरुंच्या सेवनानें अनेकवार जन्ममरणामध्यें पडावें लागतें; ह्मणून हे भद्रा ! अन्यमार्गीयांच्या गुरूंजवळ सुद्धां उभा राहूं नकोस. जर तूं अन्यमार्गीयांची सेवा केलीस, तर तूं दुःखांत पडशील ( **समीक्षक** ). पहा! जैनाप्रमाणें कठोर, भ्रांत, द्वेषी, निंदक, प्रमादि दुसरे मतवाले कोणीहि नसतील. यांनीं मनामध्यें हा विचार केला आहे, जर आह्मी अन्यांची निंदा व आमची प्रशंसा न करूं तर आमची सेवा कोणी करणार नाहीं व आमची प्रतिष्ठा होणार नाहीं. पण ही गोष्ट त्यांच्या दुर्भाग्याची आहे कीं, जोंपर्यंत हे उत्तम विद्वानांशीं संगति करणार नाहींत तोंपर्यंत यांना उत्तम यथार्थ ज्ञान व सत्यधर्माची प्राप्ति कधींहि होणार नाहीं; ह्मणून जैनाला उचित आहे कीं, त्यांनीं आपल्या विद्याविरुद्ध असत्य गोष्टींचा त्याग करून वेदोक्त सत्यमतांचें ग्रहण करावें तरच त्यांचें फार कल्याण होईल.

**किंभणिमो किं करिमो ताणहयसाण धिठदुठाणं ॥**
**जे दंसि ऊण लिंग खिवंति नरयम्मि मुद्धजणं ॥**

प्र. त्रा २।६ षष्टी सू. ४०॥

ज्यांच्या कल्याणाची आशा नष्ट झाली आहे, धीट व वाईट कामें करण्यांत अत्यंत चतुर अशा दुष्ट दोषयुक्तांला काय सांगावें ? व काय करावें ? कारण जो त्यांवर उपकार करतो त्याचा ते नाश करतात. जसें कोणी दया करण्यासाठीं आंधळ्या सिंहाचे डोळे उघडण्यास गेला असतां त्यानें त्याला खाऊन टाकावें त्याचप्रमाणें अन्यमार्गांतील कुगुरूंवर उपकार करावे हें आपला नाश करून घेण्यासारखें आहे. ह्मणून त्यांपासून सदैव अलग रहावें. ( **समीक्षक** ) जसा जैन लोक विचार करतात त्याचप्रमाणें दुसऱ्या मतवाल्यांनींहि विचार केला तर जैनांची किती दुर्दशा होईल बरें ? जर त्यांच्यावर कोणीहि कोणत्याच प्रकारचा उपकार न केला तर त्यांचीं बरींच कामें नाश पावतील व त्यांना फार दुःख होईल. याप्रमाणें दुसऱ्यांसाठीं जैनांनीं कां बरें विचार करूं नये ?

**जहजहतुट्टइ धम्मो जहजह दुठाण होय अइउदउ ।**
**समद्दिठिजियाण तहतह उल्लसइस मत्तं ॥** प्र, २।६।४२॥

जशीं जशीं दर्शनभ्रष्ट, निह्नव, पाच्छता, उसन्ना व कुसीलियादिक व अन्यदर्शनावलंबीं, त्रिदंडी, परिव्राजक, तसेंच विप्रादिक दुष्ट लोकांची शक्ति, सत्कार व पूजा अधिक होईल तसें तसें सम्यक् दृष्टी जीवांचें सम्यक्त्व विशेष प्रकाशित होईल असें म्हणणें फार आश्चर्य आहे. ( **समीक्षक** ) आतां पहा! काय जैनांपेक्षां अधिक ईर्ष्या, द्वेष व वैरबुद्धियुक्त दुसरा कोणी असेल? हां दुसऱ्या मतांमध्यें ईर्ष्याद्वेष आहेत, पण जितके ते या जैनामध्यें आहेत तितके दुसऱ्यांमध्यें नाहींत. द्वेष हेंच पापाचें मूळ आहे तेव्हां जैनांमध्यें पापाचरण कशावरून नसेल?

**संगो विजाण अहिउते सिंधम्माइ जेपकुब्बान्ति ॥**
**मुतूण चोरसंगं करति ते चोरियं पावा** ॥ प्र. र. भा. २।६।७५॥

याचें मुख्य प्रयोजन इतकेंच आहे कीं, जसे मूढ लोक चोरांच्या संगतीनें नासिकछेदादि दण्डाचें भय बाळगीत नाहींत, त्याचप्रमाणें जैनमताहून भिन्न धर्मामध्यें स्थित असलेले चोर लोक आपल्या होणाऱ्या अकल्याणाला भीत नाहींत. ( **समीक्षक** ) जो जसा मनुष्य असतो तो प्राय: आपणासारखाच दुसऱ्याला समजतो. काय हें खरें असूं शकेल कीं, जैनमत तेवढें साहुकार मत आहे व बाकीचीं सारीं चोर मतें आहेत? जोपर्यंत मनुष्यामध्यें अत्यंत अज्ञान व कुसंगतीनें भ्रष्ट झालेली बुद्धि असते, तोंपर्यंतच दुसऱ्यांशीं तें ईर्ष्याद्वेष वगैरे सोडीत नाहींत. जसें जैनमत दुसऱ्यांचें द्वेषक आहे तसें दुसरें कोणतेंहि नाहीं.

**जच्छपसुमहिसलरका पव्हहोमन्ति पावन बमीए ॥**
**पूअन्तितंपि सद्‌ढाहा ही लावी परायस्स ॥**

प्रक. २। ६०।७६.

पूर्वसूत्रांत सांगितल्याप्रमाणें जैनमार्गाहून भिन्न मार्गाचें अवलंबन करणारे लोक मिथ्यात्वी व आपण सम्यक्त्वी अर्थात् अन्य सर्व पापी व जैनलोक सर्व पुण्यात्मे आहेत, म्हणून जो कोणी मिथ्यात्वी लोकांचा धर्म स्थापन करील तो पापी आहे. ( **समीक्षक** ) जसें अन्य मतांतील चामुंडा, कालिका, ज्वाला, प्रमुखांचीं, पापनवमी, दुर्गानवमी, वगैरे तिथि व्रतें सर्व वाईट आहेत त्याचप्रमाणें तुमचीं पजूसण आदि व्रतें, कीं ज्यांपासून फार कष्ट होतात तीं वाईट नाहींत काय? या ठिकाणचें वाममार्गी लोकांच्या लीलेचें खंडण तर

ठीकच आहे. पण जें शासनदेवी व मरुतदेवी यांना मानतात तेंहि यांनीं खंडिलें असतें तर बरें झालें असतें. जर ह्मणतील कीं, आमची देवी हिंसक नाहीं तर तें ह्मणणें खोटें आहे. कारण यांच्या शासनदेवीनें एका पुरुषाचे व एका बकऱ्याचे डोळे काढलें होते, तेव्हां तीं राक्षसी, दुर्गा व काली यांची सख्खी बहीण कशी नव्हे ? आपल्या पच्चखाण आदिव्रतांला उत्तम मानणें व नवम्यादि व्रतांला वाईट मानणें ही मूर्खपणाची गोष्ट आहे. दुसऱ्यांच्या उपासांची निंदा व आपल्या उपासांची स्तुती करणें हा मूर्खपणा आहे. सत्यभाषणादि जीं यांच्यांतील व्रतें आहेत तीं सर्वांसाठींच उत्तम आहेत. जैनांच्या किंवा अन्यांचा कोणाचाच उपवास योग्य नाहीं.

**वेसाणवंदियाणय माहणडुं बाणजर कसिरकाणम् ॥**
**भत्ताभर कठाण वियाणं जन्ति दूरेणं ॥** प्रक. २। ६०।८२.

याचें मुख्य प्रयोजन हें आहे कीं, वेश्या, चारण, भाटादि लोकांचें, ब्राह्मण, यज्ञ, गणेशादि मिथ्यादृष्टी देवी आदिक देवतांचे भक्त असतात, व जे त्यांना मानतात, ते सर्व बुडवणारे व बुडणारे होत. कारण कीं, त्यांच्याजवळ या सर्व वस्तू ते मागतात व वीतराग पुरुषांपासून दूर रहातात:— ( **समीक्षक** ) दुसऱ्या मार्गीयांच्या देवतांला मिथ्या ह्मणणें, व आपल्या देवतांला सत्य ह्मणणें हें केवळ पक्षपातीपणाचें आहे. हे अन्य वाममार्गीयाच्या देवांचा निषेध करतात ते आपल्या शासनदेवीचा निषेध कां करीत नाहींत ? " श्राद्धदिनकृत्य " ग्रंथाच्या ४६ पृ. वर लिहिलें आहे कीं, शासनदेवीनें रात्रीं भोजन करण्यासाठीं एका पुरुषाला थप्पड मारली, त्याचे डोळे बाहेर काढले व त्याबद्दल बकऱ्याचे डोळे काढून त्या मनुष्याला लाविलें. या देवीला हिंसक असें हे लोक कां मानीत नाहींत ? रत्नसागर भा. १ पृ. ६७ मध्यें पहा काय लिहिलें आहे ! मरुतदेवी पांथस्थांना दगडाची मूर्ति होऊन सहाय्य करीत असे. हिलाहि तशीच कां मानीत नाहीं ?

**किंसोपि जणणि जाओ जाणो जणणी इकिं अगोविद्धिं ॥**
**जइमिच्छरओ जाओ गुणे सुतमच्छरं वहइ ॥** प्र. २।६०।८१

जे जैनमतविरोधी मिथ्यात्वी अर्थात् मिथ्याधर्मवाले आहेत ते कां जन्मतात ? जन्मल्यानंतर वाढतात कां ? अर्थात् ते लवकर नाश पावते तर चांगलें झालें असतें ! ( **समीक्षक** ) पहा यांचे वीतरागभाषित दयाधर्म ! दुसऱ्या मतवा

त्यांचें जीवितहि हे इच्छित नाहींत ! दयाधर्म यांच्या केवळ कथनामध्येंच कायतो आहे व जो आहे तो क्षुद्र जीव पशु यांसाठीं आहे. जैनाभिन्न मनुष्यासाठीं नाहीं ! !

**शुद्धे मग्गे जाया सुहेण मच्छति सुद्धिमग्गम्मि ॥**
**जे पुण अमग्गजायां मग्गे गच्छन्ति ते चुप्पं ॥** प्र. २।६०।८३

याचें मुख्य प्रयोजन हें आहे कीं, जो जैन कुलांत जन्म घेऊन मुक्तीला जातो त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण जैनभिन्न कुलामध्यें जन्मून मिथ्यात्वी व अन्यमार्गी बनून मुक्ति प्राप्त होते हें फार आश्चर्य ? याचें तात्पर्य असें कीं, जैनमतानुयायीच मुक्त होतात अन्य नाहीं. जे जैनमताचें ग्रहण करीत नाहींत ते नरकांत जातात. ( **समीक्षक** ) काय जैनमतांतील एखादा दुष्ट पुरुष नरकांत जात नसेल ? सर्वच मुक्तींत जातात ? कोणी नाहीं ! काय ही उन्मत्तपणाची कल्पना नव्हे ? भोळ्या माणसांशिवाय अशा गोष्टी दुसरा कोण मानील ?

**तिच्छराणं पू आसंम त्तगुणाणकारिणी भणिया ॥**
**सावियामिच्छत्तयरी जिण समये देसिया पू आ ॥**
प्र. २। ६० ।९०

जिनमूर्तींची पूजा करणें हें एकच सार आहे व याहून भिन्न मार्गीयांच्या मूर्तींच्या पूजा करणें हें असार आहे. जो जिनमार्गाची आज्ञा पाळतो तो तत्वज्ञानी व जो पाळत नाहीं तो तत्वज्ञानी नव्हे ! (**समीक्षक**) वाहवा ! काय ह्मणावें ! ! काय तुमची मूर्ति पाषाणादि जड पदार्थांची नाहीं, जशी वैष्णवादिकांची आहे ? जशी तुमची मूर्तिपूजा मिथ्या आहे तशीच वैष्णवादिकांचीहि मूर्तिपूजा मिथ्या आहे. जर तुह्मी तत्वज्ञानी होतां व अन्यांला अतत्वज्ञानी बनवितां, यावरूनच उघड ठरतें कीं, तुमच्या मतांमध्यें तत्वज्ञान मुळींच नाहीं.

**जिण आणा एधम्मो आणा रहि आण फुंड अहमुत्ति ॥**
**इयमुणि ऊण यतत्तं जिण आणाए कुणहु धम्मं ॥**
प्र. र. २।६।९२।

जी जीनदेवाची आज्ञा दया क्षमारूप आहे तोच धर्म आहे, त्याशिवाय इतर सर्व आज्ञा अधर्म आहेत. ( **समीक्षक** ) ही किती महान् अन्यायाची

गोष्ट आहे ! जैनमताशिवाय अन्य कोणीहि पुरुष सत्यवादी व धर्मात्मा नाहीं काय ? काय त्या धार्मिक माणसाला मान देऊं नये ? हां ! जर जैनमतस्थ मनुष्यांची जिव्हा व मुख चामड्याचें नसतें व अन्यांचें चामड्याचें असतें तर हें ह्मणणें ठीक झालें असतें. यांनीं आपल्या ग्रंथांची, वचनांची व साधूंची अशी महती वर्णिली आहे कीं, हे भाटांचे थोरले बंधूच- बनले आहेत.

**वन्नोमिनारया उविजसिन्दुरकाइ संभरंतागम् ॥**

**भव्वाण जणइ हरिहररिद्धि समिद्धि विउद्धोसं ॥ प्र. २।६०।९६॥**

याचें मुख्य तात्पर्य हें आहे कीं, जी हरिहरादि देवांची विभूति आहे ती नरकाला हेतू आहे. त्यांना पाहून जैनांचे रोमांच उभे राहतात. जसें राजाज्ञेचा भंग करण्यानें मनुष्याला मरणापर्यंत दुःख होतें त्याचप्रमाणें जिनेंद्राची आज्ञाभंग करण्यानें कां जन्ममरण दुःख पावणार नाहीं ? ( **समीक्षक** ) पहा ! जैनांच्या आचार्यांची मनोवृत्ति व त्यांच्या कपटाची व ढोंगाची लीला ! आतां तर यांच्या अंतर्यामांतील गोष्ट बाहेर आली. हरिहरादिकांचें व त्यांच्या उपासकांचें ऐश्वर्य व त्यांची उन्नति हीं यांना पहावींशी सुद्धां वाटत नाहीं. दुसऱ्याची बढती झालेली पाहून यांचे रोमांच उभे राहतात. प्रायः असें इच्छित असतील कीं त्यांचें सर्व ऐश्वर्य आपणास मिळालें व ते दरिद्री झाले तर तें उत्तम ! हे राजाज्ञेचा दृष्टांत अशासाठीं देतात कीं, हे जैन लोक राजाचे फार खुशामती व भित्रे असतात. राजाची असत्य गोष्टहि सत्य मानावी काय ? जो ईर्ष्याद्वेषी असेल तो जैनांहून दुसरा कोणिहि असणार नाहीं.

**जो देइशुद्धधम्मं सो परमप्पा जयम्मि नहु अन्नो ॥**

**किं कप्प दुम्म सरिसो इयरतरू होइकइयावि ॥ प्र. २।६०।१०१॥**

ते मूर्ख लोक आहेत जे जैनधर्माशीं विरुद्ध आहेत. जो जिनेंद्र भाषित धर्माचा धर्मोपदेष्टा, साधु, गृहस्थ व ग्रंथकर्ता आहे तो तीर्थंकरांच्या तुल्य आहे. त्याच्या तुल्य दुसरा कोणी नाहीं. ( **समीक्षक** ) जर जैन लोक बालबुद्धि नसते तर अशा गोष्टी कशा मानते ? जशी वेश्या आपणाशिवाय दुसऱ्याची स्तुति करीत नसते तशीच यांची ही गोष्ट दिसते.

**जे अमुणि अगुण दोषाते कह अबुहाणन्हुन्तिमझच्छा ॥**

**अहते विन्हुम झच्छाता विस अमि आण तुल्लत्तं ॥**

**प्र) २।६०।१०२ ॥**

जिनेंद्र देव, तदुक्त सिद्धांत, जिनमतांच्या उपदेशकांचा त्याग करणें जैनांला उचित नाहीं. ( समीक्षक ) हें जैनांचें हट्ट, पक्षपात व अविद्या यांचें, फल नव्हे तर काय ? जैनांची थोडीशी गोष्ट सोडून अन्य सर्व त्यक्तव्य आहे ! ज्याला थोडीशी बुद्धि असेल तो जैनांचे देव, सिद्धांत ग्रंथ व उपदेशकांचा उपदेश ऐकून विचार करील तर तत्क्षणींच निःसंदेह त्या सर्वांचा त्याग करील.

**वयणे विसुगुरजिणवल्ल हस्सके सिंग उल्हस इसम्मे ॥**
**अहकहदिण माणितेयं उलुआणंहरइ अन्धत्तं ॥** प्र. २।६०।१०७॥

जे जिनवचनानूकूल चालतात ते पूजनीय आहेत, व विरुद्ध वागतात ते अपूज्य होत. जैन गुरूंला मानणें व अन्यमार्गीयांला न मानणें. ( समीक्षक ) जर जैनलोक अज्ञान्यांला पशुवत् करून आपल्या मतांत न वांधते तर ते यांच्या जाळ्यांतून सुटून आपल्या मुक्तीचें साधन करून आपला जन्म सफल करून घेते. अहो, जर कोणी तुम्हांला कुमार्गी, कुगुरु, मिथ्यात्वी व कूपदेष्टा म्हणेल तर तुम्हांला किती दुःख होईल बरें ? ज्या अर्थी तुम्ही दुसऱ्याला दुःखदायक आहांत त्या अर्थी तुमच्या मनांत फारच असार गोष्टी भरलेल्या आहेत.

**तिहुअण जणं मरंतं दठूण निअन्तिजेन अप्पाणं ॥**
**विरमंतिन पावा उधिद्धि धिठत्तणं ताणम् ॥** प्र. २।६०।१०८॥

जरी मरणापर्यंत दुःख झालें तरीहि कृषिव्यापारादि कर्मे जैन लोकांनी करूं नयेत, कारण कीं, हीं कर्मे नरकांत घेऊन जाणारीं आहेत. ( समीक्षक ) आतां कोणी तरी जैनांला विचारावें कीं, तुम्ही व्यापारादि कर्मे कां करतां ? या कर्मांला कां सोडीत नाहीं ? व जर सोडून द्याल तर तुमच्या शरीराचें पालन पोषणहि होऊं शकणार नाहीं व जर तुमच्या कथनाप्रमाणें सर्व लोक हीं कर्मे सोडतील तर तुम्ही कोणती वस्तु खाऊन जिवंत राहाल ? असा अत्याचाराचा उपदेश करणें सर्वथा व्यर्थ आहे. काय करतील बिचारे ! विद्या व सत्संग नसल्यामुळें त्यांच्या मनांला जें आलें तें त्यांनीं भकलें !

**तइया हमाण अहमा कारण रहिया अनाण गव्येण ॥**
**जे जंपंति उशुत्तं तेसिंदिद्धिच्छपम्मिचच्चं ॥** प्र. २।६०।१२१॥

जे जैनागमाच्या विरुद्ध शास्त्रांला मानणारे आहेत ते अधमाधम आहेत. कोणतेंहि का काम सिद्ध होईना पण जैनमताच्या विरुद्ध बोलूं नये व मानूं

नये. कोणतेंहि प्रयोजन साधत असलें तरी अन्यमताचा त्यागच करावा. ( समीक्षक ) तुमच्या मूळ पुरुषापासून आजपर्यंत जितके पुरुष झाले असतील तितक्या सर्वांनीं दुसऱ्यांला गाळी देण्याशिवाय दुसरी कांहींच गोष्ट केली नसेल व ते करणारहि नाहींत ! जेव्हां जेव्हां आपलें प्रयोजन सिद्ध होत आहे असें हे जैनलोक पहातात तेथें हें चेल्यांचेहि चेले बनतात. अशा खोट्यानाट्या गप्पा हांकण्यांत यांस मुळींच लज्जा वाटत नाहीं ही मोठ्या शोकाची गोष्ट आहे.

जम्बीर जिणस्सजिओ मिरई उस्सुत्तले सदेसण ओ ॥
सागरकोडा कोडिंहिं मइ अइ भी भवरणे ॥ प्र. २।६०।१२२॥

जो कोणी मनुष्य असें ह्मणेल कीं, जैनसाधूंमध्येंहि धर्म आहे व आमच्या व अन्यमतामध्येंहि धर्म आहे तो मनुष्य कोट्यावधि वर्षेंपर्यंत नरकांत राहून पुनः पुनः नीच योनींत जाईल. ( समीक्षक ) वाहवारे ! वाहवा !! विद्येचे शत्रूहो ! तुह्मी हाच विचार केला असेल कीं, आमच्या मिथ्यावचनांचें कोणीहि खंडण करूं नये म्हणून हें भयंकर वचन लिहिलें आहे आतां कोठपर्यंत तुह्मांला समजवावें ! तुह्मीं तर व्यर्थ निंदा व अन्यमतांशीं वैर करण्यास सज्ज आहांत व आपलें प्रयोजन साधणें यांतच पुरुषार्थ समजत आहांत !

दूरे करणं दूरम्मि साहूणं तहयभावणा दूरे ॥
जिणधम्म सद्दहाणं पितिर कदुरकाइनिठवइ ॥ प्र. २।६०।१२७

जर कोणा माणसाकडून जैनधर्माचें थोडेंहि अनुष्ठान होऊं शकत नसेल तरीहि त्यानें जैनधर्मच सत्य आहे तसा अन्य नाहीं, अशी श्रद्धा ठेवली तरीहि तो दुःखांतून तरून जाईल. ( समीक्षक ) मूर्खाला आपल्या मतामध्यें आणून फसविण्याला याहून मोठी गोष्ट तरी कोणती असणार ? कारण की, कांहीं धर्म करावा लागणार नाहीं व मुक्ति तर साधेल असलें भोंदू मत कोणतें दुसरें असेल ?

कइया होही दिवसो जइया सुगुरुण पायमूलम्मि ॥
उस्सुत्त संविसलवर हिले ओनिसुणे सुजिणधम्मं ॥ १२८ ॥

जर मनुष्य होईन तर जिनागम ह्म. जैनांचीं शास्त्रें ऐकेन, उत्सूत्र ह्म. अन्यमताच्या ग्रंथांचें श्रवण कधींहि करणार नाहीं. इतकी इच्छा करील; तो एवढ्या इच्छेनेंच दुःखसागरांतून तरून जाईल. ( समीक्षक ) हींहि गोष्ट भोळ्या माणसांनां फसविण्यासाठींच आहे. कारण या इच्छेनें येथील दुःखसागरहि तरू

शकत नाहीं मग पूर्वजन्मांच्या संचित पापांपासून उत्पन्न झालेल्या दुःखरूपी फलाचा भोग भोगल्यावांचून कसा सुटणार? जर अशा असत्य व विद्याविरुद्ध गोष्टी न लिहिते तर वेदादिशास्त्रें पाहून व ऐकून सत्यासत्याचा विचार करून यांच्या कपोलकल्पित अविद्यारूप ग्रंथाला सोडून देते. पण यांनीं अविद्वानांला असें जखडून बांधले आहे कीं, यांच्या जाळ्यांत कोणी एखादा बुद्धिमान् सत्संगीच सुटूं शकेल पण अन्य जडबुद्धी लोकांचें सुटणें अगदीं असंभवनीय व अति कठिण आहे.

जह्मजेणं हिंभणियं सुयववहारं निसोहियंतस्स ॥
जायइ विसुद्ध बोही जिणआणा राइ गत्ता ओ॥ प्र.२।६०।१३८॥

जे लोक जिनाचार्यांनी सांगितलेल्या सूत्र, निरुक्ति, वृत्ति, भाष्यचूर्णी, हे ग्रंथ मानतात, तेहि शुभ व्यवहार करून चरित्र युक्त होऊन सुखाला प्राप्त करून घेतात. अन्यमतांचे ग्रंथ पाहून होत नाहींत. ( समीक्षक ) काय अत्यंत भुकेनें मरण्याला चारित्र ह्मणतात? जर भुकेनें व तहानेनें मरण्याला चरित्र ह्मणावयाचें असेल तर पुष्कळ मनुष्यें दुष्काळामध्यें मरतात व ज्यांना अन्नपाणि मिळत नाहीं तेहि भुकेनें मरतात. ते शुद्ध होऊन शुभ फलांला प्राप्त झाले पाहिजेत. हेहि शुद्ध होणार नाहींत, व तुह्मीहि शुद्ध होणार नाहीं, पण पित्तादिकांचा प्रकोप होऊन रोगी व्हाल व दुःख भोगाल. न्यायाचरण, ब्रह्मचर्य, सत्यभाषण हाच धर्म आहे. व असत्यभाषण अन्यायाचरणादि पाप आहे. जैनमतामध्यें सांगितल्याप्रमाणें भुकेलेलें राहणें व तहानेलेले राहणें हा धर्म नव्हे. याच्या सूत्रादिकांला मानण्यानें थोडेंसें सत्य व बरेंच असत्य प्राप्त होऊन मनुष्य दुःखसागरांत बुडतो.

जइजाणसि जिणनाहो लोयाया राविपरकणमू ओ ॥
तातंतं मन्नं तो कहमन्नसि लोअ आयारं ॥ प्र. २।१४८ ॥

जे उत्तम प्रारब्धवान् मनुष्य असतात तेच जिनधर्माचें ग्रहण करतात. अर्थात् जे जिनधर्माचें ग्रहण करीत नाहींत ते उत्तम प्रारब्धवान् नव्हेत. ( समीक्षक ) ही गोष्ट खोटी व चुकीची नाहीं काय? अन्यमतांमध्यें उत्तम प्रारब्धवान् व जैनमतामध्यें प्रारब्धहीन कोणी नाहीं काय? सहधर्मीयानी अर्थात् जैनधर्मीयांनीं आपआपसांत क्लेश करूं नयेत. पण त्यांनीं प्रीतिपूर्वक वागावें असें जें यांनीं सांगितलें आहे त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं

दुसऱ्याशीं कलह करण्यामध्यें जैन लोक वाईट समजत नाहींत. हीहि यांची गोष्ट अयुक्त आहे. कारण सज्जन पुरुष सज्जनांशीं प्रेम करतात व दुष्टांना शिक्षा देऊन त्यांस सुशिक्षित करतात. व जें हें त्यांनीं लिहिलें आहे कीं, ब्राह्मण, त्रिदंडी, परिव्राजकाचार्य अर्थात् संन्यासी, तापसी अर्थात् वैरागी आहेत ते सर्व जैनमताचे शत्रू आहेत. आतां पहा कीं, हे सर्वांशीं शत्रुत्वानें पाहतात व सर्वांची निंदा करतात तेव्हां या जैनांचा दया व क्षमारूप धर्म कोठें राहिला ? कारण कीं, दुसऱ्याशीं द्वेष करणें हें दया व क्षमा यांचा नाश करण्यासारखें आहे, व याच्यासारखा दुसरा कोणताच हिंसारूप दोष नाहीं. जसे जैन द्वेषांच्या मूर्ती आहेत तसे दुसरे लोक थोडेच असतील. ऋषभदेवापासून तों महावीरापर्यंत झालेल्या चव्वीस तीर्थंकरांला रागी, द्वेषी, मिथ्यात्वी कोणी ह्मटलें व जैनमतवाल्यांना सन्निपातज्वरानें भ्रमिष्ट झाले आहेत व त्यांचा धर्म नरकाला नेणारा आहे ह्मणून तो विषासमान समजावा असें जर कोणी ह्मटलें तर तें जैनाला किती बरें वाईट लागेल ? जैनलोक निंदा व परमद्वेषरूप नरकांत महाक्लेश भोगत राहिले आहेत ह्मणून ते ही गोष्ट सोडतील तर बरें होईल.

एगो अगरू एगो विसाव गोचे इ आणि बिनहाणि ॥
तच्छयजं जिणदव्वं परुप्परन्तं न विच्चन्ति ॥ प्र. २।१५०॥

सर्व श्रावकांचा देवगुरूधर्म एक आहे. चैत्यवंदन अर्थात् जिनप्रतिबिंबमूर्ति देवल व जिनद्रव्याचें रक्षण व मूर्तिची पूजा करणें हा धर्म आहे. (समीक्षक) आतां पहा ! जितका मूर्तिपूजेचा झगडा चालला आहे तो सर्व जैनांच्या घरांतूनच सुरू झाला आहे. व पाखंडाचें मूलहि जैनमतांतूनच आहे. श्राद्धदिनकृत्य पृ. १ मध्यें मूर्तिपूजेचें प्रमाण—

नवकारेण विवोहो ॥१॥ अनुसरणं सावउ ॥२॥ व याईं इमे ॥ ३ ॥
जोगो ॥४॥ चियवन्दणगो ॥५॥ यच्चरखाणां तु विहि पुच्छम् ॥६॥

इत्यादि श्रावकांच्या पहिल्या द्वारामध्यें नवकाराचा जप करणें ॥ १ ॥ दुसरें नवकाराच्या जपानंतर मी श्रावक आहें असें स्मरण करणें ॥ २ ॥ तिसरें अनुव्रतादि आमचीं किती व्रतें आहेत ॥ ३ ॥ चवथें द्वार चार वर्गांमध्यें अग्रगामी मोक्ष आहे, त्याचा हेतु ज्ञानादिक आहे, तोच योग होय. त्याचा सर्व अतीचार निर्मल करण्यानें सहा आवश्यक कारणें होतात याला

उपचार योग असें ह्मणतात. यालाच योग असें आह्मीं ह्मणूं ॥ ४ ॥ पांचवें चैत्यवन्द ह्म० मूर्तीला नमस्कार द्रव्यभावपूजा ह्मणूं ॥ ५ ॥ सहावें प्रत्याख्यानद्वार नवकारासीप्रमूख विधिपूर्वक ह्मणूं इत्यादि ॥ ६ ॥ व याच ग्रंथामध्यें पुढें पुष्कळसे विधि लिहिले आहेत. संध्याकाळच्या भोजनसमयीं जिनबिंब ह्म० तीर्थकरांच्या मूर्तीचें पूजन करावें व द्वार पूजावें ! या द्वारपूजेमध्यें मोठमोठे बखेडे आहेत. जुन्या मंदिरांचा जीर्णोद्धार करणें व नवीं बनवणें यांपासून मुक्ति होते असे त्यांचे नियम आहेत. मंदिरांमध्यें अशा प्रकारानें जाऊन बसावें, मोठ्या प्रीतीनें पूजा करावी, " नमो जिनेन्द्रेभ्यः " इत्यादि मंत्रांनीं स्नानादि करावें व " जलचंदनपुष्पधूपदीपनैः " इत्यादिकांनीं गंधादिक अर्पावीं. रत्नसारभागाच्या १२ पृष्ठावर मूर्तिपूजेचें फल हें लिहिलें आहे कीं पूजाऱ्याला राजा प्रजा प्रतिबंध करूं शकत नाहींत. ( **समीक्षक** ) या गोष्टी सर्व कपोलकल्पित आहेत; कारण पुष्कळ जैनपूजाऱ्यांना राजादिक प्रतिबंध करतात. रत्नसार पृष्ठ ३ मध्यें लिहिलें आहे कीं, मूर्तिपूजेपासून रोग पीडा व महादोष सुटतात. " कोणी एकानें पांच कौडयांचीं फुलें वाहिलीं त्याला १८ देशांचें राज्य मिळालें व त्याचें नांव कुमारपाळ झालें " इत्यादि सर्व गोष्टी खोट्या आहेत व मूर्खांला भुलवण्याच्या आहेत; कारण अनेक जैन लोक पूजा करतां करतां रोगी होतात व एका बिघ्याचेंहि राज्य पाषाणपूजेपासून मिळत नाहीं. जर पांच कवड्यांचीं फुलें वाहून राज्य मिळेल तर पांच पांच कवड्यांचीं फुलें चढवून सर्व भूगोलाचें राज्य कां बरें मिळणार नाहीं ? व राजदंड कां तुह्मी भोगतां ? जर मूर्तिपूजेच्या योगानें भवसागर तरून जातां तर सम्यग्ज्ञानदर्शन व चारित्र कां करीत असतां ? रत्नसा. पृ. १३ मध्यें असें लिहिलें आहे कीं, गौतमाच्या आंगठ्यामध्यें अमृत व त्याच्या स्मरणानें मनोवांछित फळ मिळतें. ( **समीक्षक** ) जर असें असतें तर सर्व जैन लोक अमर झाले पाहिजेत ते होत नाहींत, ह्मणून ही केवळ मूर्खांला भकवण्याची गोष्ट आहे यांत दुसरें कांहीं एक तत्व नाहीं. रत्नसार. पृ. ५२ मध्यें पूजा करण्याचा श्लोक लिहिला आहे तो असा:—

**जलचंदनधूपनैरथ दीपाक्षतकैर्नैवेद्यवस्त्रैः ॥**
**उपचारवरैर्जिनेन्द्रान् रुचिरैरद्य यजामहे ॥**

आह्मी जल, चंदन, अक्षता, पुष्पें, धुप, दीप, नैवेद्य, वस्त्र व अतिश्रेष्ठ उपचारांनीं जिनेंद्र ह्म० तीर्थंकरांची पूजा करतों. यावरूनच आह्मीं ह्मणतों

कीं, जैनांपासून मूर्तिपूजा सुरू झाली. ( विवेकसार पृ. २१ ) जिनमंदिरांमध्ये मोह येत नाहीं, तीं भवसागरांतून पार नेणारी आहे. (विवेक० पृ. ५१–५२) मूर्तिपूजेनें मुक्ति येते. जिनमंदिरांत जाण्यानें सद्गुण मिळतात. जो जलचंदनादिकांनीं तीर्थंकरांची पूजा करील तो नरकांतून सुटून स्वर्गाला जाईल. ( विवेक० पृ. ५५ ) जिनमंदिरांतील ऋषभदेवादि मूर्तींची पूजा करण्यानें धर्म, अर्थ, काम व मोक्ष सिद्ध होतात. ( विवेक० पृ. ६१ ) जिन मूर्तींची पूजा करण्यानें सर्व जगताचे क्लेश नाश पावतील. ( **समीक्षक** ) आतां पहा, यांच्या अविद्यायुक्त असंभव गोष्टी ! जर या प्रकारानें पापादि वाईट कामें सुटून जातील, मोह न येईल, भवसागरांतून पार होतील, सद्गुण प्राप्त होतील व नरकाला सोडून स्वर्गांत जातील, धर्म, अर्थ, काम, मोक्षाला प्राप्त होतील व सर्व क्लेश दूर होतील तर सर्व जैन लोक सुखी व सर्व पदार्थांच्या सिद्धीला प्राप्त झालेले कां नाहींत ? याच विवेकसाराच्या ३ पृष्ठावर लिहिलें आहे कीं, ज्यांनीं जिनमूर्तींची स्थापना केली आहे त्यांनीं आपली व आपल्या कुटुंबाची उपजीविका तयार केली आहे. ( विवे० पृ. २२५ ) शिवविष्णु आदिकांची पूजा करणें फार वाईट गोष्ट आहे, तें नरकाचें साधन आहे. ( **समीक्षक** ) शिवादिकांच्या मूर्ती जर नरकाला साधन आहेत तर जैनांच्या मूर्ती तशाच नाहींत काय ? तर ते ह्मणतील कीं, आमच्या मूर्ती त्यागी, शांत व शुभमुद्रायुक्त आहेत ह्मणून चांगल्या व शिवादिकांच्या मूर्ति तशा नाहींत ह्मणून वाईट आहेत तर त्यावर यांस असें विचारावें कीं, तुमच्या मूर्ती तर लाखों रुपयांच्या मंदिरांत राहतात व चंदन केशरादिकांचा उपभोग घेतात तेव्हां त्या त्यागी कशा ? व शिवादिकांच्या मूर्ती छायेवांचूनहि राहतात तेव्हां त्या त्यागी कां नव्हते ? शांती संबंधानें पाहतां सर्व जड पदार्थ निश्चल असलयामुळें शांतच असतात, तात्पर्य सर्व मतांतील मूर्तिपूजा व्यर्थ आहे. ( प्र० ) आमच्या मूर्ती वस्त्रादिकांचें धारण करीत नाहींत, ह्मणून चांगल्या आहेत. ( उ० ) सर्वांच्या समोर नागव्या मूर्ती ठेवणें व असणें पशुवत् लीला आहे. ( प्र० ) ज्याप्रमाणें स्त्रीचें चित्र किंवा मूर्ती पहाण्यानें कामोत्पत्ति होते, त्याचप्रमाणें साधु किंवा योगी यांच्या मूर्ती पाहून शुभ गुण प्राप्त होतात. ( उ० ) पाषाणादि मूर्ती पाहून जर शुभ गुण येतात असें तुह्मी मानतां तर त्यांतील जडत्वादि गुणहि येत असतील. जडबुद्धि होतील तर ते सर्व नाश पावतील. दुसरें, जे उत्तम विद्वान्

आहेत, त्यांची संगति व सेवा सोडल्यानें मूढताच जास्त वाढेल. जे जे दोष मूर्तिपूजेपासून होतात असें अकराव्या समुल्लासांत लिहिलें आहे ते सर्व पाषाणादि मूर्तिपूजेपासून होतील. ज्याप्रमाणें जैनांनीं मूर्तिपूजेमध्यें असत्य कोलाहल माजवला आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या मंत्रांतहि बऱ्याच असंभव गोष्टी लिहिल्या आहेत यांचा हा मंत्र आहे. रत्नसार. पृ. १:—

**नमो अरिहन्ताणं नमो सिद्धाणं नमो आयरियाणं**
**नमो उवज्झायाणं नमो लोए सव्वसाहूणं एसो पञ्च**
**नमुक्कारो सव्व पावप्पणासणो मंगलाचरणं च सव्वे**
**सिपढमं हवइ मंगलम् ॥ १ ॥**

या मंत्राचें महात्म्य फार लिहिलें आहे कीं, तंत्र पुराण, भाट यांच्या कथांचाहि यांनीं पराभव केला आहे. श्राद्धदिनकृत पृ. ३:—

**नमुक्कार तउपढे ॥ ९ ॥**
**जऊकव्वं । मन्ताणमन्तो परमो इमुत्ति धेयाणधेयं परमं इमुत्ति**
**तत्ताणतत्तं परमं पवित्तं संसारसत्ताणदुहाहयाणम् ॥ १० ॥**
**ताणं अन्नन्तु नो अत्थि ॥ जीवाणं भव सायरे ॥**
**बुड्डूं ताणं इमं मुत्तुं । न मुकारं सुपोययम् ॥ ११ ॥**
**कव्वं अणेगजंमंतरसं चिआणं । दुहाणंसारीरि अमाणुसाणु**
**साणं । कत्तोय भव्वाणविज्जनासो न जावपत्तो नवकारमन्तो ॥१२॥**

जो मंत्र आहे तो पवित्र व परममंत्र आहे. तो ध्यानाच्या योग्य आहे. तो परमध्येय आहे, तत्वांमध्यें परमतत्व आहे, दुःखांनीं पीडित झालेल्या संसारी जीवाला नवकार मंत्र असा आहे कीं, जशी समुद्रांतून पार जाण्याला नौका असते ॥ १० ॥ जो हा नवकार मंत्र आहे तो नौकेसारखा आहे. जे याला सोडतात ते भवसागरांत बुडतात. जे याचें ग्रहण करतात ते दुःखांतून तरून जातात. जीवांला दुःखांतून पृथक् ठेवणारा, सर्व पापांचा नाशक, मुक्तिकारक मंत्र या मंत्राशिवाय दुसरा कोणताच नाहीं. ॥ ११ ॥ अनेक भवान्तरामध्यें उत्पन्न झालेल्या शरीरासंबंधी दुःखापासून भव्य जीवांला तारणारा हाच आहे. जोपर्यंत नवकार मंत्र जपला जात नाहीं, तोंपर्यंत जीव हा भवसागरांतून तरत नाहीं. हा अर्थ सूत्रांत सांगितला आहे. अग्निप्रमुख अष्टमहाभयांमध्यें सहाय्य

करणारा नवकार मंत्राशिवाय दुसरा कोणीच नाहीं. जसें महारत्न वैडूर्य मण्याचें ग्रहण करणें व शत्रूच्या भयाच्या वेळीं अमोघशस्त्र ग्रहण करणें त्याचप्रमाणें श्रुत केवलीचें ग्रहण करणें आहे, हेंच सर्व द्वादशांगीं नवकार मंत्राचें रहस्य आहे. ॥ २ ॥ या मंत्राचा अर्थ हा आहे:—( नमो अरिहन्ताणं ) सर्व तीर्थंकरांला नमस्कार, ( नमो सिद्धाणं ) जैनमताच्या सर्व सिद्धांला नमस्कार, ( नमो आयरियाणं ) जैनमताच्या सर्व आचार्यांला नमस्कार, ( नमो उवज्झायाणं ) जैनमताच्या सर्व उपाध्यायांला नमस्कार, (नमो लोए सव्व साहूणं) जैनमताचे जे सर्व साधु या लोकांत आहेत त्यांना नमस्कार असो. जरी मंत्रामध्यें जैनपद नाहीं तथापि जैनमताच्या सर्व ग्रंथामध्यें जैनाशिवाय अन्याला नमस्कार करूं नये असें लिहिलें आहे ह्मणून वरील अर्थ ठीक आहे. ( तत्त्वविवेक पृ. १६९ ) जो मनुष्य लांकूड व दगड यांना देवबुद्धिनें पूजतो त्याला चांगलीं फळें प्राप्त होतात. ( समीक्षक ) जर असें असेल तर सर्व लोक दर्शन करून सुखरूप फलांला कां प्राप्त होत नाहीं ? ( रत्नसार भाग पृ. १९ ) पार्श्वनाथाच्या मूर्तीच्या दर्शनानें पापें नाश पावतात. ( कल्पभाष्य पृ. ५१ ) मध्यें लिहिलें आहे कीं, सवालक्ष मंदिरांचा जीर्णोद्धार केला. इत्यादि मूर्तिपूजा विषयांमध्यें यांचा बराच लेख आहे. यावरून उघड होतें कीं, मूर्तिपूजेचें मूळकारण जैनमत आहे.

आतां जैनांच्या साधूची लीला पहा:—(विवेकसार पृ. २२८ ) मध्यें असें लिहिलें आहे कीं, एक जैनमताचा साधू कोशा वेश्येशीं भोग करून नंतर त्यागी होऊन स्वर्ग लोकाला गेला. ( विवे० पृ. १० ) अर्णकमुनि चरित्रांतून चुकून कित्येक वर्षेपर्यंत दत्तशेटाच्या घरीं विषयोपभोग करून नंतर देवलोकाला गेले. श्रीकृष्णाचा पुत्र ढंढणमुनीला कोल्हा घेऊन गेला नंतर देवता झाला ! ( विवेक. १५६ ) जैनमताचा साधु जरी केवळ वेषधारी असला तरी त्याचा सत्कार लोकांनीं करावा, साधु शुद्ध चारित्र असो किंवा अशुद्ध चारित्र असो, सर्व पूजनीय असतात. ( विवेक० १६८ ) जैनमताचा साधु चारित्रहीन असला तरीहि तो अन्यमताच्या साधुपेक्षां श्रेष्ठ असतो. ( विवेक० १७१ ) श्रावक लोकांनीं जैनमताच्या साधूला चारित्रहीन भ्रष्टाचार पाहिलें तरीहि त्यांनीं त्यांची सेवा करावी. ( विवेक० २१६ ) एका चोरानें पांच मुठी चोरून चारित्र ग्रहण केलें, त्याला फार वाईट वाटलें व फार पश्चाताप वाटला, सहा महिन्यांत तो केवळ ज्ञान पावून सिद्ध झाला.

(समीक्षक) आतां यांच्या साधूंची व गृहस्थांची लीला पहा ! बहुत कुकर्म करणारा साधूहि यांच्या मतानें सद्गतीला गेला ! ! ! (विवेक० पृ. १०६ ) मध्यें लिहिलें आहे कीं, श्रीकृष्ण तिसऱ्या नरकांत गेला. ( विवेक० पृ. १४५ ) मध्यें लिहिलें आहे कीं धन्वंतरि नरकांत गेला. ( विवेक० ४८ ) मध्यें लिहिलें आहे कीं योगी, जंगम, काजी, मुल्ला कितीतरी अज्ञानानें तप व कष्ट करून कुगतीला गेले आहेत. ( रत्नसार० १७१ ) मध्यें लिहिलें आहे कीं, नव वासुदेव अर्थात् त्रिपृष्ठ वासुदेव, द्विपृष्ठ वासुदेव, स्वयम्भू वासुदेव, पुरुषोत्तम वासुदेव, सिंहपुरुष वासुदेव, पुरुष पुण्डरीक वासुदेव, दत्त वासुदेव, लक्ष्मण वासुदेव व श्रीकृष्ण वासुदेव हे सर्व अकराव्या, बाराव्या, चौदाव्या, पंधराव्या, अठराव्या व बाविसाव्या तीर्थंकरांच्या वेळीं नरकाला गेले आणि नवप्रति वासुदेव अर्थात् अश्वग्रीव प्रति वासुदेव, तारकप्रति वासुदेव, मोदकप्रति वासुदेव, मधुप्रति वासुदेव, निशुंभप्रति वासुदेव, बलीप्रति वासुदेव, प्रल्हादप्रति वासुदेव, रावणप्रति वासुदेव, जरासिंधुप्रति वासुदेव, हे सर्व नरकांत गेले. व कल्पभाष्यामध्यें लिहिलें आहे कीं, ऋषभदेवापासून महावीरापर्यंत झालेले २४ तीर्थंकर सर्व मोक्षाला गेले. ( समीक्षक ) बुद्धिमान् पुरषांनीं येथें विचार करावा कीं, जैनांचे साधु, गृहस्थ व तीर्थंकर यांपैकीं बहुत लोक वेश्यागामी, परस्त्रीगामी, चोर असे असूनहि ते जैनमतांमध्यें असल्यामुळें सर्व स्वर्गाला व मुक्तीला गेले, श्रीकृष्णादि धार्मिक महात्मे सर्व नरकाला गेले ही किती वाईट गोष्ट आहे ? विचार करून पाहिलें तर असें आढळेल कीं, उत्तम पुरुषांनीं जैनांची संगति करणें किंवा त्यांना पाहणें हेंहि वाईट आहे, कारण जे यांच्या संगतींत राहतील त्यांच्या हृदयांत अशाच वाईट गोष्टी शिरतील. या महाहट्टी व दुराग्रही मनुष्यांच्या संगतीपासून वाईट गोष्टींशिवाय आणखी कांहींच गांठीं पडणार नाहीं. हां, जे जैनांमध्यें उत्तम जन* आहेत त्यांच्या संगतीपासून कांहींच दोष होणार नाहीं. ( विवेक० पृ. ५५ ) वर लिहिलें आहे कीं गंगादि तीर्थें व काशी आदि क्षेत्रांचें सेवन केल्यानें कांहींएक परमार्थ साधणार नाहीं. पण त्यांची गिरिनार, पालिताणा व आबू वगैरे तीर्थें व क्षेत्रें मुक्ति देणारीं आहेत. (समीक्षक) याठिकाणीं असा विचार केला पाहिजे कीं, जशीं शैव वैष्णवादिकांची तीर्थें व क्षेत्रें जल, स्थल व जड स्वरूप आहेत त्याचप्रमाणें जैनांची आहेत. यांतील एकाची निंदा व दुसऱ्याची स्तुति करणें हें मूर्खपणाचें काम आहे.

---

* जे उत्तम लोक असतील ते या असार जैन मतामध्यें कधींहि राहणार नाहींत.

## ( १० ) जैनांच्या मुक्तीचें वर्णन.

( रत्नसार भा. पृ. २३ ) महावीर तीर्थंकर गौतमाला ह्मणतो कीं, उर्ध्व लोकांमध्यें एक सिद्धशिला स्थान आहे. स्वर्गपुरीच्या वर पंचेचाळीस लक्ष योजनें लांब व तितकीच रुंद आहे, व आठ योजनें जाड आहे जसा मोत्यांचा श्वेतहार असतो किंवा जसें गोदुग्ध असतें त्यापेक्षांहि ती उज्वल आहे. सोन्याप्रमाणें प्रकाशणारी व स्फटिकाहून निर्मळ आहे. ही सिद्धशिला १४ व्या लोकांच्या शिखरावर आहे. या सिद्धशिलेवर शिवपुरधाम आहे. त्यामध्येंहि मुक्त पुरुष अधर राहतात. तेथें जन्ममरणादि कोणताच दोष नाहीं व आनंदानें ते तेथें राहतात. पुनः जन्ममरणांत येत नाहींत व सर्व कर्मांपासून सुटतात. हीं जैनांची मुक्ति आहे. ( समीक्षक ) याठिकाणीं असा विचार केला पाहिजे कीं, ज्याप्रमाणें अन्यमतांमध्यें वैकुंठ, कैलास, गोलोक, श्रीपूर वगैरे पौराणिकांनीं, चौथें आकाश खिस्ती लोकांनीं व सातवें आकाश मुसलमानांनीं मुक्तीचें स्थान लिहिलें आहे. त्याचप्रमाणें जैनांनीं सिद्धशिला व शिवपुर लिहिलें आहे. ज्याला जैन लोक वर असें मानतात, तोच भाग आमच्या भूगोलाच्या खालच्या प्रदेशांत राहणाऱ्या लोकांना खालीं आहे असें वाटतें. उच्चनीच हे अपेक्षेनें आहेत. ते व्यवस्थित पदार्थ नाहींत. ज्याला आर्यावर्तांतील जैनी लोक उंच मानतात त्यालाच अमेरिकेंतील लोक नीच मानतात व अमेरिकेंतील लोक उच्च भाग समजतात त्यालाच आर्यावर्तांतील लोक नीच भाग समजतात. ती शिला पंचेचाळीस नव्हे दुप्पट नव्वद लक्ष मैल जरी असली तथापि तेथें गेलेले मुक्त नसून ते बंधनामध्येंच आहेत, कारण जर ते त्या शिलेच्या व शिवपुराच्या बाहेर आले तर त्यांची मुक्ति नाश पावत असेल. त्या मुक्तानां सदा तेथेंच राहण्याची प्रीति व तेथून बाहेर जाण्याविषयीं अप्रीति होत असेल, असा जेथें अटकाव, प्रीति व अप्रीति आहे तेथें मुक्ति आहे असें कसें ह्मणतां येईल ? जशी नवव्या समुल्लासामध्यें लिहिली आहे तशीच मुक्ति मानणें ठीक आहे, ही जैनांची मुक्ति ह्मणजे एक प्रकारचें बंधनच आहे. जैनलोकहि मुक्तिच्या विषयामध्यें भ्रमानें फसले आहेत. हें खरें आहे कीं, वेदांच्या ज्ञानाशिवाय यथार्थ अर्थबोध होऊन मुक्तिच्या स्वरूपाला कोणीहि जाणूं शकत नाहींत.

आतां आणखी यांच्या कांहीं असंभव गोष्टी ऐका. ( विवेकसार पृ. ७८ ) एक कोटी साठ लक्ष कलशांनीं महावीराला जन्मसमयीं स्नान घातलें होतें. ( विवेक पृ. १३६ ) दशार्ण राजा महावीराच्या दर्शनाला गेला. तेथें त्याला अभिमान झाला. तेव्हां त्याच्या निवारणासाठीं—१६,७७,७२,१६००० इतकीं इंद्राचीं स्वरूपें व १३,३७,०५,७२,८०,००,००,००० इतक्या इन्द्राण्या तेथें आल्या होत्या. त्यांना पाहून राजाला आश्चर्य वाटलें. ( समीक्षक ) याठिकाणीं असा विचार केला पाहिजे कीं त्या इतक्या इंद्र इंद्रिण्याला उभें राहण्याला असले किती भूगोल पाहिजेत ?

श्राद्धदिनकृत्य ( आत्मनिंदाभावना पृ. ३१ ) मध्यें लिहिलें आहे कीं, विहीर, कुवा व तलाव बनवूं नये. ( समीक्षक ) जर सर्व मनुष्य जैन झाले तर कोणीहि विहीर, कुवा व तलाव खणणार नाहीं मग सर्व लोक पाणी कोठून पितील ? ( प्र० ) तलावादि बांधण्यापासून त्यांत जीव पडतात व त्यामुळें बांधणाराला पाप लागतें, ह्मणून आह्मी जैन लोक हें काम करीत नाहीं. ( उ० ) तुमची बुद्धि कां बरें नाश पावली ? जसें तुह्मी क्षुद्र जीवांच्या मरणानें पाप होतें असें ह्मणतां तर गाय मनुष्यादि मोठमोठे प्राणी असतात त्यांना पाणी मिळून जें महापुण्य होणार त्याची गणना कां बरें करीत नाहीं ? ( तत्वविवेचक पृ. १९६ ) एका नगरीमध्यें मणिकार शेटजीनें विहीर बांधिली, त्यामुळें तो धर्मभ्रष्ट होऊन त्याला सोळा महारोग झाले. मेल्यानंतर त्याच विहिरीमध्यें एक प्राणी झाला, महावीराच्या दर्शनानें त्याला जातिस्मरण झालें. महावीर ह्मणतात कीं, मी आलों हें पाहून त्यानें धर्माचार्य असें जाणून वन्दनाला येऊं लागला. मार्गांमध्यें श्रेणिकाच्या घोड्याच्या टापेनें मेला, नंतर या शुभध्यानाच्या योगानें दर्दूरांक नामक महार्द्धिक देवता बनला. अवधिज्ञानाच्या योगानें मी येथें आलों आहे असें जाणून वन्दनापूर्वक ऋद्धि दाखवून गेला ( समीक्षक ) इत्यादि विद्याविरूद्ध असंभव खोट्या गोष्टी सांगणाऱ्या महावीराला सर्वोत्तम मानणें भ्रमांचें लक्षण आहे.

श्राद्ध दिनकृत्य पृ. ३६ मध्यें लिहिलें आहे कीं, मृतकावरील वस्त्र साधूनें घ्यावें. ( समीक्षक ) पहा. यांचे साधूहि महाब्राह्मणासारखेच झाले. वस्त्र साधूनें घ्यावें पण मृतकाचीं आभूषणें कोणी घ्यावीं ? बहुमूल्य असलीं तर घरांतच ठेवीत असतील ! ( रत्नसार पृ० १०५ ) भाजणें, कुटणें दळणें अन्न शिजविणें यांमध्यें पाप आहे. ( समीक्षक ) आतां पहा यांची विद्या—

हीनता ! जर हीं कर्मे न केलीं तर मनुष्य प्राणी कसें बरें जगतील ? व जैन-लोक पीडित होऊन मरून जातील. ( रत्नसार. १०४ ) बाग लावल्यामुळें एक लक्ष पापें माळ्याला लागतात. ( समीक्षक ) जर माळ्याला लक्ष पापें लागतात तर त्या वृक्षांच्या पत्र, फळ, फूल, छाया यांपासून अनेक जीवाला आनंद होतो त्यापासून कोटीगुण पुण्य होतें याकडे कांहींच लक्ष्य नाहीं हा किती अंधेर आहे ! ( तत्वविवेक पृ. २०२ ) एके दिवशीं लब्धी साधू चुकीनें वेश्येच्या घरीं गेला व धर्मानें भिक्षा मागितली, वेश्या ह्मणाली कीं येथें धर्माचें काम नाहीं, पण अर्थाचें काम आहे, तेव्हां त्या लब्धी साधूनें साडे बारा लक्ष मोहरांचा वर्षाव तिच्या घरीं केला. (समीक्षक) या गोष्टीला नष्टबुद्धि माणसाशिवाय कोण मान देणार ? ( रत्नसार पृ. ६७) मध्यें लिहिलें आहे कीं, एक पाषाणमूर्ति घोड्यावर बसली आहे असें जेव्हां स्मरण करावें तेव्हां ती तेथें उपस्थित होऊन रक्षण करते. ( समीक्षक ) सांगा जैनजी ! आजकाल तुमच्या घरीं चोरी, डाका, शत्रूचें भय होतच असतें, तेव्हां तुह्मी त्या मूर्तीचें स्मरण करून आपलें रक्षण कां करून घेत नाहीं ? कां बरें मग पोलिसादिकांच्या व राजस्थानांच्या मागें फिरत असतां ?

## ( ११ ) जैनांच्या साधूंचीं लक्षणें.

सरजोहरणं भैक्ष्यभुजो लुञ्चितमूर्द्धजाः ॥
श्वेताम्बरा क्षमाशीला निःसंगा जैनसाधवः ॥ १ ॥
लुञ्चिताः पिच्छिकाहस्ताः पाणिपात्रा दिगम्बराः ॥
ऊर्ध्वाशिनो गृहे दातुर्द्वितीयाः स्युर्जिनर्षयः ॥ २ ॥
भुङ्क्ते न केवलं न स्त्रीमोक्षमेति दिगंबरः ॥
प्राहुरेषामयं भेदो महान् श्वेताम्बरैः सह ॥ ३ ॥

जैनांच्या साधूंचीं लक्षणें समजावीं ह्मणून जिनदत्तसूरीनें हे श्लोक केले आहेत. ( सरजोहरण ) चवरी घेणें, भिक्षा मागून खाणें, डोक्यावरील केस लुंचित करणें, श्वेत वस्त्र धारण करणें, क्षमायुक्त राहणें, कशाचीहि संगति न धरणें, अशा लक्षणांनीं युक्त असणाऱ्या श्वेतांबर जैनांला यति असें म्हणतात ॥ १ ॥ दुसरें, दिगंबर ह्म० वस्त्र धारण न करणें, डोक्यावरील केस उपटणें, पिच्छिका, एक लोकरीच्या सुतांचा गोळा (रजोहरण) झाडण्यासाठीं बगलेंत धरणें, जर कोणी भिक्षा दिली तर ती हातांत घेऊन खाणें, हे दिगंबर दुसऱ्या

प्रकारचे साधु असतात ॥ २ ॥ भिक्षा देणारा गृहस्थ जेवून उठला ह्मणजे मग त्याच्या मागून जेवण करणारे ते जिनर्षि तिसऱ्या प्रकारचे साधु होत. दिगंबर व श्वेतांबर यांमध्यें इतकाच भेद आहे कीं, दिगंबर लोक स्त्रियांला अपवर्ग मानीत नाहींत व श्वेतांबर मानतात. इत्यादि गोष्टीना मोक्ष होतो ॥ ३ ॥ हे यांच्यांत साधूंचे भेद आहेत. जैन लोकांचें केशलुञ्चन सर्वत्र प्रसिद्ध आहे. व पांच मुष्टि लुंचन करावें असेंहि लिहिलें आहे. ( विवेकसार २१६ पृ. ) मध्यें लिहिलें आहे कीं, पांच मुष्टि लुंचन करून चारित्र ग्रहण केलें अर्थात् डोक्यावरचे पांच मुष्टि केंस उपटून काढून साधु झाला, ( कल्पसूत्रभाष्य पृ. १०८ ) केशलुञ्चन करावें, गाईच्या केसांप्रमाणें केंस ठेवावे. ( समीक्षक ) जैन लोकहो आतां सांगा कीं, तुमचा दयाधर्म आतां कोठें आहे ? काय ही हिंसा नव्हे ? आपण स्वतः गुरूनें किंवा कोणीहि जरी केंस उपटलें तथापि जीवाला किती कष्ट होत असले पाहिजेत ? जीवाला कष्ट देणें हीच हिंसा होय. विवेकसारमध्यें सवंत १६३३ सालीं श्वेतांबरांमधील ढुंढिया व ढुंढियामधील तेरा पंथी ढोंगी निघाले. असें लिहिलें आहे. ढूंढिये लोक पाषाणादि मूर्तीला मानत नाहींत. व ते भोजन, स्नान इत्यादि वेळा सोडून सर्वदा तोंडावर पट्टी बांधून ठेवतात. व जे जति असतात ते फक्त पुस्तक वाचावयाच्या वेळेलाच तोंडावर पट्टी बांधतात. अन्य समयीं नाहीं. ( प्रश्न ) मुखावर पट्टी अवश्य बांधली पाहिजे. कां कीं, वायुकायामध्यें ह्म० वायूमध्यें जे सूक्ष्म शरीरवाले जीव राहतात ते मुखाच्या वाफेच्या ऊष्णतेनें मरतात. जे मुखावर पट्टी बांधीत नाहींत त्यांना त्याबद्दल पाप लागतें. ह्मणून तोंडावर पट्टी बांधणें चांगलें असें आह्मी समजतों. (उ०) ही गोष्ट विद्या व प्रत्यक्षादि प्रमाणांच्या विरुद्ध असल्यामुळें अयुक्त आहे, कारण जीव अजर अमर आहेत ह्मणून ते मुखाच्या वाफेनें मरूं शकणार नाहींत. त्यांना तुह्मीहि अजर व अमर मानत आहांत. ( प्र० ) जीव मरत नाहीं, पण मुखांतील ऊष्णवायूनें त्यांना पीडा होते. अशी त्यांना पीडा देणाऱ्यांना पाप लागतें ह्मणून मुखावर पट्टी बांधावी हें चांगलें. ( उ० ) ही गोष्ट सर्वथा असंभव आहे. कारण पीडा दिल्यावांचून कोणत्याहि जीवाचा थोडा वेळ सुद्धां निर्वाह होऊं शकत नाहीं. ज्याअर्थी तुमच्या मतानें मुखाच्या वायूपासून जीवाला पीडा होते त्याअर्थी चालणें, फिरणें, बसणें, उठणें, हात फिरविणें, डोळे मिचकावणें इत्यादि क्रियापासूनहि त्यांस पीडा होत असली

पाहिजे. तात्पर्य, तुह्मी जीवाला पीडा पोंचवल्यावांचून राहूं शकत नाहीं. (प्र०) जोंपर्यंत शक्य आहे तोंपर्यंत जीवांचें रक्षण केलें पाहिजे. व जेथें आमचें कांहीं चालत नाहीं तेथें आमचा निरुपाय आहे. सर्व वायु आदिक पदार्थांतील जीव मरत असतात, आह्मी मुखावर कपडा बांधला नाहीं तर ते जास्त मरतील व बांधला असतां कमी मरतील. (उ.) हेंहि तुमचें कथन युक्तिशून्य आहे; कारण कपडा बांधण्यानें जीवाला अधिक दुःख पोंचतें. जेव्हां कोणी मुखावर कपडा बांधतो तेव्हां त्यांच्या तोंडांतील वायूला प्रतिबंध झाल्यामुळें तो खालीं जातो किंवा मौनसमयीं नासिकद्वारा एकत्र होऊन वेगानें बाहेर पडतो. या योगानें उष्णता अधिक होऊन तुमच्या मताप्रमाणेंच जीवाला अधिक पीडा होते. पहा! जेव्हां घराचे किंवा खोलीचे सर्व दरवाजे बंद केले असतां किंवा पडदे बांधले असतां तीमध्यें विशेष उष्णता होते. दरवाजे उघडे ठेवले असतां तशी होत नाहीं. याचप्रमाणें मुखावर कपडा बांधण्यापासून जास्त उष्णता होते व तोंड मोकळें ठेवलें असतां न्यून होते. तात्पर्य, तुह्मी तुमच्याच मतानुसार जीवांला अधिक दुःखदायक होत आहांत. जोंपर्यंत तुमचें तोंड बांधलेलें असतें तोंपर्यंत वायु एकत्र होऊन नासिकद्वारा वेगानें बाहेर पडतो व तेथील जीवांना जास्त धक्का व पीडा देतो. पहा! जसा कोणी त्रिस्तवाला तोंडानें फुंकून पेटवतो व कोणी नळीनें फुंकतो, तर त्यामध्यें तोंडानें फुंकणाऱ्याचा वायु एकत्र होऊन जात नसल्यामुळें अग्नि लवकर पेटत नाहीं, पण नळीनें एकत्रित होऊन जात असल्यामुळें तो लवकर पेटतो कारण तो नळींतून अधिक वेगानें अग्नीवर लागतो, त्याचप्रमाणें तोंडावर पट्टी बांधल्यानें वायूला प्रतिबंध होऊन नाकावाटें तो वेगानें बाहेर पडतो व जीवांला जास्त दुःख देतो. ह्मणून तोंडावर पट्टी बांधणाऱ्यापेक्षां न बांधणारे धर्मात्मे जास्त आहेत. तोंडावर पट्टी बांधण्यानें अक्षरांचें उच्चारण, स्थान व प्रयत्न ठीक होत नसल्यामुळेंहि, नीट होऊं शकत नाहीं. निरनुनासिक अक्षरांचें सानुनासिक उच्चारण केल्यानें तुह्मांला दोष लागेल. तसेंच तोंडावर पट्टी बांधल्यानें दुर्गंधहि अधिक वाढतो, कारण शरीरांत दुर्गंध भरलेला आहे. शरीरांतून जितका वायू बाहेर पडतो तो दुर्गंधयुक्त असतो हें प्रत्यक्ष आहे. त्याला प्रतिबंध झाला असतां दुर्गंध जास्त वाढतो. जशी दुर्गंधाची जागा बंद असल्यास तींत दुर्गंध जास्त असतो व तीच खुली असली तर तितका नसतो. त्याचप्रमाणें मुखावर पट्टी बांधल्यानें जास्त दुर्गंध वाढतो. दंतधावन, मुखप्रक्षालन, स्नान न कर-

ल्यानें व वस्त्र न धुण्यानें तुमच्या शरीरांपासून जास्त दुर्गंध उत्पन्न होऊन या जगांत बहुत रोग उत्पन्न होऊन जीवांला पीडा पोंचवितात तितके तुह्मांला जास्त पाप लागतें. ज्याप्रमाणें जत्रेमध्यें मळ जास्त झाल्यामुळें महामारीचा उपद्रव सुरू होतो व जीवाला अनेक प्रकारें त्रास होतो. दुर्गंध उत्पन्न न झाला तर हे रोग होत नाहींत व जीवालाहि दुःख होत नाहीं. ह्मणून तुह्मी दुर्गंध वाढवीत असल्यामुळें अधिक अपराधी आहांत; व जे तोंडावर पट्टी बांधीत नाहींत, मुखप्रक्षालन, दंतधावन, स्नान व वस्त्रक्षालन करतात ते शुद्ध राहत असल्यामुळें तुमच्यापेक्षां जास्त चांगले. ज्याप्रमाणें अंत्यजाच्या सहवासानें बुद्धिहि निर्मल होत नसते, त्याचप्रमाणें तुमच्या सहवासानें बुद्धिहि वाढत नाहीं. रोग जास्त होण्यानें व बुद्धि कमी झाल्यानें धर्मानुष्ठानहि ठीक होऊं शकत नाहीं, अशीच स्थिति नेहेमीं दुर्गंधयुक्त असणाऱ्या तुमची व तुमच्या संगतीनें असणारांची अवश्य होत असते. (प्र०) ज्याप्रमाणें बंद असलेल्या घरांत ठेवलेल्या अग्नीची ज्वाला बाहेर पडून बाहेरच्या जीवाला त्रास देणारा होत नाहीं, त्याचप्रमाणें आह्मी तोंडावर पट्टी बांधून वायूला प्रतिबंध करून बाहेरच्या जीवांला कमी दुःख पोंचवीत असतों. मुखावर पट्टी बांधण्यानें बाहेरच्या जीवांला दुःख पोंचत नाहीं. जवळ जवळ असलेल्या अग्नीवर आडवा हात धरण्यानें जसा त्या अग्नीपासून कमी त्रास होतो त्याचप्रमाणें तोंडावर प्रतिबंध पडदा नसेल तर एकदम तोंडांतील उष्ण वायूनें तोंडाबाहेरील वायूंतील जीवांना जास्त पीडा अवश्य झाली पाहिजे. ( उ. ) ही तुमची गोष्ट बालबुद्धीची आहे. प्रथम हें पहा कीं, जेथें छिद्र नाहीं व बाहेरील वायूचा आंतील वायूशीं संबंध नाहीं तेथें अग्नि जळूंच शकत नाहीं. जर हें तुह्मांला प्रत्यक्ष पाहावयाचें असेल तर एका कंदिलांत दिवा ठेवून त्याचीं सर्व छिद्रें बंद करा ह्मणजे थोड्याच वेळांत तो दिवा विझेल. ज्याप्रमाणें पृथिवीवर रहाणारे प्राणी बाहेरच्या वायूच्या योगाशिवाय जगूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें अग्नीहि जळूं शकत नाहीं. जर अग्नीच्या प्रगतीचा एका बाजूनें निरोध केला तर दुसऱ्या बाजूनें तो अधिक वेगानें निघून जाईल. तोंडाच्या आड हात धरला तर तोंडाच्या वाफेनें आपणाला जास्त आंच लागते खरी पण ती हातावर अधिक लागत असते. ह्मणून तुमची गोष्ट सत्य नाहीं. ( प्र. ) हें सर्व लोक जाणतात कीं, कोणा मोठ्या मनुष्याच्या कानांत कांहीं बोलावयाचें असेल तर आपल्या तोंडावर हातरुमाल किंवा हात धरून बोलतात. कारण कीं, आपल्या

मुखांतील थुंकी किंवा दुर्गंधि त्याला लागूं नये. त्याचप्रमाणें जेव्हां कोणी पुस्तक वाचूं लागलें असतां त्यावर अवश्य थुंकी उडते व तें उच्छिष्ट होतें व बिघडतें ह्मणून मुखावर पट्टी बांधणें उत्तम आहे. ( उ. ) यावरून हें सिद्ध झालें कीं, जीव रक्षणासाठीं पट्टी बांधणें व्यर्थ आहे. जेव्हां मोठ्या माणसांच्या कानांत बोलावयाचें असतां तोंडावर रुमाल एवढ्यासाठीं धरितात कीं, करावयाची गुप्त गोष्ट तिसऱ्या कोणाला ऐकूं येऊं नये पण जेव्हां उघड गोष्टी बोलावयाच्या असतात तेव्हां कोणीही तोंडावर पडदा धरीत नाहीं यावरून हें उघड होतें कीं, हें सर्व गुप्त गोष्टीसाठीं आहे. दंतधावनादि न करण्यानें तर तुमच्या तोंडांतून फारच दुर्गंध निघत असतो, व जेव्हां तुह्मी कोणाजवळ किंवा कोणी तुह्मांजवळ येत असेल तेव्हां त्याला दुर्गंधीशिवाय आणखी काय मिळणार आहे ? अशीं तोंडावर पडदा धरण्याची बहुत अन्य कारणें आहेत. पुष्कळ मनुष्यांसमोर गुप्त गोष्ट एकाच्याच कानांत सांगावयाची असल्यास जर तोंडावर पडदा धरला नाहीं तर तोंडांतील निघालेला वायु जसा पसरेल तसे ते शब्दही पसरतील. जेव्हां ते दोघे एकांतांत असतात, तेव्हां तोंडावर कपडा धरण्याचें कांहींच कारण नसतें. कारण तेथें ऐकणारा तिसरा कोणी नसतोच. थोरांवर थुंकी पडूं नये ह्मणजे काय लहानांवर पडावी ? व त्या थुंकीपासून बचूंही शकत नाहींत. आह्मी जरी दुरून गोष्टी केल्या व वायु आमच्याकडे किंवा दुसऱ्याकडे वाहात असला तर थुंकी वायूच्या बरोबर सूक्ष्म होऊन त्रसरेणू अंगावर अवश्य पडत असतील. याचा दोष मोजणें ही अविद्येची गोष्ट आहे. तोंडाच्या वाफेनें जीवाला दुःख पोंचत असेल किंवा ते मरत असतील तर वैशाख व जेष्ठ महिन्यांतील सूर्याच्या महान उष्णतेनें वायुकायांतील जीव मेल्यावांचून एकहि राहूं शकत नाहींत; पण त्या उष्णतेनेंहि जीव मरूं शकत नाहींत, ह्मणून तुमचा सिद्धांत असत्य आहे. जर तुमचे तीर्थंकर पूर्ण विद्वान् असते तर अशा व्यर्थ गोष्टी कां करते ? पहा ! त्या जीवांला पीडा पोंचते कीं ज्यांची वृत्ति सर्व अवयवांसह विद्यमान असते. पहा:—

पंचावयवयोगात्सुखसंवित्तिः ॥ सांख्य ५।२७ ॥

जेव्हां पांच इंद्रियांचा पांच विषयांशीं संबंध घडतो तेव्हांच सुखाची किंवा दुःखाची प्राप्ति जीवांला होते. जसें बहिऱ्याला गालिप्रदान, आंधळ्याला रूप, किंवा जवळून भयानक सर्प व्याघ्रादिकांचें गमन, शून्य बधिराला स्पर्श,

पीनस रोग्याला गंध, व शून्य जिह्वावाल्याला रस यांची प्राप्ति होत नाहीं, त्याचप्रमाणें त्या जीवांचीहि व्यवस्था आहे. पहा ! जेव्हां मनुष्याचा जीव सुषुप्तिदशेमध्यें असतो, तेव्हां त्याला सुख किंवा दुःख यांची प्राप्ति होत नसते, कारण तो शरीराच्या आंत तर असतोच पण त्याचा शरीराच्या बाहेरील अवयवांशीं संबंध नसतो, म्हणून त्याला सुखदुःखाची प्राप्ति होत नाहीं. वैद्य लोक व सध्यांचे डॉक्टर नशा येण्याचें औषध देऊन मनुष्याला गुंगवून त्याला चिरतात, तेव्हां मुळींच दुःख विदित होत नसतें, त्याचप्रमाणें वायुकायांतील व अन्य स्थावर शरीरयुक्त जीवांला दुःख किंवा सुख प्राप्त होत नाहीं, तेव्हां पीडेपासून त्यांना सोडवण्याची गोष्ट कशी बरें सिद्ध होईल ? जेव्हां जेव्हां त्यांना सुखदुःखाची प्राप्ति प्रत्यक्ष नाहीं तेव्हां अनुमानादिक येथें युक्त कसे बरें होऊं शकतील ? ( प्र० ) ज्या अर्थीं ते जीव आहेत त्या अर्थीं त्यांना का बरें सुखदुःख होण्यासारखें नाहीं ? ( प्र० ) ऐका भोळे लोक हो ! तुह्मी जेव्हां सुषुप्तिमध्यें असतां तेव्हां तुह्मांला सुखदुःख कां बरें प्राप्त होत नसतें ? प्रसिद्ध संबंध हाच सुखदुःखाच्या प्राप्तीचा हेतु आहे. आतांच याचें उत्तर आह्मी दिलें आहे कीं, नशा येण्याचें औषध देऊन डॉक्टरलोक रोग्याला फाडतात तरीहि त्याला दुःख विदित होत नाहीं, त्याचप्रमाणें अतिमूर्छित जीवांना सुखदुःख कसें प्राप्त होईल ? कारण तेथें त्यांची प्राप्ति होण्याचें कोणतेंच साधन नसतें. ( प्र० ) पहा ! हिरव्या शाकपाक कंद यांना आह्मीं खात नाहीं, कारण हिरव्या भाजींत व कंदमूळांमध्यें अनंत जीव असतात. जर आह्मीं त्यांना खाल्ले तर त्यांना मारण्याचें व पीडा देण्याचें पाप आह्मांला लागेल. ( उ० ) ही तुमची भयंकर अज्ञानाची गोष्ट आहे. हरित शाक खाण्यानें जीवांला मारणें व त्यांना पीडा देणें हें कोणत्या आधारावरून तुह्मी मानतां ? जर त्यांना पीडा झालेली तुह्मांला प्रत्यक्ष दिसते तरी आह्मांला तरी प्रत्यक्ष दाखवा, ती तुह्मांलाहि प्रत्यक्ष दिसणार नाहीं व आह्मालाहि तुह्मी दाखवूं शकणार नाहीं. जेथें प्रत्यक्ष नाहीं तेथें अनुमान, उपमान व शब्दप्रमाणहि लागू होऊं शकत नाहीं. वर जें आह्मीं उत्तर दिलें आहे तें या गोष्टीलाहि लागू पडतें. अत्यंत अंधःकार, महासुषुप्ति व महानशा यांमध्यें असणाऱ्या जीवांला सुखदुःख होतें असें मानणें ही तुमच्या तीर्थकरांचीहि चूक आहे. या तीर्थंकरांनीं तुह्मांला ही युक्ति व विद्या यांच्या विरुद्ध गोष्टीचा उपदेश केला ! जर घर सान्त आहे तर त्यांत राहणारे अनंत कसे

असें शकतील ? जर कंद हा अनंतवान् आहे असें आह्मी पाहतो तर त्यांत राहणारेहि सान्तच ( नियमित ) असले पाहिजेत. ज्या अर्थी त्यांना तुह्मी अनंत मानतां त्या अर्थी तुमची ती मोठी चुकी आहे (प्र०) पहा ! तुह्मी तापविल्यावाचूनच कच्चें पाणी पितां हें फार पाप करीत आहांत. जसें आह्मी तापविलेलें पाणी पितों त्याचप्रमाणें तुह्मीहि प्या.(उ०)हीहि तुमची अयुक्त गोष्ट आहे कारण कीं, जेव्हां पाणी तापवितां तेव्हां त्यांतील जीव मरून जातात, व त्यांच्या प्रेतांच्या अर्कानें तें पाणी युक्त असल्यामुळें तें पाणी ह्मणजे त्यांच्या शरीरांचें आसव तुह्मी पितां असें ह्मणण्यांस हरकत नाहीं, अर्थात् तुह्मी फार पापी आहांत. जे थंड पाणी पितात ते तसे नाहींत. कारण, जे थंड पाणी पितात तें पाणी प्याल्याबरोबर पोटांत जातें व तेथें तें थोडेसें ऊन होतें व त्यांतील जीव श्वासाबरोबर बाहेर पडतात. तात्पर्य, या रीतीनें पाहतां जलकायांतील सुखदुःख होतें असें संभवत नाहीं. तेव्हां त्यापासून पापहि कोणाला होणार नाहीं. ( प्र० ) ज्याप्रमाणें जठराग्नीनें तापलेल्या पाण्यांतून जीव बाहेर जातात त्याचप्रमाणें विस्तवानें तापलेल्या पाण्यांतून कां जात नाहींत ? ( उ० ) हां जातच असतील. पण तुह्मी तोंडांतील ऊष्ण वायूच्या योगानें जीव मरतात असें मानतां त्या तुमच्या मताप्रमाणें पाणी तापल्यानेंहि जीव मरतील किंवा अधिक पाणी होऊन निघून जात असतील किंवा त्यांचीं मृत शरीरें जलामध्यें सडून, तुह्मी तें पाणी पितां ह्मणून तुह्मी अधिक पापी होतां कीं नाहीं ? ( प्र० ) आह्मी आपल्या हातांनीं पाणी तापवीत नाहीं व कोणीहि गृहस्थाला तापविण्याला आज्ञाहि करीत नाहीं तेव्हां आह्मी पापी नाहीं. ( उ० ) जर तुह्मी ऊष्ण जल घेत किंवा पीत नसाल तर कोण गृहस्थ कशाला तापवील ? ह्मणून त्या पापाचा भोग तुह्मालाच होईल इतकेंच नव्हे तर तुह्मी अधिक पापी होत असलें पाहिजे; कारण कीं, जर तुह्मी, कोणा एका गृहस्थाला ऊष्ण उदक करण्यास सांगितलें असतें, तर एकेच ठिकाणीं पाणी ऊन केलें गेलें असतें, पण आतां ते गृहस्थ अशा भ्रमांत असतात कीं, साधुमहाराज कोणाच्या घरीं येतील कोण जाणे, ह्मणून कित्येक गृहस्थ आपआपल्या घरीं जल उष्ण करून ठेवतो. ह्मणून त्या पापाचे तुह्मी भागी होतां तसेंच अधिक लांकडें व आधिक अग्नि पेटविल्यानें वर लिहिल्याप्रमाणें स्वयंपाक, शेती व व्यापार इत्यादिकांमध्यें तुह्मीच जास्त पापी व नरकगामी होत असतां. तसेंच पुन्हां तुह्मी उष्ण जल करण्याच्या मुख्य उद्देशानें, उष्ण जल पिण्याचा व थंड जल

न पिण्याचा उपदेश करीत असतां त्यामुळें पापाचे मुख्य भागीदार तुह्मीच होतां, व जे या तुमच्या उपदेशाप्रमाणें वागतात तेंहि पापीच होत असतात. आतां पहा! कीं तुह्मी महान् अविद्येमध्यें निमग्न होत असतां कीं नाहीं? पहा, लहान क्षुद्र जीवावर दया करणें व अन्य मतवाल्या माणसांची निंदा करणें व त्यांच्यावर उपकार न करणें हें काय लहान पाप आहे? जर तुमच्या तीर्थंकरांचें मत खरें असतें तर सृष्टीमध्यें इतक्या नद्या वाहाताहेत व जें इतकें जल परमेश्वरानें उत्पन्न केलें आहे तें कां केलें असतें? व तो सूर्यालाहि उत्पन्न न करता, कारण त्याच्या योगानें कोट्यान कोटी जीव तुमच्या मतानुसार मरत असतात! जेव्हां ते विद्यमान् होतें कीं, ज्यांना तुह्मी ईश्वर मानतां त्यांनीं दया करून सूर्याचा ताप व मेघ कां बंद केले नाहीं? व पूर्वोक्त प्रकारावांचून विद्यमान् प्राण्यांला सुखदु:खाची प्राप्ति कन्दमूल पदार्थांमध्यें राहणाऱ्या जीवांला झाली नसती. सर्वथा सर्व जीवावर दया करणें हेंहि दु:खालाच कारण होतें; जर तुमच्या मतानुसार सर्व लोक वर्तन करतील व चोर व डाकू यांना शिक्षा करणार नाहींत तर किती पाप होईल बरें! ह्मणून दुष्टांना यथावत् शिक्षा करण्यांत व श्रेष्ठांचें पालन करण्यांतच खरी दया आहे. व याच्या विपरीत आचरणामध्यें दया व क्षमा यांचा नाश होतो. जितके जैन लोक दुकानदारी करतात ते सर्व असत्यच बोलत असतात, दुसऱ्याच्या धनाचा अपहार करतात व दीनांला छळणें वगैरे कुकर्म करतात. याच्या निवारणासाठीं तुह्मी उपदेश कां करीत नाहीं? मुखावर पट्टी बांधण्याच्या ढोंगामध्यें कशाला राहतां? जेव्हां तुह्मी चेला व चेली करतां तेव्हां केशलुञ्चन करतां व बहुत दिवस भुकेलेलें राहण्यानें आपल्या व दुसऱ्याच्या आत्म्याला पीडा देतां, आपण पीडा करून दुसऱ्यांला दु:ख देतां, आत्महत्या अर्थात् आत्म्याला दु:ख देणारें होऊन कां बरें हिंसक बनतां! हत्ति, घोडे, बैल, उंट इत्यादिकांवर चढण्यांत मनुष्यांला मजुरीला लादण्यांत जैन लोक कां बरें पाप मानीत नाहींत? जर तुमचे चेले अशा बाष्कळ गोष्टींला सत्य करूं शकणार नाहींत. तर तुमचे तीर्थंकरहि त्यांना सत्य करूं शकणार नाहींत. जेव्हां तुह्मी कथा वाचीत असतां तेव्हां तुमच्या श्रोत्यांच्या व तुमच्या मधील जीव तुमच्या मतानुसार मरतच असतील, तेव्हां तुह्मी या पापाचें मुख्य कारण कां बरें होत असतां? या थोड्याशा कथनानें विचार

करून पुष्कळ जाणावें. तात्पर्य या जल, स्थल व वायूंतील स्थावर शरीरयुक्त अत्यंत मूर्च्छित जीवांला दुःख किंवा सुख पोंचत नाहीं.

## ( १२ ) असंभव गोष्टी.

आतां जैनांच्या आणखीहि थोड्याशा असंभव गोष्टी लिहितों. त्या तुह्मी ऐकल्या पाहिजेत. हेंहि तुह्मी या ठिकाणीं ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, आपल्या हातांनीं साडेतीन हातांचें एक धनुष्य होतें व काळाची संख्या जशी पूर्वीं सांगितली आहे ती लक्षांत घ्यावी. रत्नसार भाग पृ. १६६–६७ मध्यें लिहिलें आहे कीं, (१) ऋषभदेवांचें शरीर ५०० धनुष्यें लांब व ८४,००,०००, पूर्व वर्षांचें आयुष्य होतें. (२) अजितनाथाचें ४५० धनुष्य शरीर लांब असून ७२,००,००० पूर्व वर्षांचें आयुष्य होतें. (३) संभवनाथाचें शरीर ४०० धनुष्य असून त्याचें आयुष्य ६०,००,००० पूर्व वर्षें होतें. (४) अभिनन्दनाचें शरीर ३५० धनुष्य असून त्याचें आयुष्य ५०,००,००० पूर्व वर्षें होतें. (५) सुमतिनाथाचें शरीर ३०० धनुष्यें असून त्याचें आयुष्य ४०,००,००० पूर्व वर्षें होतें. (६) पद्माचें शरीर १४० धनुष्यें असून त्याचें आयुष्य ३०,००,००० पूर्व वर्षें होतें. (७) पार्श्वनाथाचें २०० धनुष्यें शरीर असून २०,००,००० पूर्व वर्षें आयुष्यें होतें, (८) चंद्रप्रभाचें १५० धनुष्यें शरीर व १०,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें (९) सुविधीनाथाचें १०० धनुष्यें शरीर व २,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें. (१०) शीतलनाथाचें ९० धनुष्यें शरीर व १००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें (११) श्रेयांसनाथाचें ८० धनुष्यें शरीर व ८४,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें. (१२) वासुपूज्य स्वामीचे ७० धनुष्यें शरीर व ७२,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें. (१३) विमलनाथाचें ६० धनुष्यें शरीर व ६०,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें. (१४) अनन्तनाथाचें ५० धनुष्यें शरीर व ३०,००,००० वर्षें आयुष्य होतें. (१५) धर्मनाथाचें ४५ धनुष्यें शरीर व १०,००,०० पूर्व वर्षें आयुष्य होतें. (१६) शान्तिनाथाचें ४० धनुष्यें शरीर व १०,००,००० पूर्व वर्षें आयुष्य होतें (१७) कुंथुनाथाचें ३५ धनुष्यें शरीर व ९५००० वर्षें आयुष्य होतें, (१८) अमरनाथाचें ३० धनुष्यें शरीर व ८४००० वर्षें आयुष्य होतें, (१९) मल्लीनाथाचें २५ धनुष्यें शरीर व ५५००० वर्षें आयुष्य होतें, (२०) मुनिसुव्रताचें २० धनुष्यें शरीर व ३०००० वर्षें

आयुष्य होतें, (२१) नेमिनाथाचें १४ धनुष्यें शरीर व १००० वर्षें आयुष्य होतें, (२२) नेमिनाथाचें १० धनुष्यें शरीर व १००० वर्षें आयुष्य होतें. (२३) पार्श्वनाथाचें ९ हात शरीर १०० वर्षें आयुष्य होतें व (२४) महावीराचें ७ हात शरीर व ७२ वर्षें आयुष्य होतें.

हे चव्वीस तीर्थंकर जैनांचे मतप्रवर्तक आचार्य व गुरु होत. यांनाच जैन लोक परमेश्वर मानतात. ते समजतात कीं, हे सर्व मोक्षाला गेले आहेत. बुद्धिमान् लोकांनीं विचार करावा कीं, इतकें मोठें शरीर व एवढें आयुष्य मनुष्याला असूं शकेल कीं काय? या भूगोलावर अशीं थोर माणसें थोडींशींच बसूं शकतील, हा जैनांच्या गप्पांच्या आधारावरून पौराणिकांनीं एक लक्ष दहा हजार वर्षांचें तें आयुष्य लिहिलें आहे तेंहि खरेंच नाहीं, तेव्हां जैनांचें कथन तरी खरें कसें होऊं शकेल? आतां आणखी थोडें ऐका:—

( कल्पभाष्य पृ. ४ )—नागकेतानें गांवाएवढी शिला एका अंगुलीवर धरली! ( कल्प. पृ. ३५ ) महावीरानें आंगठ्यानें पृथिवी दाबली. व त्यामुळें शेष कांपूं लागला! ( कल्प. पृ. ४६ ) महावीराला सर्पानें चावा घेतला. त्या जखमेंतून रक्ताऐवजीं दूध बाहेर आलें. व तो सर्प आठव्या स्वर्गांत गेला! ( कल्प. पृ. ४७ ) महावीराच्या पायावर खीर शिजविली असतां त्याचे पाय जळले नाहींत! ( कल्प. पृ. १६ ) लहानशा भांड्यांत उंट बोलविला! ( रत्नसार भा. १ पृ. १४ ) शरीराचा मळ काढूं नये व चोळूं नये. ( विवेकसार भाग १ पृ. १५ ) जैनांच्या एका दमसार साधूनें क्रोधित होऊन उद्वेगजनक सूत्र ह्मटलें व एका शहराला आग लावली, हा महावीर तीर्थंकरांचा अत्यंत प्रिय होता. ( विवेकसार भाग १ पृ. १२७ ) राजाची आज्ञा अवश्य मानली पाहिजे. ( विवे. भाग १ पृ. २२७ ) एका कोशा वेश्येनें थाळीमध्यें सरसांचा ढीग करून त्यावर फुलांनीं झांकलेली सुई उभी करून तीवर उत्तम प्रकारें नाच केला. पण सुई पायांत गेली नाहीं व ढीगहि वांकडा तिकडा झाला नाहीं!!! ( तत्वविवेक पृ. २२८ ) या कोशा वेश्येशीं एका स्थूल मुनीनें १२ वर्षेपर्यंत भोग केला. आणि नंतर दीक्षा घेऊन सद्गतीला गेला व कोशा वेश्याहि जैनधर्म पालन केल्यामुळें सद्गतीला गेली. ( विवेक भाग १ पृ. १८५ ) एका सिद्धाची गळ्यांत बांधण्याची कंथा एका वैश्याला दररोज ५००. मोहोरा देत असे. ( विवेक. भा. १ पृ. २२८ )

बलवान् पुरुषाची आज्ञा व देवाची आज्ञा मोडल्यानें व घोर वनांत कष्टानें राहिल्यानें व गुरु, माता, पिता कुलाचार्य, ज्ञातीचे लोक व धर्मोपदेष्टा यांचा प्रतिकार केल्यानें धर्मात न्यूनता होते असल्यानें धर्माची हानि होते.

(समीक्षक) आतां पहा यांच्या असत्य गोष्टी ! एक मनुष्य गांवा एवढा दगड आपल्या एका अंगुळावर कधीं धरूं शकेल काय? तसेंच पृथिवीवर आंगठा दाबल्यानें पृथिवी दाबली जाणें शक्य आहे काय? जर शेषनाग नाहींच तर कांपणार कोण ? शरीराला कापल्यावर त्यांतून दूध निघालें असें कोणी पाहिलें आहे काय ? हें जादूच्या खेळाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. त्याला चावणारा सर्प स्वर्गात गेला व श्रीकृष्ण तिसऱ्या नरकांत गेले हें किती खोटें आहे ? जेव्हां महावीराच्या पायावर खीर शिजविली तेव्हां त्याचे पाय कसे जळले नाहींत ? लहानशा भांड्यांत उंट कधीं तरी येऊं शकतो काय ? जे शरीराचा मळ काढून टाकीत नाहींत व जे अंग चोळीत नाहींत ते दुर्गंधरूप महानरक भोगीत असतील. ज्या साधूनें नगर जाळलें त्याची दया व क्षमा कोठें गेली ? जर महावीराच्या संगतीनें त्याचा आत्मा पवित्र झाला नाहीं तर महावीराच्या मरणानंतर त्याच्या आश्रयानें जैन लोक कधींहि पवित्र होणार नाहींत. राजाची आज्ञा मानली पाहिजे पण जैन लोक बनिये आहेत ह्मणून राजाला भिऊन त्यांनीं ही गोष्ट लिहिली असेल. कोशा वेश्येचें शरीर कितीहि हलकें असलें तरी सरसांच्या ढीगावर सुई उभी करून तिच्यावर नाचणें, पायांत सुई न बोचणें व ढीग अस्ताव्यस्त न होणें हें अशक्य असल्यामुळें तो वृत्तांत अगदीं असत्य नाहीं तर काय ? कोणीहि कोणत्याच अवस्थेंत धर्म सोडतां नये, कांहीं झालें तरी हरकत नाहीं. कंथा हें एक वस्त्र आहे तें दररोज पांचशें मोहोरा कशा बरें देईल ? आतां जर अशा कहाण्या लिहूं लागलों तर ग्रंथ फारच मोठा होईल ह्मणून आतां जास्त लिहीत नाहीं या जैनांच्या थोड्याशा गोष्टी सोडून बाकी सर्व मिथ्याच गोष्टी भरल्या आहेत. पहा:—

**दोषसि दोरवि पढमे । दुगुणा लवणं मिधाय ईसं मे ॥**
**बारससासि बारसरवि । तस्यामि इनि दिठ ससि रविणो ॥**

**प्रकरण. भा. ४ सू. ७७.**

जें जंबुद्वीप लक्ष योजनें ह्मणजे चार लक्ष कोस आहे असें लिहिलें होतें, त्यांत हें पहिलें द्वीप आहे. यामध्यें दोन चंद्र व दोन सूर्य आहेत. व लवणसमुद्रा-

मध्यें त्याच्या दुप्पट ह्म. चार चंद्र व व चार सूर्य आहेत. तसेंच धातकीखंडांत बारा चंद्र व बारा सूर्य आहेत. यांची तिप्पट केली ह्म० छत्तीस होतात व त्यामध्यें जंबुद्वीपाचे व चार लवण समुद्राचे मिळविले ह्मणजे बेचाळीस होतात. कालोदधि समुद्रामध्यें बेचाळीस सूर्य व बेचाळीस चंद्र आहेत. याच प्रमाणें पुढील द्वीप व समुद्रामध्यें पुर्वोक्त बेचाळीसाच्या तिप्पट केले असतां एकशें सव्वीस होतात व त्यांत धातकी खंडाच्या बाहेरील लवणसमुद्राचे चार व जंबुद्वीपाचे दोन हे सर्व एकच केले असतां एकशें चव्वेचाळीस चंद्र व १४४ सूर्य पुष्करद्वीपामध्यें होतात. ही अर्ध्या मनुष्यक्षेत्राची गणना आहे. पण जेथें मनुष्य राहत नाहींत तेथें पुष्कळ सूर्य व चंद्र स्थिर आहेत. पूर्वोक्त १४४ ची तिप्पट करून, जंबूद्वीपाचे दोन चंद्र व दोन सूर्य व चार चार लवण समुद्राचे व बारा बारा धातकी खंडाचेच बेचाळीस कालोदधीचे मिळविले असतां ४९२ चंद्र व ४९२ सूर्य पुष्कर समुद्रांत होतात. या सर्व गोष्टी श्रीजिनभद्र गणक्षिमाश्रमणानें मोठ्या "संघयणी" मध्यें, तसेंच "योतिसकरंडकपयन्ना" मध्यें व "चंद्रपन्नति" व "सूरपन्नति" प्रमुख सिद्धांतग्रंथांमध्यें या प्रमाणें लिहिल्या आहेत.

( समीक्षक ) भूगोल खगोल जाणणारे लोक हो ! आतां ऐका ! या एका भूगोलामध्यें एका प्रकारें ४९२ चंद्र व सूर्य व दुसऱ्याप्रकारें अनेक चंद्र व सूर्य असें हे लोक मानतात ! आपलें मोठें भाग्य आहे कीं, वेदमतानुयायी सूर्यसिद्धांतादि ज्योतिषग्रंथांचें अध्ययन करून ठीक ठीक भूगोल व खगोल यांचें ज्ञान झालें, नाहीं तर या जैनांच्या महा अंधकारामध्यें सांपडलों असतों तर जसे आजू जैनलोक अविद्याग्रस्त आहेत तद्वतच आह्मी राहिलों असतों. या अविद्वानांला अशी शंका आली कीं, जंबुद्वीपांतील एक सूर्य व चंद्रानें काम भागत नाहीं; कारण एवढ्या मोठ्या पृथिवीला तीस घटिकांमध्यें एक चंद्र व सूर्य पुनः पुनः कसे येऊं शकतील ? हे लोक सूर्यापेक्षांहि पृथिवीला मोठी मानत त ही यांची मोठीच चूक आहे.

**दोससि दो रवि पंती एगंतरियाछ सठिसंखाया ॥**
**मेरुं पयाहिणंता । माणुसखित्ते परि अडंति ॥**

**प्र. भा. ४।७९॥**

मनुष्य लोकांतील सूर्य व चंद्र यांच्या पंक्तिची संख्या सांगतात. दोन चंद्र व सूर्य यांची पंक्ति ( श्रेणी ) आहे. ते एक लक्ष योजन ह्म० चार

लक्ष कोसांच्या अंतरा वरून चालतात. जसें सूर्याच्या पंक्तीच्या आंतरीयभागीं चंद्राची पंक्ती आहे याचप्रमाणें चंद्राच्या पंक्तिच्या आंतरीय भागीं सूर्याची पंक्ति आहे. याचप्रमाणें चार पंक्ती आहेत. एकएका चंद्रपंक्तिमध्यें ६६ चंद्र आहेत. व एकएका सूर्यपंक्तिमध्यें ६६ सूर्य आहेत. या चारहि पंक्ति जंबुद्वीपांतील मेरू पर्वताला प्रदक्षिणा करीत करीत मनुष्यक्षेत्रांमध्यें परिभ्रमण करतात. ज्यावेळीं जंबुद्वीपांतील मेरूच्या दक्षिणदिशेला एक सूर्य फिरत असतो, तेव्हां त्याच्या उत्तर दिशेला दुसरा सूर्य असतो, त्याच प्रमाणें लवणसमुद्राच्या एक एका दिशेमध्यें दोन दोन फिरत असतात, धातकी खंडाच्या सहा सहा, कालोदधीच्या २१, पुष्करार्धाच्या ३६, या प्रकारें सर्व मिळून ६६ सूर्य दक्षिणदिशेमध्यें व ६६ सूर्य उत्तरदिशेमध्यें आपआपल्या क्रमानें फिरत असतात. या दोनहि दिशांचे सर्व सूर्य एकत्र केले असतां १३२ होतात. याचप्रमाणें ६६ चंद्राच्या दोनहि बाजूंची बेरीज केली असतां १३२ होते. हे सर्व मनुष्य लोकांमध्यें फिरत असतात. याचप्रमाणें चंद्राबरोबर नक्षत्रांच्याहि बऱ्याच पंक्ति जाणाव्या.

( **समीक्षक** ) आतां पहा ! या भूगोलांवर १३२ सूर्य व १३२ चंद्र जैनाच्या घरावर तापत असतात ! जर इतके तापत आहेत तर ते जीवंत तरी कसे राहिले ? रात्रीच्या वेळीं थंडीच्या मारानें जैन लोक जखडून जात असतील ! अशा असत्य गोष्टींमध्यें भूगोल व खगोल विद्या न जाणणारेच फसतात अन्य नाहींत. जर एकच सूर्य या भूगोलासदृश अन्य भूगोलांवरहि प्रकाशतो तर या लहानशा भूगोलाची तर कथा काय ? जर पृथिवी फिरली नसती व सूर्यच पृथिवीच्या चारहि बाजूला फिरला असता तर कित्येक वर्षांचा दिवस व रात्र झाली असती. सुमेरु हा हिमालयावांचून दुसरा कोणताच पर्वत नाहीं हा सूर्याच्या समोर असा आहे कीं, जशी घटाच्या समोर मोहरीचा दाणा. जोंपर्यंत जैनमतामध्येंच हे लोक राहतील तोंपर्यंत त्यांना या गोष्टी समजूं शकत नाहींत व सदैव अंधेरांतच राहतील.

**समत्तचरण सहियासव्वं लोगं फुसे निरवसेसं ॥**
**सत्तचय उदस भाए पंचय सुप देसविर ईए ॥**

प्र. भा. ४।१३५॥

सम्यक चरित्र सहित जे केवली असतात ते केवळ समुद्घात अवस्थेपासून सर्व चवदा राज्य लोकांमध्यें आपला आत्मप्रदेश करून फिरतील.

( समीक्षक ) जैन लोक १४ राज्यें मानतात. त्यांतील चवदाव्या शिखरावरील सर्वार्थ सिद्धिच्या विमानाच्या ध्वजेवर थोडें दूर सिद्धशिला आहे. तसेंच त्याला शिवपुर असें म्हणतात, त्यांत केवली, अर्थात् ज्यांना केवल ज्ञान, सर्वज्ञता व पूर्णपवित्रता प्राप्त झाली आहे, ते जातात, व आपल्या आत्मप्रदेशामुळें सर्वज्ञ असतात. ज्यांचा प्रदेश असतो ते विभू नसतात व जे विभू नसतात ते कधींहि सर्वज्ञ असूं शकत नाहींत. कारण कीं, ज्याचा आत्मा एकदेशी असतो तोच जातो, येतो व बद्ध, मुक्त, ज्ञानी व अज्ञानी होत असतो; तसा सर्वव्यापी व सर्वज्ञ होऊं शकत नाहींत. जे जैनांचे तीर्थंकर जीवरूप अल्प व अल्पज्ञ होऊन राहिले होते, ते सर्वव्यापक सर्वज्ञ होऊं शकत नाहीं. पण जो परमात्मा अनाद्यनन्त, सर्वव्यापक, सर्वज्ञ, पवित्र, ज्ञानस्वरूप आहे त्याला जैन लोक मानीत नाहींत, ज्यामध्यें सर्वज्ञत्वादिगुण यथातथ्यपणानें असूं शकतात.

गब्भरति पलियाऊ । तिगाऊ उक्कोसते जहन्नेणं ॥
मुच्छिम दुहावि अन्तमहु । अङ्गुल असंख भागतणू ॥२४१॥

मनुष्यें दोन प्रकारचीं आहेत. एक गर्भापासून उत्पन्न झालेलीं व दुसरीं गर्भाशिवाय उत्पन्न झालेलीं. त्यापैकीं गर्भज मनुष्यांचें उत्कृष्ट तीन पल्योपम आयुष्य जाणावें व तीन कोसांचें शरीर जाणावें ( समीक्षक ) ज्यांचें तीन पल्योपम व तीन कोसांचें शरीर आहे अशी माणसें या भूगोलावर थोडींच राहूं शकतील. पूर्वीं लिहिल्याप्रमाणें जर तीन पल्योपम आयुष्य असेल व ते ...मयापर्यंत जगत असतील तर त्यांच्या संतानाचीं शरीरेंहि तीन कोसच पाहिजेत. अशीं माणसें मुंबई शहरामध्यें दोन व कलकत्यांत तीन किंवा ...रच राहूं शकतील. जर असें आहे तर जैनांनीं एका नगरामध्यें अशीं माणसें राहतात असें लिहिलें आहे तेव्हां तें नगरहि लाखों कोसांचे असलें पाहिजे. सर्व भूगोलावर तसलें एकहि शहर राहूं शकणार नाहीं.

...या ललरक यायेण । विरकंभा सिद्धि शिलफलिह विमला ॥
... गजोयणते । लोगन्तो तच्छ सिद्ध ठिई ॥ २५८ ॥

जें सर्वार्थसिद्धि विमान आहे, त्याच्या ध्वजेच्यावर १२ योजने सिद्धशिला आहे. तिची लांबी, रुंदी व जाडी ४५ लक्ष योजनें आहे, ती सर्व शुभ्र असून सुवर्णमय स्फटिकाप्रमाणें निर्मळ अशी सिद्धशिलेची सिद्धभूमी आहे. हिला कोणी ' ईषत् प्राग्भरा ' असेंहि ह्मणतात, ही सर्वार्थ सिद्धशिला विमानापासून १२ योजनें अलोक आहे. हा परमार्थ केवली श्रुत जाणता आहे. ही शिद्धशिला सर्वार्थ मध्यभागामध्यें ८ योजनें स्थूल आहे ती चार दिशामध्यें व चार उपदिशांमध्यें माशीच्या पंखाप्रमाणें पातळ होत गेली आहे. उत्तान छत्र व आकार करून सिद्धशिलेची स्थापना केली आहे या शिलेच्यावर एका योजनाच्या अंतरानें लोकान्त आहे व तेथें सिद्धलोक राहतात. ( समीक्षक ) या ठिकाणीं लक्षांत आणलें पाहिजे कीं, जैनांच्या मुक्तीचें स्थान सर्वार्थसिद्धि विमानाच्या ध्वजेच्यावर ४५ लक्ष योजनांची एक शिळा आहे, ती कितीहि जरी स्वच्छ व निर्मळ असली तथापि तिच्यावर राहणारे मुक्त जीव एक प्रकारानें बद्धच असतात; कारण त्या शिळेच्या बाहेर जर ते आले तर त्यांना मुक्तीसुख प्राप्त होत नाहीं. व जर आंत राहिले तर त्यांना वायूही मिळत नसला पाहिजे. ही मुक्तीची कल्पना केवळ अविद्वानाला फसविण्यासाठींच केलेली आहे. हें निव्वळ भ्रमजाल आहे.

**वितिचउरिं दिससरिरं । वारस जोयणति उकोसं ॥**
**जोयण सहस पणिंदिय । उहे वुच्छन्ति विसेसंतु ॥ प्र. ४ सं. २६७॥**

सामान्यपणानें एक इंद्रियाचें शरीर १ हजार योजनाचें असतें तें उत्कृष्ट आहे जाणावें. दोन इंद्रियांचें शङ्खादिकांचें शरीर १२ योजनाचें जाणावें, चतुरिंद्रिय भ्रमरादिकांचें शरीर चार कोस व पंचेन्द्रियांचें एक सहस्र योजनें अर्थात् चार सहस्र कोस शरीर असतें असें जाणावें. ( **समीक्षक** ) चार चार हजार कोस शरीरधारीं माणसें झालीं तर भूगोलावरच फारच थोडीं माणसें राहतील. शंभरएक माणसांनीं हा भूगोल अगदीं ठांसून भरून जाईल व कोणाला हिंडाफिरावयाला जागाच राहणार नाहीं. नंतर ते जैनांलाच राहण्याचें ठिकाण व मार्ग विचारतील. त्यांना हे आपल्या घरांत ठेवतील कदाचित् ! पण चार हजार कोस शरीराच्या माणसाला निदान ३२ हजार कोसांचें तरी घर रहावयाला लागेल ! असें एक घर बनविण्यामध्यें जैनांचें सर्व धन खर्च झालें तरीहि असें घर बनणार नाहीं. आठ हजार कोशांची तक्तपोशी बनविण्यास लांकडें कोठून आणणार ? व जर मध्यें खांब लावले तर तो मनुष्य आंत

अवेशहि करूं शकणार नाहीं ! ह्मणून अशा गोष्टी ज्या असतात त्या सर्व खोट्याच असतात.

ते थूला पल्ले विहुसं खिज्जाचे बहुति सव्वेवि ॥

ते इक्किक असंखे । खम्मे पकप्पेह ॥

प्र. भा. ४ लघुक्षेत्र । समासप्र० सू. ४ ॥

पूर्वोक्त एक अंगुल केसांच्या तुकड्यांनीं चार कोस औरस चौरस व तितकाच खोल खड्डा भरावा. आंगळा एवढ्या केंसाचे तुकडे सर्व मिळून वीस लक्ष सत्तावन हजार एकशें बावन होतात. या मानानें त्या विहिरीमध्यें अधिक्रांत अधिक तेहेतीस कोटी सात लक्ष बासष्ट हजार एकशें चार कोटी, चोवीस लक्ष पांसष्ट हजार सहाशें पंचवीस कोटी, बेचाळीस लक्ष एकोणीस हजार नऊशें साठ कोटी, सत्याण्णव लक्ष त्रेपन हजार सहाशें कोटी ( ३३०७६२१०४, २४६५६२५, ४२१९९६०, ९७५३६००, ०००००० ) इतकी सर्व स्थूल लोमखंडाची संख्या त्या घन योजन पल्योपम विहिरीमध्यें होते. हाहि संख्योतकाल समजावा. पूर्वोक्त एका लोम-खंडाचे मनानें असंख्यात खंड कल्पावे तेव्हां असंख्यात सूक्ष्म रोमाणु होतील ! ( समीक्षक ) आतां पहा ! यांच्या गणनेची रीती ! एका आंगळाएवढ्या केंसाचे तुकडे जितके केले आहेत तितके कधीं तरी कोणाच्या गण-नेमध्यें येऊं शकतात काय ? व त्यानंतरहि मनानें त्या एकएका खंडाचे असंख्य तुकडे कल्पतात ! यावरून हेंहि सिद्ध होतें कीं, पूर्वोक्त खंड हातां-नींच केले असतील, जर हातांनीं नसतील तर मनानें केले असतील ! पण कशानेंहि केलेले असले तरीहि एका अंगुळा एवढ्या केंसाचे तुकडे असंख्य कसे बरें होऊं शकतील ?

जंबुद्दीपपमाणं गुलजोयाणलरक वट्टविरकंभो ॥

लवणाई यासेसा । वलया भादु गुणदुगुणाय ॥प्र. ४ लघ. १२ ॥

प्रथम जंबुद्वीपाचें एक लक्ष योजनाचें प्रमाण आहे व तेवढेंच जाड आहे. बाकी लवणादि सात समुद्र व सात द्वीपें जंबुद्वीपाच्या प्रमाणाच्या दुप्पट आहेत. एका पृथ्वीमध्यें जंबुद्वीपादि सात द्वीपें व सात समुद्र आहेत ते पूर्वीं लिहिले आहेत. ( समीक्षक ) जंबुद्वीपाच्या दुप्पट दोन लक्ष योजनांचें दुसरें द्वीप, तिसरें चार लक्ष योजनांचें, चौथें आठ लक्ष योजनांचें, पांचवें सोळा लक्ष

योजनांचें, सहावें बत्तीस लक्ष योजनांचें व सातवें चवसष्ट लक्ष योजनांचें व तेवढ्याच प्रमाणाचे किंवा त्यापेक्षां मोठ्या प्रमाणाचे समुद्र या पंधरा हजार परिधियुक्त भूगोलावर कसें बरें राहूं शकतील? तात्पर्य या सर्व गोष्टी असत्य आहेत.

कुरुन इचुलसी सहसा छिचेवब्बुनई उपइ विजयं ॥
दोदो महानंईउ । चनुदस सहसा उपचेयं ॥
प्र. भा. ४ लघु. ॥ ६३ ॥

कुरुक्षेत्रामध्यें ८४ हजार नद्या आहेत. ( समीक्षक ) कुरुक्षेत्र तर फारच लहान देश आहे. त्याला न पाहतांच एक खोटी गोष्ट लिहिण्यांत त्यांना लज्जाहि आली नाहीं.

यामुतरा उताऊ । इगग सिंहासनाउ अइपुव्वं ।
चऊ सुवितास नि आसण, दिसिभवजिण मज्जणं होई ॥
प्र. भा. ४ लघु. ११९ ॥

त्या शिलेच्या विशेषत: दक्षिण व उत्तर दिशामध्यें एक सिंहासन आहे असें जाणावें. त्या शिलांचीं नांवें, दक्षिणदिशेमध्यें अतीपांडुकंबला, उत्तर दिशेमध्यें अतिरक्तकंबला अशीं आहेत. या सिंहासनावर तीर्थंकर बसतात. ( समीक्षक ) पहा ! यांच्या तीर्थंकरांच्या जन्मोत्सवादिक करण्याच्या शिळा, अशीच यांच्या मुक्तीची सिद्ध शिला आहे. अशाच यांच्या पुष्कळ गोष्टी असत्य आहेत. किती म्हणून लिहाव्या. जळ गाळून पिणें, सूक्ष्म जीवांवर नाममात्र दया करणें, रात्रीला भोजन न करणें, या तीन गोष्टी यांच्या चांगल्या आहेत. बाकीं जितकें यांचें कथन आहे तें सर्व असंभव ग्रस्त आहे. एवढ्या लेखानेंच बुद्धिमान् लोक पुष्कळ जाणूं शकतील, थोडेंसें हें दिग्दर्शनमात्र लिहिलें आहे. जर यांच्या सर्व असंभवनीय गोष्टी लिहिल्या तर एवढे ग्रंथ होतील कीं, त्यांचें एका आयुष्यांत पठणहि होणार नाहीं. ज्याप्रमाणें शितावरून भाताची परीक्षा करतात त्याचप्रमाणें या थोड्याशा लेखावरून बुद्धिमानानीं इतर गोष्टींविषयीं जाणावें. याच्या पुढें खिस्त्यांच्या मताविषयीं लिहूं.

इति सुभाषाविभूषितो नास्तिकमतांतर्गतचारवाकबौद्धजैनमत खंडनमंडनविषयो नाम द्वादशसमुल्लासः संपूर्णः ॥ १२ ॥



# अनुभूमिका ( ३ )

या समुल्लासांत जें बायबलाचें मत वर्णिलें आहे तें केवळ ख्रिस्त्यांचेंच मत आहे असें नसून त्यायोगें यहुदी आदिहि मतें गृहीत होत आहेत. या १३ व्या समुल्लासांत ख्रिस्ती मताविषयीं लिहिलें आहे त्यास तरी कारण हेंच कीं, सांप्रत बायबलानुयायी ख्रिस्तीमतच मुख्य मत मानलें गेलें आहे, यहुदी वगैरे मतें गौण होत, अर्थात् मुख्य-मताच्या ग्रहणांत गौण मतांचा समावेश आपोआप होतो. बायबलाविषयीं लिहिणें ह्मणजे ख्रिस्ती, यहुदी वगैरे धर्माविषयीं आलेंच; कारण, सदर्हू धर्मानुयायी बायबल हाच धर्म-ग्रंथ प्रमाण मानितात, बायबल हेंच उपरोक्त धर्माचें मूलकारण होय. बायबलाचीं भाषांतरें अनेक भाषेंत मोठमोठ्या ख्रिस्ती मिशनरींनीं केलेलीं आहेत. त्यांपैकीं संस्कृत भाषेंतील प्रत माझ्या वाचण्यांत आली, वाचनांतीं ज्या मला पुष्कळ शंका उद्भवल्या त्यांपैकीं कांहीं थोड्याशा ह्या समुल्लासामध्यें दिग्दर्शित केल्या आहेत. शंका दिग्दर्शित करण्याचें कारण केवळ सत्याची वृद्धि आणि असत्याचा ऱ्हास व्हावा हा आहे. कोणाला दुःख व्हावें, कोणाची हानि करावी अथवा कोणावर मिथ्या दोषारोपण करावें हा माझा हेतु बिलकुल नाहीं. या भागांत प्रथम बायबलांतील वचनें देऊन नंतर त्याखालीं माझें ह्मणणें मी दिलें आहे, त्यावरून हें पुस्तक कसें आहे व त्यांतील मतें कशीं काय आहेत हें सर्वांना समजून येईल. असें झालें ह्मणजे सर्व मनुष्यमात्रानें ह्या ग्रंथाचा अभ्यास करावा, श्रवण करावें, लेख लिहावें, पक्षी प्रतिपक्षी बनून परस्पर विचारविनिमय करावा व अशारीतीनें धर्माचें आंदोलन सर्वांनीं करीत असावें. आणखी माझा एक मुख्योद्देश हा आहे कीं, मनुष्यांचें धर्मज्ञान वृद्धिंगत होऊन त्यांना 'सत्यासत्य' व 'कर्तव्याकर्तव्य' कर्मासंबंधीं निर्णय करण्यास शक्य व्हावें व सत्याचा, कर्तव्याचा स्वीकार आणि असत्य, अकर्तव्य यांचा त्याग करण्यास त्यांना सहज साध्य व्हावें.

सर्वांना उचित आहे कीं, त्यांनीं सर्व मतमतांतरांचीं पुस्तकें वाचावीं, समजून घ्यावीं, संमत असंमत, याविषयीं पूर्ण मनन करावें व मगच तें मत प्रतिपादन करावें. शिक्षणानें मनुष्य जसा पंडित बनतो तसा श्रवणानें तो बहुश्रुत बनतो. श्रवणानें त्याला इतर लोकांना उपदेश करतां येणार नाहीं परंतु स्वतःपुरतें त्याला बरेंच ज्ञान प्राप्त करतां येईल. जो कोणी पक्षपातानें अध्ययन करतो त्याला स्वपर गुणदोष कदापि कळणार नाहीत. मनुष्याचा आत्मा 'सत्यासत्या' चीं यथायोग्य निवड करण्याचें सामर्थ्य बाळगतो आणि ह्मणून जेवढें त्याचें वाचन व श्रवण असेल तेवढ्यापुरता तरी त्याला निर्णय करणें शक्य आहे. एक स्वमताविषयीं पूर्ण ज्ञानी व दुसरा जर स्वमताविषयीं पूर्ण ज्ञानी असेल तर त्यांच्यामध्यें कसलाच विचारविनिमय होणें शक्य नाहीं, परंतु जो

अज्ञानी आहे तो अधिकाधिकच भ्रमांत पडतो. असें होऊं नये म्हणून या ग्रंथांत प्रचलित सर्व मतांविषयीं अल्प-स्वल्प लिहिलें आहे, त्यावरून त्या मतांतील बाकीविषयीं सत्या-सत्याचें अनुमान सर्वांना करणें सुलभ पडेल.

जें जें सर्वमान्य 'सत्य' आहे त्याविषयीं सर्वांची एकवाक्यता आहे. फक्त झगडा आहे तो 'खोट्यां' चा ! अथवा एक सत्य व दुसरें असत्य असेल तरी विवाद उत्पन्न होतोच ! जे लोक 'सत्यासत्य निर्णयार्थ' संवाद करितात तोच संवाद हितकारी होय व त्यानेंच अवश्य तो परिणाम प्राप्त होईल. आतां मी या समुल्लासांत ख्रिस्ती मताविषयीं थोडेसें लिहून तें विचारार्थ सर्वांसमक्ष ठेवतों. विचारवंतांनी तें कसें आहे हें पहावें. अलमति लेखेन विचक्षणवरेषु.

उदेपूर,
भाद्रपद शुक्लपक्ष. विक्रमार्क १९३९. } (स्वामी) दयानंद सरस्वती.

# अथ त्रयोदशसमुल्लासारम्भः

## अथ खिस्तीमतविषयं समीक्षिष्यामः



तां यापुढें खिस्ती मताविषयीं लिहितों म्हणजे सर्वांना हे खिस्ती धर्ममत निर्दोष आहे किंवा नाहीं आणि 'बायबल' पुस्तक ईश्वरकृत आहे किंवा कसें हें विदित होईल. प्रथम बायबलचा **जुना करार** ( सृष्ट्युत्पत्ती भाग ) याविषयीं लिहिण्यांत येत आहे:—

( १ )—प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी हीं उत्पन्न केली. आणि पृथ्वी अस्ताव्यस्त व शून्य होती, आणि जलावर अंधार होता.

—उत्पत्ति अध्याय १ ओवी १।२.

**समीक्षकः**—आरंभ कशाला म्हणत आहां ? ( खिस्ती ) सृष्टीच्या प्रथमोत्पत्तीला. ( समीक्षक ) हीच सृष्टि उत्पन्न झालेली आहे ? हिच्यापूर्वी ती केव्हांच उत्पन्न झाली नव्हती ? ( खिस्ती ) ईश्वर जाणें, आम्हांला माहीत नाहीं कीं, ती झाली होती किंवा नाहीं ! ( समीक्षक ) जर माहीत नाहीं तर ह्या पुस्तकावर विश्वास कां ठेवला ? ज्यायोगें संदेह निवारण होऊं शकत नाहीं त्या पुस्तकाच्या आधारें लोकांना उपदेश करून ह्या संशयग्रस्त खिस्ती मतांत लोकांना कां फसवितां ? आणि निःसंदेह सर्व शंकानिवारक वेदमताचा तुम्ही स्वीकार कां करीत नाहीं ? ईश्वराच्या सृष्टीचें ज्ञान जर तुम्हाला अवगत नाहीं तर ईश्वराला काय जाणत असाल ? आकाश कशाला मानीत आहां ? ( खिस्ती ) पोकळी व वर दिसतें त्याला ( समीक्षक ) पोकळीची उत्पत्ति कशाप्रकारें झाली ? कारण कीं, हा पदार्थ बिभु, अति सूक्ष्म आणि वर–खालीं एकसारखा आहे, जेव्हां आकाश उत्पन्न झालें नव्हतें तेव्हां पोकळी व वर दिसतें तें आकाश होतें वा नव्हते ? जर नव्हतें तर ईश्वर, जगताचें कारण व जीव कोठें रहात होते ? अवकाश असल्याखेरीज कोणताही पदार्थ स्थित होऊं शकत नाहीं; याकरितां तुमचें

बायबलाचें कथन युक्त नव्हे. ईश्वर अस्ताव्यस्त, त्यांचें ज्ञान व कर्मे हीं अस्ताव्यस्त आहेत किंवा व्यवस्थित ?. ( ख्रिस्ती ) व्यवस्थित असतात. ( समीक्षक ) मग येथें ईश्वरानें निर्माण केलेली पृथ्वी अस्ताव्यस्त होती असें कां लिहिलें ? ( ख्रिस्ती ) अस्ताव्यस्त याचा अर्थ उंच नीच होती, बरोबर सपाट नव्हती. ( समीक्षक ) मग कोणी बरोबर केली ? आणि आतां ती उंच नीच नाहीं काय ? याकरितां ईश्वराचें कार्य अस्ताव्यस्त असूं शकत नाहीं. कारण तो सर्वज्ञ असल्यामुळें त्याच्या कामांत अस्ताव्यस्तपणा, भूल वा चूक कधींच असूं शकत नाहीं. आणि ज्याअर्थी बायबलामध्यें ईश्वराची सृष्टि अस्ताव्यस्त लिहिलेली आहे, त्याअर्थी हें पुस्तक ईश्वरकृत होऊं शकत नाहीं.

ईश्वराचा आत्मा हा काय पदार्थ आहे ? ( ख्रिस्ती ) चेतन. ( समीक्षक ) तो साकार आहे वा निराकार तथा व्यापक आहे वा एकदेशी ? ( ख्रिस्ती ) निराकार, चेतन आणि व्यापक आहे परंतु एखाद्या सिनाई पर्वतावर, चौथ्या आसमानावर आदि ठिकाणीं विशेषे करून रहात असतो. ( समीक्षक ) जर निराकार आहे तर त्याला कोणी पाहिलें ? आणि सर्वव्यापक आहे तर त्याचें पाण्यावर डोलणें कसें होऊं शकतें ? बरें, जेव्हां ईश्वराचा आत्मा जलावर हालत होता तेव्हां देव कोठें होता ? यावरून हेंच सिद्ध होतें कीं, ईश्वराचें शरीर अन्यत्र कोठें तरी असेल अथवा आपल्या आत्म्याचा एखादा तुकडा जलावर हालवीत बसला असेल ! असा जो देव आहे तो विभु व सर्वज्ञ कधीं होऊं शकत नाहीं. आणि जो विभु नाहीं तो जगताची रचना, धारण, पालन, जीवांच्या कर्मांची व्यवस्था व प्रलय कधीं करूं शकत नाहीं. कारण ज्या पदार्थांचें स्वरूप एकदेशी त्याचे गुण, कर्म स्वभावदेखील एकदेशी असतात, असा जो आहे तो ईश्वर होऊं शकत नाहीं. कारण ईश्वर सर्वव्यापक, अनन्त गुण, कर्म, स्वभावयुक्त, सच्चिदानन्द–स्वरूप, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त–स्वभाव, अनादि, अनन्तादि लक्षणयुक्त असा जो वेदांमध्यें वर्णिला आहे, त्याला माना तेव्हांच तुमचें कल्याण होईल अन्यथा नाहीं. •

—तेव्हां देव बोलला, प्रकाश होवो. आणि प्रकाश झाला. आणि देवानें पाहिलें कीं, प्रकाश चांगला आहे.

उत्पत्ति अ. १ ओ० ३।४॥

**समीक्षक**—ईश्वराचें ह्मणणें जडरूप प्रकाशानें एकलें ? जर ऐकलें असेल तर आतांही सूर्य, दीपक, अग्नीचा प्रकाश आमचें तुमचें ह्मणणें का ऐकत नाहीं ? प्रकाश जड असतो तो कधीं कोणाचें ह्मणणें ऐकूं शकत नाहीं. ईश्वरानें प्रकाश पाहिला तेव्हांच त्याला कळलें कीं, प्रकाश चांगला आहे ? पहिल्यानें त्याला कळून आलें नाहीं ? त्याला अगोदर कळतें तर पाहिल्यावर तो चांगला आहे असें त्यानें ह्मटलें नसतें. जर तो प्रथमापासून जाणत नव्हता, तर ईश्वरच नव्हे ! ह्मणून तुमचें बायबल ईश्वरोक्त नव्हे व त्यांत वर्णिलेला ईश्वर सर्वज्ञ नव्हे. ॥ २ ॥

३—मग देव बोलला, जलामध्यें अंतराळ होवो, आणि तें जलापासून जल वेगळें करो. असें देवानें अंतराळ केलें आणि अंतराळाखालचें जें जल तें अंतराळावरच्या जलापासून वेगळें केलें; आणि तसें झालें. देवानें अंतराळाला आकाश झटलें; आणि सायंकाळ व सकाळ झाली. हा दुसरा दिवस. —उत्पति अ. १ ओ. ६।७।८॥

**समीक्षक**—आकाश व जलानेंही ईश्वराची आज्ञा ऐकली काय ? आणि जर जलामध्यें आकाश नव्हतें तर जल कोठें राहिले असतें ? पहिल्या ओवींत आकाश उत्पन्न केलें होतें मग पुनः तें उत्पन्न करणें व्यर्थ होय. आकाशाला जर स्वर्ग—अंतराळ झटलें तर तें सर्वव्यापक आहे ह्मणून सर्वत्र स्वर्ग झालें. मग स्वर्ग वर आहे असें ह्मणणें व्यर्थ आहे. सूर्य जर उत्पन्नच झाला नव्हता तर मग दिवस व रात्र कोठून झाली ? असल्या असंभवनीय गोष्टी पुढील ओव्यांमध्यें भरलेल्या आहेत. ॥ ३ ॥

४—मग देव बोलला कीं, आपण आदमाला आपल्या स्वरूपाप्रमाणें बनवूं. आणि देवानें आपल्या प्रतिच्छायेप्रमाणें मनुष्याला उत्पन्न केलें; देवाच्या प्रतिच्छायेप्रमाणें त्यानें त्याला उत्पन्न केलें; पुरुष व स्त्री असे त्यांस उत्पन्न केलें. आणि देवानें त्यांस आशीर्वाद दिला. —उत्पत्ति अ. २६।२७।२८॥

**समीक्षकः**—ईश्वरानें आपल्या प्रतिछायेप्रमाणें आदमाला बनविलें होतें तर ईश्वराचें स्वरूप पवित्र, ज्ञानमय, आणि आनन्दमय आदि लक्षणयुक्त असल्यामुळें त्याप्रमाणें आदम कां झाला नाहीं ? तो तसा झाला नाहीं ह्मणूनच तो ईश्वर-स्वरूपाप्रमाणें नव्हता. आदमाला उत्पन्न केलें ईश्वरानें. स्वरूपालाही त्यानें उत्पत्तिवान् बनविलें मग तो अनित्य कां ह्मणूं नये ? बरें, कोणत्या पदार्थापासून आदमाला त्यानें उत्पन्न केलें ? (खिस्ती) मातीपासून. ( समीक्षक ) माती कशापासून झाली ? ( खिस्ती ) त्याच्या कुदरतीनें अर्थात् सामर्थ्यानें ( समीक्षक ) ईश्वराचें सामर्थ्य अनादि आहे वा नवीन ? ( खिस्ती ) अनादि आहे. ( समीक्षक ) जर अनादि आहे तर जगताचें कारण सनातन ठरलें मग अभावापासून भावाची उत्पत्ति कां मानतां ? (खिस्ती) सृष्टिपूर्वी ईश्वराखेरीज दुसरी कोणतीही वस्तु नव्हती. ( समीक्षक ) जर नव्हती तर हें जगत् कोणत्या पदार्थापासून झालें ? ईश्वराचें सामर्थ्य ह्मणजे द्रव्य आहे वा गुण ? द्रव्य आहे तर ईश्वराहून भिन्न दुसरा पदार्थ होता व जर गुण होय ह्मणाल तर गुणापासून द्रव्य कधीं बनूं शकत नाहीं, जसें रूपापासून अग्नि आणि रसापासून जल बनत नाहीं. ईश्वरापासून जगत् झालें असतें तर ईश्वराप्रमाणें जगताचें गुण, कर्म, स्वभाव बनलें असतें परंतु ईश्वर सदृश तें नसल्यामुळें ईश्वरापासून तें बनलेलें नाहीं हें निश्चित होय. ईश्वरापासून नव्हे परन्तु परमाणु—प्रकृतीपासून तें बनलें आहे ह्मणूनच परमाणु—प्रमाणें गुणधारी जगत् दिसत आहे. ईश्वर जगत् निर्माण—कर्ता आहे असें जे वेदादि शास्त्रांत लिहिलें आहे त्याप्रमाणेंच त्यास जगन्नियंता माना. आदमाचें आंतरस्वरूप जीव व बाह्य मनुष्यवत् आहे तसें ईश्वराचें स्वरूप कां नाहीं ?

कारण जर आदम ईश्वराचे प्रतिछायेप्रमाणें बनलेला आहे तर ईश्वरही आत्मासारखा अवश्य असला पाहिजे. ॥ ४ ॥

५–आणि परमेश्वर देव यानें भूमींतील मातीचा मनुष्य घडिला व त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायु फुंकला. ह्मणून मनुष्य जीवंत प्राणी झाला. परमेश्वर देव यानें एदनांत पूर्वेकडे बाग लाविला आणि ज्या मनुष्याला, त्यानें घडिलें होतें त्याला तेथें ठेविलें. आणि बागेच्यामध्यें जीवनाचें झाड आणि बरें व वाईट जाणण्याचें झाड हीं परमेश्वर देव यानें भूमींतून उगवत असें केलें. —उत्पति अ. २ ओ. ७।८।९॥

**समीक्षकः**—ईश्वरानें जेव्हां एदन बागेमध्यें आदमाला ठेवलें होते तेव्हां त्याला माहीत झालें नाहीं काय कीं आदमाला पुनः दुसरीकडे न्यावें लागेल—एदनाच्या पूर्वेस ईश्वरानें मातीपासून आदमाला जर बनविलें तर तो ईश्वराच्या स्वरूपापासून झाला नाहीं आणि ईश्वर स्वरूपापासून ह्मणावयाचें असेल तर ईश्वरदेखील मातीपासूनच बनला असेल ? ईश्वरानें आदमाच्या नाकपुड्यांत श्वास फुंकला तर तो श्वास प्राणवायु ईश्वर-स्वरूप होता वा भिन्न ? भिन्न होता ह्मणाल तर ईश्वर-स्वरूपाप्रमाणें आदम नव्हता, जर एक आहे तर आदम आणि ईश्वर एक-स्वरूपी झाले जर एक स्वरूपी आहेत तर ईश्वरामध्येंही आदमाप्रमाणें जन्म, मरण, वृद्धि, क्षय, क्षुधा, तृषा आदि दोष आले. मग असा सदोष जो आहे तो ईश्वर कसा होऊं शकतो ? याकरितां असल्या धर्मपुस्तकाचें कथन योग्य नाहीं व तें धर्म-शास्त्रही ईश्वर कृत नव्हे ॥ ५ ॥

६—मग परमेश्वर देव यानें आदमाला गाढ झोंप लाविली; आणि तो झोपेंत असतां त्याची एक फांसोळी काढून तिच्या ठिकाणीं मांस भरलें. आणि परमेश्वर देव यानें जो फांसोळी मनुष्यांतून काढली होती तिची स्त्री केली; आणि तिला आदमाकडे आणिलें. —उत्पत्ति अ. २ ओ. २१।२२॥

**समीक्षकः**—मातीपासून ईश्वरानें आदम बनविला मग त्याची स्त्री मातीपासून कां निर्माण केली नाहीं ? आणि स्त्री जशी हाडाची बनविली तसा आदाम कां हाडा-पासून उत्पन्न केला नाहीं ? नरापासून पैदा झाल्यामुळें नारी नांव झालें तर नारीपासून नर नांवहि असलें पाहिजे व त्यांच्यांत परस्पर प्रेमहि रहावें, ज्याप्रमाणें स्त्रीवर पुरुषानें प्रेम करावें त्याप्रमाणें पुरुषावर स्त्रीनेंहि प्रेम करावें. विद्वज्जनहो, ईश्वराची पदार्थविद्या अर्थात् "फिलॉसाफी" कशी झळकते आहे ती पहा ! आदामाची–नराची एक फांसोळी काढून त्यानें नारी बनविली तरी सर्व मनुष्यांच्या फांसळ्या भरपुरच ! वास्तविक सर्व पुरुषांची एक फांसळी स्त्रियांपेक्षां कमी असावी ती कां नाहीं ? स्त्रीलाच एक फांसोळी असावयास पाहिजे कारण ती एका फांसोळीचीच निर्माण केली आहे ! ज्या सामग्रीनं ईश्वरानें सर्व जग निर्माण केलें त्याला स्त्री शरीर बनविणें शक्य नव्हतें काय ? यावरून बायबलाचा सृष्टिक्रम सृष्टिविद्येच्या पूर्ण विरुद्ध आहे ॥ ६ ॥

७—परमेश्वर देव यानें जे वनपशु उत्पन्न केले होते त्या सर्वांमध्यें साप धूर्त होता तो स्त्रीला ह्मणाला, बागांतील सर्व झाडांचें फळ खाऊं नका असें देवानें तुह्मांस सांगितलें हें खरें काय ? मग स्त्री सापाला ह्मणाली, आह्मी बागांतील झाडांच्या फळांतून खावें; परंतु बागाच्या मध्यभागीं जें झाड आहे, त्याच्या फळाविषयीं देवानें असें ह्मटलें आहे कीं, त्यांतून खाऊं नका व त्याला शिवूं नका, शिवाल तर मराल. मग स्त्रीला साप ह्मणाला, तुह्मी मराल असें कांहीं नाहीं; कां तर देवाला ठाऊक आहे कीं, ज्या दिवशीं तुह्मी त्यांतून खाल त्या दिवशीं तुमचे डोळे उघडतील, आणि देवासारखी तुह्मी बरें वाईट जाणणारीं व्हाल, मग त्या झाडाचें फळ खाण्यास चांगलें आणि दिसण्यांत सुंदर आणि शहाणें करण्यासाठीं तें इष्ट आहे. असें जेव्हां स्त्रीनें पाहिलें, तेव्हां तिनें त्याचें फळ घेऊन खाल्लें, आणि त्यांतून आपल्या नवऱ्यालाही दिलें,आणि त्यानेंही खाल्लें. तेव्हां त्या उभयतांचे डोळे उघडले, आणि आपण नग्न आहों असें त्यांस समजलें; मग त्यांनीं अंजिराचीं पानें शिवून आपणांसाटीं वस्त्रें केलीं. मग परमेश्वर देव सापाला ह्मणाला; त्वां हें केलें आहे यामुळें सर्व ग्राम पशूंमध्यें व सर्व वनपशूंमध्यें तूं शापित आहेस; तूं आपल्या पोटानें चालशील आणि आयुष्यभर माती खाशील. आणि मी तुझ्या व स्त्रीच्यामध्यें आणि तुझें संतान व तिचें संतान यांमध्यें परस्पर वैर ठेवीन; तें तुझें डोकें फोडील आणि तूं त्याची टांच फोडशील. स्त्रीला तो ह्मणाला, मी तुझें गरोदरपणाचें दुःख व वेदना वाढवीन तूं दुःखानें लेंकरें प्रसवशील, आणि तुझी ओढ तुझ्या नवऱ्याकडे लागून तो तुजवर धनीपण करील. आणि आदमाला तो ह्मणाला, त्वां आपल्या स्त्रीची गोष्ट ऐकून ज्या झाडाचें फळ खाऊं नको ह्मणून म्यां तुला आज्ञा दिली होती त्याचें फळ त्वां खाल्लें यास्तव तुझ्यामुळें भूमि शापित झाली आहे, तिचें फळ तूं आयुष्यभर कष्टानें खाशील. ती तुजसाठीं कांटे व कुसळ उपजवील, आणि तूं शेतांतील हिरवळ खाशील.

—उत्पत्त अ. ३ ओ. १-२-३-४-५-६-७-१४-१५-१६-१७-१८॥

**समीक्षक**—ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञ असता तर प्रथमच धूर्त साप अर्थात् सैतान त्यानें कां बनविला असता ? असा दुष्ट सैतान ज्या ईश्वरानें निर्माण केला तो ईश्वराच अपराधांचा खरा वांटेकरी होय ! कारण त्यानें दुष्टाला बनविलेंच नसते तर तो दुष्टता कां करता ? आणि तो पूर्वजन्म मानीत नाहीं तर कांहीं अपराध नसता तो पापी कां ह्मणून बनविला ? खरें विचारलें तर तो साप नव्हता पण मनुष्य होता. मनुष्य असल्याखेरीज त्याला मानवी भाषा कशी बोलता आली असती ? जो स्वतः खोटा व दुसऱ्यांना खोट्या मार्गी नेतो त्याला सैतान ह्मटलें पाहिजे वास्तविक या प्रसंगीं सैतान सत्यवादी होता त्यानें आदामाच्या बायकोला मुळींच भुलविलें नाहीं. परंतु जें असत्य व खोटें होतें तेंच त्यानें सांगितलें. ईश्वरानेंच आदाम व हव्वा यांना

खोटें सांगितलें होतें कीं, ह्या झाडाचें फळ खाल तर तुह्मी मराल. जर तें झाड ज्ञानदातें आणि अमर बनविणारें होतें तर त्याचें फळ खाण्याची ईश्वरानें कां मनाई केली ? ज्या अर्थी त्यानें मनाई केली त्या अर्थी बायबलोक्त ईश्वर लबाड व लोकांना भुलविणारा–फसविणारा ठरला ! कारण त्या वृक्षाचें फळ मनुष्यांना ज्ञानदायक आणि सौख्यकारक होतें, अज्ञानवर्धक व मृत्युकारक नव्हतें. त्या वृक्षाचें फळ खाण्याची बंदी ईश्वराला करावयाची होती तर त्या वृक्षाची उत्पत्ति त्यानें कोणत्या उद्देशानें केली ? स्वतःकरितां केली असेल तर तो स्वतः अज्ञानी व मृत्युवान् होता काय ? दुसऱ्यासाठीं त्या वृक्षाची उत्पत्ति होती तर त्याचें फळ खाणें यांत अपराध मुळींच नव्हे व आजकाल असा एखादा वृक्ष ज्ञानकारक व मृत्युनिवारक पाहण्यांत येत नाहीं. ईश्वरानें तर त्याचें बीज नष्ट केलें नसेल ? असल्या कृत्यांनीं जर मनुष्य छळी, कपटी होत असतो तर ईश्वर त्याप्रमाणें कशावरून झाला नसेल ? जो दुसऱ्याशीं कपट करतो, त्यांचा छळ करतो तो छळी कपटी कां नसेल ? विनाकारण आदाम, हव्वा व सर्प यांना ज्यानें शाप दिला तो ईश्वर अन्यायी होय. हा शाप ईश्वरालाच लागला पाहिजे कारण तो खोटें बोलला व त्यांना भुलविलें. हव्वेच्या पूर्वी ज्या स्त्रीया प्रसूत होत होत्या त्यांना गर्भावस्थेची व प्रसवण्याची दुःखें, वेदना ह्या सहन कराव्या लागत नव्हत्या ही 'फिलॉसाफी' अजब खरी ! परिश्रमावांचून कोणी तरी आपली उपजीविका करूं शकतो ? प्रारंभी वृक्षांना कांटे वगैरे नव्हतें ? जर प्रत्यक्ष ईश्वरानेंच मनुष्यांना तुह्मी शेतांतील हिरवळ खाल अशी उचित आज्ञा केली आहे तर उत्तरार्धांत मांस खाणें बायबलांत लिहिलें आहे तें मिथ्या कां नव्हे ? बायबलाचा उत्तरार्ध खरा असेल तर हा पूर्वार्ध असत्य होय. आदमाचा कांहीं अपराध जर सिद्ध होत नाहीं तर आदमाचे अपराधामुळें त्याचें संतान जी मनुष्यजाती ती सर्व अपराधी, पापी आहे असें ख्रिस्ती लोक कां ह्मणतात ? असा ईश्वर व त्यानें दिलेलें असलें धर्मपुस्तक बुद्धिमानांना कधीं तरी युक्त वाटेल काय ? ॥ ७ ॥

८—मग परमेश्वर देव बोलला, पहा, मनुष्य बरें व वाईट जाणण्याविषयीं आह्मांतील एकासारखा झाला आहे; तर आतां त्यानें हात लांब करून जीवनाच्या झाडाचेंही फळ तोडून खाऊं नये व अमर होऊं नये; ह्याप्रमाणें त्यानें मनुष्याला बाहेर घालविलें आणि जीवनाच्या झाडाची वाट राखण्यास एदेन बागाच्या पूर्वेकडे करूब व ज्वालानुरूपी फिरती तरवार ठेवली.

—उत्पत्ति अ. ३ ओ. २२–२४ ॥

**समीक्षक**—तें फळ आदामानें व त्याच्या बायकोनें खाल्लें ह्मणून तें जोडपें आपल्यासारखें ज्ञानवान् झालें असा ईश्वराला कसा भ्रम झाला व मनुष्यें जर त्यासारखीं झालीं असतीं तर त्यांत कोणती वाईट गोष्ट होती ? ही शंकाच त्याला कां पडली ? ईश्वराची बरोबरी कधीं कोणीं करूं शकत नाहीं परंतु या ओव्यांवरून हेंच सिद्ध होतें.

कीं, बायबलांत वर्णिलेला ईश्वर हा देव नव्हता तर एक विशेष मनुष्य होता. बायबलांत जेथें व जेव्हां ईश्वराचे कथन आलेलें आहे तेव्हां व तेथें मनुष्यांप्रमाणेंच वर्णन आलें आहे. आतां पहा कां, आदामाचें ज्ञानवर्धन पाहून ईश्वर किती दुःखी झाला व नंतर त्यानें त्या अमर झाडाचें फल खाण्यामध्यें किती ईर्ष्या केली; ईश्वरानें आदामाला एदेन बागांतून बाहेर घालविलें व जीवनाच्या झाडाची वाट राखायाला करूब व ज्वालारूपी तरवारीचा त्यानें पहारा बसविला असलीं कामें ईश्वर करूं शकत नाहीं. तीं मनुष्यें करितात यावरून ख्रिस्त्यांचा परमेश्वर देव सर्वज्ञ तर नव्हेच पण एक साधारण मनुष्य होय ! ॥ ८ ॥

९—हबेल मेंढपाळ झाला, आणि काइन शेतकरी झाला. आणि कांहीं दिवसानंतर असें झालें कीं, काइनानें परमेश्वरासाठीं शेताच्या उपजांतील अर्पण आणिलें आणि हबेलानें आपल्या मढरांतलि प्रथम जन्मलेलें व त्यांतील पुष्ट यांतून अर्पण आणिलें, आणि परमेश्वरानें हबेल व त्याचें अर्पण यांस मान्य केलें. पण काईन व त्याचें अर्पण यांस मान्य केलें नाहीं, यास्तव काइनाला फार राग आला आणि त्याचें तोंड उतरलें. तेव्हां परमेश्वर काइनला बोलला, तुला राग कां आला ? आणि तुझें तोंड कां उतरलें ?

—उत्पत्ति अ. ४ ओ. ३।४।५।६ ॥

**समीक्षक**—ईश्वर जर मांसाहारी नसतां तर त्यानें पुष्ट मेंढरु याचें अर्पण स्वीकारलें नसतें व हाबेलाचा सत्कार घेला नसता आणि काइन व त्यानें अर्पण केलेली भेट यांचा तिरस्कार त्यानें केला नसता. अशा प्रकारचें झगडे लावणें व हाबेलाच्या मृत्युस कारणीभूत होणें आणि साधारण माणसें एकमेकांशी जसा व्यवहार करतात तसा व्यवहार करणें इत्यादि गोष्टी ख्रिस्त्यांच्या ईश्वराच्या आहेत. बाग बनाविणें, त्यांत येणें जाणें ही मनुष्यांचीं कामें आहेत. यावरून कळून येतें कीं, असलें धर्मपुस्तक-बायबल मनुष्यांनीं रचलेलें आहे, ईश्वरानें नव्हे ॥ ९ ॥

१०—नंतर परमेश्वर काइनला म्हणाला, तुझा भाऊ हबेल कोठें आहे ? तेव्हां तो बोलला मला ठाऊक नाहीं; मी आपल्या भावाचा संभाळणारा आहे काय ? मग तो म्हणाला, त्वां काय केलेंस ? तुझ्या भावाच्या रक्ताची वाणी भूमींतून मला हांक मारिते. तर आतां ज्या भूमीनें तुझ्या भावाचें रक्त तुझ्या हातांतून घ्यावयास आपलें तोंड उघडिलें तिचा शाप तुजवर आहे. उत्पत्ति अ. ४ ओ. ९।१०।११ ॥

**समीक्षक**—काइनाच्या तोंडून ऐकल्याखेरीज सर्वज्ञ ईश्वर हबेलाचें वृत्त जाणूं शकत नव्हता ? आणि भूमींतून रक्त-वाणीचा शब्द कधींतरी कोणाला हांक मारतो काय ? ह्या सर्व गोष्टी अविद्वानाच्या असल्यामुळें बायबल हें ईश्वरकृत नव्हे पण विद्वान मनुष्यकृत असेंहि नव्हे ॥ १० ॥

११—आणि मथुशलहास जन्म दिल्यावर हनोख तीनशें वर्षे देवाच्या संगती चालला. —उत्पत्ति अ. ४ ओ. २२ ॥

**समीक्षक**—खिस्त्याच्या ईश्वर मनुष्य नव्हता तर त्याच्याबरोबर हनोख कसा चालूं शकला ? याकरितां जो वेदोक्त निराकार प्रभु परमात्मा आहे त्यालाच खिस्ती लोकांनीं मानावें त्यानेंच त्यांचें कल्याण होईल ॥ ११ ॥

१२—आणि असें झालें कीं, मनुष्यें भूमीवर बहुत होऊं लागलीं आणि त्यांस कन्या झाल्या. तेव्हां देवाच्या पुत्रांनीं मनुष्यांच्या कन्यांस पाहिलें कीं, त्या सुंदर आहेत आणि सर्वांतून ज्या त्यांनीं निवडल्या त्या त्यांनीं बायका करून घेतल्या. आणि त्या दिवसांत पृथ्वीवर महाकाय होते. आणि देवाचे पुत्र मनुष्यांच्या कन्यांपाशीं गेले, आणि त्यांस त्यांपासून पुत्र झाले; पूर्वकाली जीं पराक्रमी व नामांकित मनुष्यें होतीं तीं हीच. परमेश्वरानें पाहिलें कीं, पृथ्वीवर मनुष्यांची दुष्टाई मोठी आणि त्याच्या हृदयाच्या विचारांतील प्रत्येक भावना सर्वदा केवळ वाईट आहे. तेव्हां परमेश्वर मनुष्याला पृथ्वीवर उत्पन्न केलें होतें. यामुळें अनुतापाला आणि तो आपल्या अंतःकरणांत खिन्न झाला. मग परमेश्वरानें म्हटलें कीं, ज्या मनुष्याला म्यां उत्पन्न केलें त्याला मी भूमीच्या पाठीवरून पुसून टाकीन, मनुष्याबरोबर पशूलाही, आणखी सरपटणारे व आकाशांतील पक्षी यांसही, कां कीं, त्यांस उत्पन्न केल्यामुळें मला अनुताप झाला आहे.

—उत्पत्ति अ. ६ ओ १–२–४–५–६॥

**समीक्षक**—खिस्त्यांना विचारलें पाहिजे कीं, देवाचे पुत्र, त्याची बायको, त्याची सासू–सासरा मेहुणा व सोयरी-धायरीं कोणकोणतीं आहेत ? कारण देवाचे पुत्र मनुष्यांच्या कन्यांपाशीं गेले आणि त्यांस त्यांपासून पुत्र झाले अर्थात् देव मनुष्यजातीचा या क्रियेनंतर, आजोबा बापांचे बाप–बनलेले आहेत, देव कितीतरी भाग्यशाली सद्गृहस्थ आहे ! सर्व जगांत त्याच्या पुत्र प्रपौत्रांची नुसती गर्दी माजून राहिली आहे ! वाचक, ईश्वर व त्याचें पवित्र शास्त्र असल्या गोष्टी वर्णन करूं शकत नाहीं ! पण असल्या धर्मपुस्तकावरून हेंच सिद्ध होतें कीं, जुन्या कराराच्या उत्पत्तीचे वेळीं जे जंगली लोक होते त्यांनींच हें पुस्तक बनविलें आहे. जो सर्वज्ञ नाहीं, ज्याला भविष्यकाळाचें ज्ञान नाहीं तो ईश्वर नसून जीव होय. ज्यानें सृष्टि बनविली त्याला त्या वेळेसच कळलें नाहीं काय कीं, भविष्यकाळीं मनुष्यें दुष्ट होतील ? योगी साधारण प्रतीचा विद्वान मनुष्य देखील शांततावृद्धि व ज्ञानप्रचार पाहून शोक करीत नाहीं, पश्चाताप पावत नाहीं पण खिस्त्यांचा परमेश्वर देव योगी व साधारण विद्वान मनुष्यापेक्षांहि कमी असल्यामुळें त्यानें मनुष्याला पृथ्वीवर उत्पन्न केलें होतें यामुळें अनुतापला, आपल्या अंतःकरणांत खिन्न झाला व या मनुष्यांना त्यांच्या बरोबर निष्पापी पशूंना, पक्षांना यांसही भूमीच्या पाठीवरून पुसून टाकण्यासाठीं शाप देता झाला. असला विषाद मानणारा, प्रथम क्रूर म

करून नंतर तें चुकलें ह्मणून पश्चाताप करणारा ईश्वर सर्वज्ञ नसून, पापी, हर्षशोकां दिकांनीं भरलेला, क्रूर, अज्ञानी, तामसी मनोवृत्तीचा बायबलोक्त परमेश्वर देव जो आहे तो व त्याचें धर्मपुस्तक त्याज्य समजून 'सच्चिदानंदरूप' असा, सर्व पापें, क्लेश, दुःख, अज्ञान, यांनीं रहित वेदोक्त परमेश्वर जो आहे तो प्रभु व त्याचें जगदारंभीचें विशुद्ध ज्ञान-वेद हीं जर खिस्तांनीं मानलें असतीं अथवा अद्यापिहि ते मानतील तर त्यांचा मनुष्यजन्म ते सफल करूं शकतील. ॥ १२ ॥

१३—आणि तारवाची लांबी तीनशें हात, त्याची रुंदी पन्नास हात व त्याची उंची तीस हात याप्रमाणें तें कर. परंतु तुजशीं मी आपला करार स्थापीन आणि तूं तारवांत जाशील. तुझे बरोबर तुझे पुत्र व तुझी बायको व तुझ्या पुत्रांच्या बायका जातील. आणि सर्व प्राण्यांच्या प्रत्येक जातींतून जिवंत राखण्यासाठीं दोन दोन तूं आपल्या बरोबर तारवांत घे; तीं नर व मादी अशीं असावीं. पक्षांच्या एका एका जातींतून आणि पशूंच्या एक एका जातींतून आणि भूमीवरची सर्व सरपटणारी यांच्या एक एका जातींतून ह्मणजे सर्वांतून दोन, दोन, त्वां त्यांस जीवंत राखावें ह्मणून तुजकडे येतील. आणि सर्व प्रकारच्या अन्नांतून तूं आपणासाठीं मिळवून आपणापाशीं सांठवून ठेव; ते तुझ्या व त्यांच्या खाण्यासाठीं होईल. तसे नोहानें केलें. देवानें त्याला जें कांहीं अज्ञापिलें तें त्यानें केलें.

—उत्पत्ति अ. ६ ओ १७, १८, १९, २०, २१, २२ ॥

**समीक्षकः**—असल्या अविद्येनें भरलेल्या असंभवनीय गोष्टी सांगणारा वक्ता परमेश्वर आहे असें कोणीतरी विद्वान् मान्य करूं शकतील काय ? कारण एवढ्या मोठ्या रुंदी उंचीच्या लांबलचक नांवेत हत्ती हत्तीण, उंट उंटीण, आदि क्रोडो जंतु आणि त्यांच्या खाण्या-पिण्यासाठीं खाद्यपेयादि पदार्थ व नोवाचें संपूर्ण कुटुंब आणि त्या कुटुंबांतील ह्याडून सर्व मंडळी इतक्या सर्वांचा समावेश त्या अगडबंब नावेंत होणें शक्य आहे काय ? याकरितां हें मनुष्यकृत पुस्तक आहे व ज्यानें हा लेख लिहिला तो विद्वानदेखील नव्हता ॥ १३ ॥

१४—नंतर नोहानें परमेश्वरासाठीं वेदी बांधिली. आणि सर्व शुद्ध पशूंतून व सर्व शुद्ध पक्ष्यांतून कांहीं घेऊन वेदिवर होम केले. तेव्हां परमेश्वर सुवास घेऊन प्रसन्न झाला, आणि परमेश्वरानें आपल्या मनांत ह्मटलें कीं, मनुष्यामुळें मी भूमीला कधीं शापणार नाहीं; मनुष्याच्या मनांतील भावना त्याच्या बाळपणापासून वाईट आहे; तरी जसें आता म्यां केलें आहे तसें मी फिरून कधीं सर्व जिवांस मारणार नाहीं.

उत्पत्ति अ. ८ ओ. २० । २१ ॥

**समीक्षकः**—वेदी बांधणें, होम करणें हे विधि बायबलांत ज्या अर्थी वर्णिले गेले आहेत, त्या अर्थी ते वेदांतूनच घेतले आहेत. परमेश्वराला नाक आहे ह्मणावयाचें त्याखेरीज

त्यानें सुवास घेऊन प्रसन्न झाला नसता ? ख्रिस्त्यांचा परमेश्वर मोठा अल्प समाधानी आणि अल्प क्रोध एखाद्या साधारण मनुष्याप्रमाणेंच नव्हे काय ? मनुष्याप्रमाणें शीघ्र क्रोधवश होऊन स्वचुकीचा पश्चात्ताप व्यक्त करतो व शाप देण्यास तयार होतो, कीं लगेच होमांतील सुगन्ध नाकांत जातांच प्रसन्न होऊन मी आतां पुनः कधीं शाप देणार नाहीं, असें ह्मणण्यासही तयार होतो ! प्रथम सर्वांना मारण्याची खटपट व या ठिकाणीं आतां मी त्यांना मारणार नाहीं अशी त्याची खटपट दिसून येत आहे ! ! एखाद्या विद्वानाची प्रतिज्ञा देखील इतकी चंचल अस्थिर नसते परंतु ख्रिस्त्यांचा परमेश्वर देव हा ईश्वर नसून साधारणसा विद्वान मनुष्यदेखील नाहीं, तर शुद्ध बालिश आहे ! ! !

१५—आणि देवानें नोहास व त्याच्या पुत्रांस आशिर्वाद देऊन ह्मटलें कीं, सफल व्हा आणि बहुत वाढून पृथ्वी भरा. सर्व सचल जीव तुमचे खाद्य होतील. जशी कोवळी हिरवळ म्यां तुह्मांस दिली तसें अवघें दिलें आहे. तथापि ज्यांत जीवन ह्मणजे रक्त आहे तें मांस खाऊं नका. —उत्पत्ति अ ९ ओ. १।३।४॥

**समीक्षक**—एकाला प्राणकष्ट देऊन दुसऱ्याला सुखी करावें ह्या कृतीनें ख्रिस्त्यांचा ईश्वर दयाहीन ठरत नाहीं काय ? जे आईबाप एका मुलाला मारून दुसऱ्याला पोषितात ते महापापी नव्हेत काय ? असाच पापी ईश्वर ख्रिस्त्यांचा आहे. ईश्वराला तर सर्व प्राणी पुत्रवत् असले पाहिजेत पण असें नाहीं ह्मणूनच यांचा ईश्वर कसाईवत् काम करीत असल्यामुळें तो निर्दयी, पापी आहे असेंच नव्हे काय ? ॥१५॥

१६—आणि सर्व पृथ्वीवर भाषा एक व बोली एकच होती, आणि ते ह्मणाले आपण सर्व पृथ्वीवर पांगूं नये आणि आपलें नांव व्हावें ह्मणून नगर व त्याचें शिखर आकाशाला लागेल असा बुरुज बांधू. मग जें नगर व बुरुज मनुष्य संतान बांधीत होतें तें पहावयास परमेश्वर उतरला. मग परमेश्वरानें ह्मटलें कीं, पाहा, लोक एकच आहेत व त्यांची भाषाही एकच आहे आणि त्यांच्या करणीचाही हा केवळ आरंभ आहे. ह्मणून ते जें कांहीं योजतील तें केल्यावांचून राहणार नाहींत. चला आपण उतरूं आणि त्यांनीं एकमेकांची भाषा समजूं नये ह्मणून तेथें त्यांच्या भाषेचा गोंधळ करूं, मग परमेश्वरानें त्यांस तेथून सर्व पृथ्वीच्या पाठीवर विखारिलें, आणि त्यांनीं नगर बांधण्याचें सोडलें. —उत्पत्ति अ. ११ ओ. १—४—५—६—७—८ ॥

**समीक्षकः**—जेव्हां सर्व पृथ्वीवर एकच भाषा व एकच बोली होती तेव्हां संपूर्ण मनुष्य जातीमध्यें अत्यंत प्रेम, आनंद हीं खरोखर वसत असतील, परंतु त्या प्रेमाचा व आनंदाचा विरस ख्रिस्त्यांच्या 'मत्सरी ईर्ष्यक' ईश्वरानें केला ! त्याला हें न पाहवल्यामुळें त्यानें त्यांच्या एक भाषेचा गोंधळ केला आणि सर्वांचा सत्यानाश केला ! ख्रिस्ती ईश्वरानें खरोखर हा मोठा अपराध केला ! हें ईश्वरी कृत्य सैतानाच्या

कामापेक्षांहि नीचपणाचें होय ! यावरून हेंही विदित होतें कीं, हा परमेश्वर देव सनाई पर्वतावर राहात होता त्याला जीवांची उन्नति असह्य होत होती ! असली वृत्ति अविद्यांखेरीज कोणाची असेल ? या कृतीवरून ख्रिस्त्यांचा देव हा ईश्वर आहे व त्याचें पुस्तक बायबल हें ईश्वरोक्त आहे हें ह्मणणें शक्य कसें होईल ? ॥ १६ ॥

१७—आणि असें झालें कीं, मिसराच्या जवळ जाऊन पोंहोंचल्यावर तो आपली बायको साराय इला ह्मणाला, अगे पहा, तूं सुंदर रूपाची स्त्री आहेस, हें मला ठाऊक आहे. तर असें होईल कीं, जेव्हां मिसरी तुला पहातील तेव्हां ते ह्मणतील, हीं याची बायको आहे; मग ते माझा जीव घेतील आणि तुला वांचवितील. तर मी याची बहिण आहे असें सांग, ह्मणजे तुझ्या कडून माझें बरें होईल आणि तुझ्यामुळें माझा जीव वांचेल. —उत्पत्ति अ. १२ ओ. ११-१२-१३

**समीक्षकः**—पहा, जो आब्राहाम मोठ्यांत मोठा पैगंबर झाला असें ख्रिस्त मुसलमान गर्जना करून त्याचें ढोलकें वडवितात तो व त्याचें कर्म किती मिथ्या भाषणादिकांनीं भरलेलें खोटें आहे. ज्यांचे असे पैगंबर आहेत त्यांना विद्या वा कल्याणाचा मार्ग कसा सांपडणार बरें ? ॥ १७ ॥

१८—आणि देवानें अब्राहामास सांगितलें कीं, माझा करार पाळ; तूं आणि तुझ्यामागें तुझें संतान पिढ्यानपिढी पाळो. मजशीं व तुजशीं व तुझ्यानंतर तुझ्या संतानाशीं जो माझा करार तुह्मीं पाळावा तो हाच कीं, तुह्मांमधील प्रत्येक पुरुषाची सुंता व्हावी. तुह्मीं आपली अग्रत्वचा कापून टाका; ही मजमध्यें व तुमच्यामध्यें कराराची खूण होईल, ह्मणजे तुमच्या पिढी दर पिढी आठ दिवसांचें तुमचें प्रत्येक घरांत जन्मलेलें पुरुष-संतान याची आणि जो तुझ्या संतानांतील नव्हे, तर कोणत्याही परक्या लोकांपासून पैक्यानें विकत घेतलेला याची सुंता व्हावी, ह्मणजे माझा करार तुमच्या देहांत सर्व कालाचा करार होईल. आणि बेसुंती पुरुष-संतान ज्याची सुंता झाली नाहीं तो प्राणी आपल्या लोकांतून छेदलाच जाईल; त्यानें माझा करार मोडला आहे.

—उत्पत्ति अ. १७ ओ. ९-१०-११-१२-१३-१४. ॥

**समीक्षकः**—आतां पहा, ईश्वरानें दिलेली अन्यथा विचित्र आज्ञा. मनुष्याशीं त्याला सुंतेद्वारें करार करावयाचा होता तर जन्मतःच त्यानें इंद्रियावरील अग्रत्वचा उत्पन्न केली नसती. जी अग्रत्वचा त्यानें उत्पन्न केली आहे ती इंद्रियरक्षणार्थ मोठ्या कुशलतेनें केलेली आहे. ज्याप्रमाणें नेत्रावरील त्वचा नयनसंरक्षणार्थ त्याप्रमाणेंच ती अग्रत्वचा होय. ती जर नसती तर मुंगीचें चावणें किंवा थोडीशी इजा होणें यायोगें पुष्कळ दुःख झालें असतें शिवाय लघुशंके नंतर मूत्रांश वस्त्रांना लागूं नये इत्यादिकांकरितां ती अग्रत्वचा न कापणें, सुंता न करणें हें योग्य असून सुंता करणें हें वाईट होय.

जर हा ईश्वरी करार असता तर ख्रिस्ती लोकांनीं तो कां मोडला ? ते आपली सुंता कां करून घेत नाहींत ? ख्रिस्त येशूनें प्रतिज्ञा केली आहे कीं, पवित्र शास्त्रांतील एक बिंदु-देखील व्यर्थ नाहीं. येशूची ही प्रतिज्ञा खोटी कीं खरी ह्याचा पूर्ण विचार ख्रिस्ती लोक मुळींच करीत नाहींत ॥ १८ ॥

१९—नंतर देव अब्राहामाशीं बोलणें संपवून त्यापासून वर गेला.

—उत्पत्ति अ. १७ ओ. २२ ॥

**समीक्षकः**—यावरून सिद्ध होतें कीं ख्रिस्त्यांचा देव मनुष्य वा पक्षिवत् होता. वरून खालीं व खालून वर येत जात होता. हा कोणी इंद्रजाल रचणारा पुरुष दिसतो ॥ १९ ॥

२०—आणि परमेश्वरानें मम्रे वनांत त्याला दर्शन दिलें तेंव्हां तो दुपारीं उन्हाचे वेळेस डेऱ्याच्या दाराशीं बसला होता. आणि तो आपली दृष्टी वर करून पाहतो तों तीन पुरुष त्याजजवळ उभे आहेत, आणि त्यानें पाहून त्यांस भेटावयास डेऱ्याच्या दारा-पासून धांवत जाऊन भूमीपर्यंत नमन केलें; आणि ह्मणाला, माझ्या प्रभू, तुमच्या दृष्टींत मी कृपा पावलों तर आपल्या दासाजवळून जाऊं नका. थोडें पाणी आणूं द्या, आणि तुह्मी आपले पाय धुऊन झाडाखालीं विसावा घ्या. मी थोडी भाकर आणीन आणि तुह्मी आपल्या जीवास आधार करा मग पुढें जा; कां तर याकरितांच तुह्मी आपल्या दासाजवळ आलां आहां; तेंव्हां ते ह्मणाले, तूं बोलतोस तसें कर. मग अब्राहाम डेऱ्यांत सारेकडे धांवत जाऊन ह्मणाला, तीन माप सपीठ लवकर तयार कर व तें मळून पोळया कर. आणि अब्राहामानें गुरांकडे धांवत जाऊन चांगलें कोंवळें वासरूं घेऊन चाकराच्या हातीं दिलें, मग त्यानें तें तयार करावयास त्वरा केली. नंतर त्यानें लोणी व दूध व तयार केलेलें वासरूं हीं आणून त्यापुढें ठेविलीं; आणि ते जेवीत असतां तो त्यांजजवळ झाडाखालीं उभा होता.

—उत्पत्ति अ. १८ ओ. १-२-३-४-५-६-७-८. ॥

**समीक्षकः**—सज्जनहो ! लक्षांत ठेवा, ज्यांचा परमेश्वर कोंवळें वासरूं मिटक्या मारून खातो त्याचें उपासक गाय, वासरें आदिपशूंना गटागट कां खाणार नाहींत ? ज्याला दयामाया बिल्कुल नाहीं, जो मांस खाण्यास इतका आतुर असतो, तो हिंसक मनुष्यापेक्षां कोणी अन्य असूं शकेल काय ? ईश्वराबरोबर आणखी दुसरीं दोन माणसें कोण होतीं ? यावरून विदित होतें कीं ही टोळी जंगली मनुष्यांची होती व त्यांचा जो पुढारी होता त्याचें नांव बायबलांत परमेश्वर देव ठेवलेलें असावें. या गोष्टीमुळेंच बाय-बल ईश्वरकृत आहे व बायबलोक्त देव ईश्वर आहे असें बुद्धिमान् लोक मानीत नाहींत. ॥ २० ॥

२१—तेंव्हां परमेश्वर अब्राहामाला ह्मणाला, सारा हांसून कां ह्मणाली, मी ह्मातारी असतां निश्चयें प्रसवीन काय ? परमेश्वराला कोणतीही गोष्ट असाध्य आहे काय ?

—उत्पत्ति अ. १८ ओ. १३-१४. ॥

**समीक्षकः**—पहा, खिस्त्यांचा ईश्वर कसा बायकाप्रमाणें व मुलाप्रमाणें चिडतो व ताना मारतो त्या. ॥ २१ ॥

२२—तेंव्हां परमेश्वरानें सदोम व गमोरा यांवर गंधक व अग्नि आकाशांतून वर्षिला. आणि नगरें व अवघें मैदान आणि नगरांतील सर्व राहणारे व भूमींतून उगव-लेलें यांचा नाश केला.

—उत्पत्ति अ. १९ ओ. २४-२५ ॥

**समीक्षकः**—ही पण बायबलोक्त ईश्वरलीला ध्यानांत ठेवा कीं, सबंध शहरें जाळून त्यानें भस्म केलीं परंतु निरुपद्रवी व निष्पापी अशा बालकांचीहि त्याला यत्किंचित् कांहीं दयामाया आली नाहीं! सर्व लहान मोठे जन अपराधीच होते काय म्हणून त्यांना जमिनींत गाडून टाकलें? हा प्रकार न्याय दया व विवेक इत्यादिकोंच्या विरुद्ध होय. ज्यांचा ईश्वर असलीं कामें करतो त्याचे भक्त मग अशीं कृत्यें कां करणार नाहींत? ॥ २२ ॥

२३—चल, आपण आपल्या बापाला द्राक्षारस पाजूं आणि त्यापाशीं निजूं आणि आपल्या बापापासून संतान राखूं, तर त्या रात्रीं त्यांनीं आपल्या बापाला द्राक्षारस पाजला, मग वडील जाऊन आपल्या बापापाशीं निजली. मग असें झालें कीं, दुसऱ्या दिवशीं वडील धाकटीस म्हणाली. पहा, काल रात्रीं मी आपल्या बापापाशीं निजलें. या रात्रींही आपण त्याला द्राक्षारस पाजूं आणि तूं जाऊन त्यापाशीं नीज. तसें लोटाच्या दोघी कन्या आपल्या बापापासून गरोदर झाल्या.

उत्पत्ति अ. १९ ओ. ३२, ३३, ३४, ३६, ॥

**समक्षिकः**—अहाहा! पिता कन्या ज्या मद्यपानाच्या निशेंत असलें कुकर्म करूं शकतात तें दुष्ट मद्यपान खिस्ती लोक करितात तेंव्हां त्यांच्या कुकर्मांना काय पारावार राहत असेल? करितां सज्जनहो मद्यपानाचें नांव देखील घेऊं नका. ॥ २३ ॥

२४—आणि परमेश्वरानें सांगितल्याप्रमाणें सारेची भेट घेतली आणि परमेश्वरानें वचन दिलें होतें तसें सारेला केलें. म्हणजे सारा गरोदर होऊन जो काळ देवानें अब्राहामाला सांगितला होता त्यांत ती त्याच्या म्हातारपणीं पुत्र प्रसवली.

उत्पत्ति—अ. २१ ओ. १।२॥

**समीक्षकः**—आतां विचार करा, सारेची भेट घेऊन ती गरोदर झाली हें कसें घडलें? सारा व परमेश्वर याशिवाय तिसरा कोणी गर्भस्थापनेला कारणीभूत दिसतो आहे? हें स्पष्ट आहे कीं, सारा ईश्वरापासून गरोदर राहिली!!! ॥ २४ ॥

२५—नंतर अब्राहामानें पहांटेस उठून भाकरी व पाण्याची मसक घेतली आणि हागारेला देऊन तिच्या खांद्यावर ठेविली, आणि लेंकरूं देऊन तिला रवाना केलें; तेंव्हां

ती नेघून बैरसेवा रानामध्यें निघून गेली. तिनें लेंकरूं झाडाखालीं टाकलें. व समोर बसून हाक फोडून रडूं लागली, तेव्हां देवानें त्याचा शब्द एकला आहे.

—उत्पत्ति अ. २१ ओ. १४,१५,१६,१७ ॥

**समीक्षकः**—आतां ईश्वराची अजब श्रवणशक्ति व चमत्कार पहा, साराचा पक्षपात करून हागारेला तेथून काढलें व हांका मारून मारून रडूं लागली. पण देवांनीं शब्द ऐकला त्याचा हागारेचा कसा अद्‌भुत प्रकार आहे ? ईश्वराचें चित्त ठिकाणावर नसेल ? असलें पुस्तक व त्यांतील गोष्टी ईश्वरीय होऊं शकतील काय ? साधारण मनुष्यांना शोभतील अशा गोष्टीच यांत भरपूर. सत्यांश फारच थोडा ह्या पुस्तकांत भरलेला आहे ॥ २५ ॥

२६—या गोष्टीनंतर असें झालें कीं, देवानें अब्राहामाची परीक्षा पाहिली आणि त्याला ह्मटलें कीं, हें अब्राहामा ! अब्राहाम ह्मणाला, आज्ञा प्रभू. आणि त्यानें ह्मटलें तूं आपला एकुलता एक इसाक ज्यावर तूं प्रीति करितोस त्याला घेऊन मोरिया देशांत जा. आणि तेथील डोंगरावर एक जो तुला सांगेन त्यावर त्याचा होम कर. याप्रमाणें अब्राहामानें सर्व करून आपला पुत्र वधावयासाठीं हात लांबवून सुरा घेतला तेव्हां परमेश्वराचा दूत आकाशांतून त्याला हाक मारून ह्मणाला, तूं मुलावर आपला हात टाकू नको. तूं देवाला भितोस हें मीं जाणलें.

—उत्पत्ति अ. २२ ओ. १।२।९।१०।११।१२ ॥

**समीक्षकः**—आतां स्पष्ट झालें कीं, तो बायबलांतील ईश्वर अल्पज्ञ आहे व अब्राहाम हा एक भोळाभावडा मनुष्य होता. एरवीं दोघांनीं असल्या चेष्टा केल्या नसत्या ! ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञच असतां अब्राहामाचे अंतःकरणपरिक्षण मुलाच्या मानेवर सुरी ठेवीपर्यंत केव्हांच अगोदर त्यानें केले असतें. असा ईश्वर सर्वज्ञ नसून अल्पज्ञ आहे. ॥ २६ ॥

२७—महाराज, आमचें ऐक, आह्मामध्यें तूं देवाचा सरदार आहेस, आमच्या प्रेत स्थानांतील जी कूबर तुला आवडेल तींत तूं आपल्या मृताला पूर.

—अ. २३ ओ. ६॥

**समीक्षकः**—प्रेतें पुरण्यानें जगाचें फार नुकसान होतें कारण तीं सडून त्यांच्या दुर्गंधानें रोगांची वाढ होते. ( प्रश्न ) पहा, ज्यावर आपण प्रेम करतों त्याला आपण जाळणें हें योग्य नाहीं आणि ते पुरणें ह्मणजे जणूं काय त्याला निजविणें होय ह्मणून प्रेतें पुरणें हेंच योग्य होय. ( उत्तर ) जर प्रेतांवर तुमचें ममत्व आहे तर तीं आपल्या घरांत कां ठेवून घेत नाहीं ? पुरतां तरी कशाला ? ज्या जीवात्म्यावर आमचें प्रेम होतें तो जीवात्मा त्या देहांतून निघून गेला, आतां दुर्गन्धमय माती शिल्लक

आहे तिजवर प्रेम करसलें व तिचें ममत्व कशाकरितां ? तुमची प्रीति त्याजवर आहे तर त्याला गाडणें हें प्रीतिचें लक्षण काय ? कारण अमुक एक गृहस्थ ह्मणाले, मित्रा माझें तुजवर प्रेम आहे मी तुला जमिनींत गाडूं इच्छितो, तुझ्या मुखावर व शरीरावर धूळ, दगड –धोंडे, विटा टाकतों, तुझ्या छातीवर भली मोठी पाषाणशिळा ठेवतो तर त्या मित्राचा चेहरा हें ऐकून प्रसन्न होईल काय ? कधींच नाहीं. ह्मणून प्रेतें पुरणें हें प्रेमाचें लक्षण नव्हे व पेटींत घालून तीं पुराण्यामुळें फार दुर्गंध उत्पन्न होऊन तो भूमींतून वर येतो व संपूर्ण शुद्ध हवेची खराबी करून रोगोत्पत्ति करतो. दुसरी गोष्ट एका प्रेताला कमींतकमी ६ हात लांब व ४ हात रुंद जागा पाहिजे. ह्या हिशोबानें शेकडों, हजारो, लाखो व क्रोडो मनुष्यासाठीं किती मोठ्या जागेचा व्यर्थ व्यय होणार आहे तो वांचेल; ती जागा शेताच्या, बागबगीच्या, वसाहतीच्या वगैरे कोणत्याच लोकोपयोगी कामास येत नाहीं. प्रेतें पुरणें हें सर्वांत वाईट होय. त्यापेक्षां तीं पाण्यांत टाकणें हें कांहींसें बरें पण त्यांतील हाडे वा मल हा पाण्यांत राहीलच व तो सडला ह्मणजे तेहीं दुःखदायक होईल. बरें जंगलामध्यें तीं सोडून दिलीं तर त्यास मांसाहारीं पशुपक्षी खाऊन टाकतील तथापि त्यांच्या हाडांतील मज्जा व मल हा सडून दुर्गंध उत्पन्न झाला ह्मणजे तेवढ्या अंशानें तरी लोकांना तें अपायकारकच होय. या सर्वांपेक्षां त्यांतल्यात्यांत प्रेतें जाळणें हेंच बरें, कारण प्रेताचा प्रत्येक कण अणुवत बनून तो ताबडतोब वायुमध्यें उडून जाईल. ( प्रश्न ) जाळलीं तरी दुर्गन्ध उत्पन्न होतोच ( उत्तर ) जर कसें तरी जाळलें तर थोडासा उत्पन्न होईल परंतु पुरणें वगैरेपेक्षां पुष्कळ कमी प्रमाणांत उत्पन्न होतो, परंतु विधीपूर्वक प्रेताचें भस्म केल्यास थोडासा देखील दुर्गन्ध उत्पन्न होणार नाहीं. वेदामध्यें तो विधी पुढीलप्रमाणें सांगितला आहे. प्रेताच्या तीन हात खोल. साडेतीन हात रुंद, पांच हात लांब, तळी दीड वीत अर्थात चढ उतार वेदी खोदून शरीराचे वजनाबरोबर तूप त्यामध्यें एक शेरी रतीभर कस्तुरी, एक मासाभर केशर घालून कमींतकमी अर्धा मण चंदन वा त्याहून अधिकही असल्यास तें घ्यावें व त्यांजवरोबर अगर, तगर, कापूर आदि व पळस वगैरेचीं लांकडे घेऊन त्याची वेदी वर सांगितल्याप्रमाणें रचावी व त्यावर प्रेत ठेवून त्यावर एक वितीइतकीं लांकडे चोहोंकडे रचून तुपाच्या आहुती द्याव्या. अशा रीतीनें प्रेताचा अग्निसंस्कार करावा.

ह्याप्रमाणें प्रेत दहनविधि केल्यास कांहींच दुर्गंध होत नाहीं. या संस्कारालाच शास्त्रांत अन्त्येष्टि, नरमेध, पुरुषमेध असें ह्मणतात. गरीब असल्यास वीस शेरापेक्षां कमी तूप चीतेमध्यें घालतां आलें नाहीं तर इतर आप्तेष्टांनीं स्व-जातीयाकडून भीक मागून तें मिळवावें अथवा राज्यातर्फे मिळवावें, परंतु या विधीनें दहन करावें आणि कोणत्याही प्रकारें तूप मिळणें नसल्यास तसेंच जाळावें. पुरण्यापेक्षां जाळणें उत्तम होय.

कारण एक विश्वाभर भूमींत अथवा एका-वेदी इतक्या जागेंत लाखो क्रोडो प्रेतें जळूं शकतात भूमीही प्रेतें पुरण्यानें जशी खराब होते तशी होत नाहीं. शिवाय कबरी, वगैरे पाहून भयही उत्पन्न होते अर्थात् भित्र्या लोकांस होणार नाहीं ह्मणून प्रेतें पुरणें हें सर्वथा निषिद्ध होय. ॥ २७ ॥

२८—आणि ह्मटलें, माझा धनी अब्राहम याचा देव परमेश्वर याची स्तुति असो; त्यानें माझ्या धन्याशीं दयेनें व सत्यतेनें वर्तणें सोडिलें नाहीं; मी वाटेंत असतां परमेश्वरानें मला माझ्या धन्याच्या भावाच्या घरीं आणलें.

—उत्पत्ति अ. २४ ओ. २७॥

**समीक्षकः**—काय तो अब्राहामाचाच ईश्वर होता ? ज्याप्रमाणें आजकाल बिगारी किंवा वाटाडे लोक मार्ग दाखवितात त्याप्रमाणें ईश्वर बिगारी वा वाटाड्या होऊन त्याच्या पुढें पुढें जर चालला असेल तर सांप्रत का मार्ग दाखवीत नाहीं ? व मनुष्याशीं गोष्टी–गप्पा करीत कां नाहीं ? जंगली मनुष्याखेरीज असल्या गोष्टी असला ईश्वर व असलें धर्म–पुस्तक कोण मानील ? ॥ २८ ॥

२९—इस्माएलाच्या पुत्रांची नांवें त्यांच्या त्यांच्या वंशाप्रमाणें अशीं आहेत; इस्माएलाच्या ज्येष्ठ पुत्र नबायोथ आणि फेदर व अदबैल व मिबसाम व मिश्मा व दुमा व मस्साहदर व थेमा, यटूर, नाफीश व केदमा.

—उत्पत्ति अ. २५ ओ. १३-१४-१५. ॥

**समीक्षकः**—हा इस्माएल अब्राहामाला त्याच्या स्वपत्नीपासून झाला नव्हता तर त्याची दासी हाजिरा हिजपासून झाला होता. ह्मणजे दासीपुत्र इस्मायल व त्याच्या पुत्रांची हीं नांवें व त्यांच्या वंशावळी ॥ २९ ॥

३०—आतां तूं कळपाकडे जाऊन त्यांतून शेळ्यांची दोन चांगली करडें मजकडे आण, ह्मणजे मी तुझ्या बापासाठीं त्याला आवडतें असें रुचिकर अन्न तयार करीन. मग तूं तें आपल्या बापाला नेऊन दे. ह्मणजे तो खाईल आणि तो आपल्या मरणापूर्वी तुला आशीर्वाद देईल. मग रिबेकेनें आपला वडील पुत्र एसाव व त्याची जी उंच वस्त्रें घरांत तिच्याजवळ होतीं तीं घेऊन आपला धाकटा पुत्र याकोब याच्या अंगांत घातलीं आणि त्याच्या हातांत व त्याच्या मानेच्या गुळगुळीत ठिकाणीं तिनें शेळ्यांच्या करडांचीं कातडीं लावलीं, आणि याकोबानें आपल्या बापाला ह्मटलें, मी तुझा वडील पुत्र एसाव आहे. तुझ्या सांगण्याप्रमाणें मी केलें आहे; कृपा करून उठून बैस व माझी पारध खा, ह्मणजे तुझा आत्मा मला आशीर्वाद देईल.

—उत्पत्ति अ. २७ ओ. ९-१०-१५-१६-१९. ॥

**समीक्षकः**—पहा, अशा लबाडीनें व कपटानें आशीर्वाद मिळवून नंतर सिद्ध व

पैगंबर बनतात ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? असे ख्रिस्त्यांचे पूर्वज झालेले आहेत मग यांच्या मतांतील गडबगुंड्यांना काय कमी आहे ?

३१—आणि याकोब पहांटेस उठून जो धोंडा त्याने आपल्या उशास घेतला होता तो त्यानें घेऊन स्तंभ असा करून ठेविला व त्याच्या माथ्यावर तेल घातलें; आणि त्या ठिकाणाचें नांव बेथेल ठेविलें, पण पहिल्यानें तेथील नगराचें नांव लूज होतें. आणि हा जो धोंडा म्यां स्तंभ असा करून ठेवला आहे तो देवाचें घर होईल.

उत्पत्ति अ. २८ ओ. १८,१९,२२॥

**समीक्षकः**—हें जंगली लोकांचें काम पहा. यांनीं दगड-धोंडे पुजिले व पुजविले, यानांच मुसलमान लोक " बयतुलमुकद्दस " ह्मणतात. तो दगड हेंच ईश्वराचें घर व त्या पत्थरमात्रामध्येंच ईश्वर राहात होता ! वाह ! वाह ! ! काय सांगावें ? ख्रिस्त्यांनो ! मोठे मूर्तिपूजक तर तुह्मींच आहां ॥ ३१ ॥

३२—आणि देवानें राहेलेची आठवण केली आणि देवानें तिचे ऐकून तिची कुस वाहती केली. मग ती गरोदर होऊन पुत्र प्रसवली आणि ह्मणाली, देवानें माझा अपमान दूर केला आहे.

—उत्पत्ति अ. ३० ओ. २२, २३ ॥

**समीक्षकः**—वाहरे ख्रिस्त्यांचा देव ! मोठा डॉक्टर दिसतो ! स्त्रीयांची कुस वाहती करण्यास कोणतें शस्त्र वा औषध त्याजजवळ होतें बरें ? कि ज्या शस्त्रानें राहेलेची कूस वाहती झाली ? या अंधाधुंदीच्या गोष्टी होत ॥ ३२॥

३३—आणि देवानें अरामी लाबान याजवळ रात्रीं स्वप्नांत येऊन त्याला ह्मटलें. त्वां याकोबाशीं बरें बाईट बोलूं नये, ह्मणून संभाळ. आणि आतां तूं जायाला पहातोस, कां कीं, त्वां आपल्या बापाच्या घराची उत्कंठा धरिली आहे. परंतु त्वां माझे देव कां चोरले ?

—उत्पत्ति अ. ३१ ओ. २४, ३० ॥

**समीक्षकः**—येथें आह्मी हा नुसता नमुना दाखवीत आहों कीं, बायबलामध्यें हजारों मनुष्यांच्या स्वप्नांत ईश्वर आला, गोष्टी केल्या, साक्षात् जागृत झाला, खाल्ले, प्याला, आला, गेला परंतु आतां कोण जाणें तो आहे कां नाहीं तें ? कारण आतां कोणाच्या स्वप्नांत येत नाहीं मग जागृतावस्थेचा प्रश्न दूरच राहिली. वरील ३० व्या ओवीवरून सप्रमाण सिद्ध झालें कीं, हे जंगली लोक पाषाणादि मूर्तींना देव मानून पूजीत होते, इतकेंच नव्हे तर, प्रत्यक्ष ख्रिस्त्यांचा आकाशांतील बाप जो ईश्वर तो देखील पत्थरालाच देव समजत होता ! असें नसतें तर त्वां माझे देव कां चोरले हें त्यानें ह्मटलें नसतें. निराकार देवाची चोरी कशी कोण करणार ? ॥ ३३ ॥

३४—याकोबही आपल्या वाटेनें गेला, आणि जातांना देवाचे दूत त्याला भेटले. तेव्हां याकोब त्यांस पाहून ह्मणाला, हें देवाचें सैन्य, ह्मणून त्यानें त्या ठिकाणाचें नांव महनाइम ठेविलें.

उत्पत्ति अ. ३२ ओ. १, २ ॥

समीक्षकः—ख्रिस्त्यांचा ईश्वर मनुष्य आहे हें निश्चितपणें समजण्यास कांहीं हरकत राहिली नाहीं कारण तो सैन्य राखतो, सैन्य असल्यावर शस्त्रें असतील व जेथें तेथें लढाया करीत असेल नाहीं ? तर सैन्य बाळगण्याचें प्रयोजन काय ?

३५—मग याकोब एकटा राहिला आणि पहाट होईपर्यंत कोणी त्याशीं झोंबी केली आणि त्याला जिंकलें नाहीं असें पाहून तो त्याच्या मांडीच्या खोलग्याला शिवला आणि याकोब त्याशीं झोंबी करीत असतां त्याच्या मांडीचा खोलगा उखळला. मग तो ह्मणाला पहाट झाली, तर मला जाऊं दे; पण हा ह्मणाला, मला आशिर्वाद दिल्यावांचून मी तुला जाऊं देणार नाहीं. मग तो याला ह्मणाला, तुझें नांव काय ? तेव्हां यानें ह्मटलें, याकोब. तेव्हां तो बोलला, तुझें नांव यापुढें याकोब ह्मणणार नाहींत, तर इस्त्रायल ह्मणतील; कां कीं, तूं देवाशीं आणि माणसांशीं पराक्रम करून जय पावलास, मग याकोबानें विचारलें, कृपा करून आपलें नांव सांग; तेव्हां तो ह्मणाला, माझें नांव कां पुसतोस ? आणि त्यानें तेथें त्याला आशीर्वाद दिला. आणि देवाला समक्ष पाहिलें असतां माझा प्राण वांचला, असें ह्मणून याकोबानें त्या ठिकाणचें नांव पनुएल ठेवलें. मग पनुएलाच्या पलीकडे जातांना त्याला सूर्य उगवला, आणि तो आपल्या मांडीत लंगडत चालला. याकारितां मांडीच्या खोलग्यांतील जी धोंडशीर ती इस्त्राएल लोक आजपर्यंत खात नाहींत. कां कीं, याकोबाच्या मांडीच्या खोलग्यांतल्या धोंडशिरेला तो शिवला ॥

—उत्पत्ति अ. ३२ ओ. २४, २५, २६, २७, २८, २९, ३०, ३१, ३२ ॥

समीक्षकः—ख्रिस्त्यांचा ईश्वर असा ' अखाडमल्ल ' आहे ह्मणूनच तर सारा राहेले यांना पुत्रवती बनविण्याची त्यानें कृपा केली ! हा कधीं ईश्वर होऊं शकणें शक्य आहे बरें ? आणखी असें पहा कीं, याकोब त्याला आपलें नांव विचारितों तर तें देखील तो सांगत नाहीं ! ही विचित्र लीला नव्हे काय ? ईश्वरानें त्याची शिर चढविली व कुस्तीत अजिंक्य झाला परंतु जर तो डॉक्टर होता तर मांडीचा खोलगा व शिर बरी न करता ? ख्रिस्त्यांच्या ईश्वराचा मित्र व खेळगडी जो याकोब तो लंगडत राहिला तर मग अशा ईश्वराचे अनन्यभक्तही लंगडत असतील ! देवाला याकोबानें समक्ष पाहिलें ह्मणून त्याचा प्राण वांचला असें याकोब ह्मणतो व देवाशीं झोंबीही केली ह्या गोष्टी साकार व शरीरधारी ईश्वराखेरीज कशा होऊं शकतात ? ही ईश्वरी लीला नसून क्षुद्र माणसांच्या अशा पोरचेष्टा होत ॥ ३५ ॥

३६—आणि यहूदाचा वडील पुत्र एर परमेश्वराच्या दृष्टींत दुष्ट होता, ह्मणून परमेश्वरानें त्याला जिवें मारलें. मग यहुदानें ओनानाला सांगितलें, तूं आपल्या भावजयीशीं जा, ह्मणजे तिजशीं लग्न करून आपल्या भावासाठीं संतान उत्पन्न कर तेव्हां ओनान समजला कीं, संतान आपलें होणार नाहीं; मग तो आपल्या भावजयीपाशीं

गेला, तेव्हां असें झालें कीं, त्यानें आपल्या भावाला बीज देऊं नये. ह्मणून भूमीवर तें नासविलें तेव्हां त्यानें जें केलें तें परमेश्वराच्या दिसण्यांत वाईट होतें ह्मणून त्यानें त्यालाहि जिवें मारिलें.

—उत्पत्ति अ. ३८ ओ. ७।८।९।१० ॥

**समीक्षकः**—वाचकहो ! आतां तुह्मींच पाहून घ्या कीं, हीं कामें मनुष्याचीं आहेत कीं ईश्वराचीं ? जर ईश्वराचेप्रमाणें ओनानानें आपल्या भावजयीशीं 'नियोग' केला तर त्याला कां जिवें मारिलें ? त्याला सुबुद्धि ईश्वरानें कां दिली नाहीं ? वेदोक्त नियोग पद्धति प्रारंभीं सर्वत्र अस्तित्वांत होती हेंहि निश्चित झालें. नियोगरीति सर्व देशांत एका काळीं रूढ होती. ॥ ३६ ॥

## जुना करार 'निर्गम'चें पुस्तक.

३७—आणि असें झालें कीं, त्या दिवसामध्यें मुसा प्रौढ झाल्यावर आपल्या भाऊबंदाकडे गेला; तेव्हां त्यानें त्यांचीं कष्टाचीं कामें पाहिलीं आणि मिसरी मनुष्यास आपल्या भाऊबंदातील एका इब्री मनुष्याला मारतांना पाहिलें. आणि त्यानें इकडे तिकडे न्याहाळून कोणी नाहीं, असें पाहून त्यानें त्या मिसऱ्याला जिवें मारिलें, आणि त्याला वाळूंत लपविलें; मग दुसऱ्या दिवशीं तो बाहेर गेला, तेव्हां पाहा, दोन इब्री मनुष्य भांडत होते, आणि तो त्यांतल्या अपराध्याला बोलला, तूं आपल्या शेजाऱ्याला कां मारतोस ! तेव्हां हा बोलला तुला आह्मांवर नायक व न्यायाधीश कोणी नेमिलें ? जसें त्वा मिसऱ्याला जिवें मारिलें तसें तूं मला जिवें मारावयास पाहतोस काय ? तेव्हां मोशे भिऊन ह्मणाला, खचीत ही गोष्ट कळली आहे.

—निर्गम अ. २ ओ. ११, १२, १३, १४, १५ ॥

**समीक्षकः**—आतां बायबलाचा मुख्य सिद्धकर्ता व त्या मताचा आचार्य मोशे याचें चरित्र पहा ! मोशे हा क्रोधादि दुर्गुणांनीं युक्त, मनुष्यहत्या करणारा, राजदंडाचे चोरवत् भय बाळगणारा, केलेलें कृत्य लपावूं पाहणारा अर्थात् खोटें बोलूं पहाणारा, पण तो देखील ईश्वर प्राप्ति करूं शकतो ! तो पैगंबर झाला, त्यानें यहूदी आदि धर्म प्रचलित केला व तो धर्महीं मोशयाप्रमाणेंच झाला. ! ह्मणूनच ख्रिस्त्यांचे जे मूळ पुरुष झालें ते सर्व मोशयापर्यंत विद्यासंपन्नावस्थेंत नव्हे तर अविद्यासपन्न असे जंगली होते ॥ ३७ ॥

३८—मग मोशयानें इस्राएलाच्या सर्व वडिलास बोलावून सांगितलें तुह्मी आपापल्या कुटुंबाप्रमाणें मेंढरूं काढून घ्या आणि वल्हांडण सणासाठीं कापा. आणि जुफा झाडाची जुडी घेऊन पात्रांतल्या रक्तांत बुचकळून पात्रांतलें रक्त दाराच्या कपाळपट्टीवर व दोन बाह्यांवर लावा, आणि सकाळपर्यंत तुह्मांतील कोणी आपल्या घराच्या दाराबाहेर जाऊं नये. कां कीं, मिसऱ्यांस पीडा करावयास परमेश्वर फिरतो आणि कपाळपट्टीवर व दोन्हीं बाह्यांवर रक्त तो पाहील तेव्हां परमेश्वर दारावरून जाईल, आणि नाश करणाऱ्याला पीडा करावयास तुमच्या घरांत जाऊं देणार नाहीं,

—निर्गम अ. १२ ओ. २१, २२, २३ ॥

**समीक्षक**:—असा टोनेटोमने करणारा ईश्वर सर्वज्ञ कधींतरी होऊं शकतो काय बरें ? रक्ताचा टिळा दाराच्या कपाळपट्टीवर पाहिल्यानंतर त्याला इस्राएलाचें कूळ ओळखूं यावें अन्यथा नाहीं ? असलें घाणेरडे काम जंगली लोकांनींच लिहून ठेवलेलें आहे हें स्पष्ट आहे. ईश्वर हा क्षुद्र बुद्धीच्या मनुष्याप्रमाणें कसा असेल ? ॥ ३८ ॥

३९—मग असें झालें कीं मध्यरात्री परमेश्वरानें मिसर देशांतील सर्व ज्येष्ठ पुत्र जिवे मारले; आपल्या राजासनावर बसणारा फारो याच्या ज्येष्ठ पुत्रापासून बंदिशाळेंत जो कैदी होता त्याच्या ज्येष्ठ पुत्रापर्यंत, आणि पशूंचें प्रत्येक प्रथम वत्स जिवें मारिलें. तेव्हां फारो व त्याचे सर्व दास व सर्व मिसरी रात्री उठले, आणि मिसर देशांमध्यें मोठा आक्रांत झाला, कां कीं, ज्यांत कोणी मेला नाहीं असें घर नव्हते.

—निर्गम अ. १२ ओ. २९,३० ॥

**समीक्षक**:—ऐन मध्यरात्रीं अट्टल चोराप्रमाणें ख्रिस्त्यांच्या ईश्वरानें निर्दय बनून मुलांबाळांच बाप व पशुपर्यंत सर्व अपराधी व निरपराधी यांना जिवें मारिलें. मुळींच दयेचा पाझर म्हणून त्याच्या पाषाणवत् अंतःकरणाला फुटला नाहीं ! मिसर देशामध्यें इतका शोकजनक हृदयविदारक आक्रोश सुरू झाला असेल कीं, साधारण मनुष्याचें अंतःकरण तो पाहून करुणरसानें भरून आलें असेल पण आकाशांतील बापाचें काळीज शिलेप्रमाणें बनलेलें होतें ! वाः असें काम ज्याला लवमात्र दयामाया आहे असा जीव करूं शकत नाहीं मग दयेचा सागर, न्यायाधीश प्रभु परमात्मा कसें करील ? परंतु ख्रिस्त्यांचा देवच मुळीं रुधिरप्रिय असल्यामुळें, ‘ मांसाहारिणः कुतो दया ’ या न्यायानें त्याच्या मांसाहारी ईश्वराला दया नसणें हेंहि स्वाभाविक आहे ॥ ३९ ॥

४०—परमेश्वर तुह्मासाठीं लढाई करील; आणि तुह्मी उगेच राहाल. मग परमेश्वर मोश्याला ह्मणाला, तूं मला कां हांक मारतोस ? एस्राएलाच्या संतानास सांग कीं, पुढें चाला. आणि तूं आपली काठी उचलून आपला हात समुद्रावर लांब करून त्याचे दुभाग कर, मग इस्राएलाची संतानें समुद्रामधून कोरड्यावरून जातील.

—निर्गम अ. १४ ओ १४-१५-१६॥

**समीक्षक**:—काय महाराज ! प्रथम तर ईश्वर एस्राएलाच्या कुळामागें मेंरढांप्रमाणें धांवत होता. आतां तो कोठें अन्तर्धान पावला हें सांगतां येईल काय ? जर तोच ह्यात असतां तर समुद्रांत चोंहोंभागीं रेल्वे-लाईन त्यानें निर्माण केली असती ह्मणजे सर्व जगाचें कल्याण होतें. नावा आदि बनविण्याचे श्रम वाचते ! परंतु काय सांगावें, ख्रिस्त्याचा ईश्वर कोण जाणें कोठें गडप झाला तो ! पहा. मोश्याबरोबर त्यानें काय असंभाव्य प्रकार केले. जसा ख्रिस्त्यांचा देव तशी त्याची भक्तमंडळी व त्या मंडळीचें पवित्र शास्त्र होय ! असें शास्त्र व असा ईश्वर आह्मां लोकांपासून दूर राहील तरच आमचें कल्याण आहे. ॥ ४० ॥

४१—त्यांच्या पायां पडूं नको आणि त्यांची सेवा करूं नको; कां कीं मी परमेश्वर तुझा देव आवेशी देव आहे, जे माझा द्वेष करतात त्यांच्या तिसऱ्या व चवथ्या पिढीपर्यंत बापांच्या अन्यायामुळें लेंकरांचें शासन मी करतों. —निर्गम अ २० ओ ५॥

**समीक्षकः**—बापाच्या अपराधांचें प्रायश्चित चवथ्या पिढीपर्यंत त्यांच्या वंशजांना शासन करून देणें हा कोणाच्या घरचा न्याय आहे बरें ? सुजनाच्या पोटीं कुपुत्र व कुपुत्रांना सुपुत्र होत नाहींत काय ? असें आहे तर चवथ्या पिढीपर्यंत बापाच्या पापाबद्दल मुलांबाळांना दंड तो कसा देऊं शकतो ? व पांचव्या पिढीपासून दुष्ट निपजतील तर त्यांना दण्ड तो देऊं शकत नाहीं काय ? अपराधाविना शासन करणें हा घोर अन्याय होय ॥ ४१ ॥

४२—शाब्बाथ दिवस पाळावा ह्मणून त्याची आठवण कर. सहा दिवस उद्योग करून आपलें सर्व काम कर. पण सातवा दिवस तुझा देव परमेश्वर याच्या विसाव्याचा दिवस आहे. यास्तव परमेश्वरानें शाब्बाद दिवसाला आशीर्वाद देऊन तो पवित्र ठरविला. —निर्गम अ. २० ओ. ८, ९, १०, ११ ॥

**समीक्षकः**—रविवार हाच तेवढा पवित्र व बाकीचे सहा दिवस अपवित्र समजावयाचे काय ? परमेश्वरानें सहा दिवसपर्यंत मोठे परिश्रम केले होते काय ? कीं त्याला सातवे दिवशीं विश्रांति घेणेंच भाग पडलें ? रविवाराला आशीर्वाद दिला तर सोमवार वगैरेनां काय दिला ? अर्थात् शाप दिला. असें काम विद्वानाचें असत नाहीं तर मग ईश्वर कसें करील ? रविवारामध्यें असे काय गुण आहेत व सोमवार वगैरेनीं काय दोष केले ह्मणून एक पवित्र व बाकीचे तसेंच अपवित्र ठेवले ?

४३—आपल्या शेजाऱ्याविषयीं खोटी साक्ष देऊं नको. आपल्या शेजाऱ्याच्या घरावर लोभ ठेवूं नको; आपल्या शेजाऱ्याची बायको, अथवा दास अथवा त्याची दासी अथवा त्याचा बैल, अथवा त्याचे गाढव अथवा आपल्या शेजाऱ्यांचें जें कांहीं असेल त्यावर लोभ ठेवूं नको. —निर्गम अ. २० ओ. १६, १७ ॥

**समीक्षकः**—वाह ! ह्मणूनच तर ख्रिस्ती लोक परदेशीयांच्या मालावर असा झडप घालतात कीं, जणूं तृषार्त पाण्यावर व भुकेला अन्नावर ! हा केवळ पक्षपात आणि मतलबसिंधु प्रकार होय. ख्रिस्त्यांचा ईश्वरही अवश्यमेव असाच असेल. जर कोणी ह्मणेल कीं, आह्मी सर्व मनुष्यांना शेजारी मानतो तर मनुष्याशिवाय अन्य कोण स्त्री व दासी आहेत कीं ज्या त्यांच्या दृष्टीनें अपराधी होत ? या गोष्टी स्वार्थी मनुष्यांच्या आहेत ईश्वराच्या नव्हेत.

४४—तर आतां बाळकांतल्या सर्व पुरुषांस मारा, आणि ज्या स्त्रियांस पुरुषाशीं संयोग झाला त्या सर्वांसही मारा. आणि स्त्रियांमध्यें सर्व मुली ज्यांस पुरुषाशीं संयोग झाला नाहीं त्यांस आपणासाठीं वांचवा. —गणना । अ ३१ ओ. १७, १८ ॥

**समीक्षक:**—वाहवा ! पैगंबर मोशे व तुमचा ईश्वर धन्य असो ! जो स्त्रिया, बालकें, वृद्ध व पशु आदि यांची हत्या करण्याचें सोडीत नाहीं त्याला काय म्हणावें ? आणखी एक गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते ती ही कीं, मोशे विषयासक्त होता, कारण जर तसा तो नसता तर अक्षतयोनि अर्थात् पुरुषांशीं ज्यांचा संयोग झाला नाहीं अशा सर्व मुली आपणासाठीं वांचवा असें कां सांगता ? किंवा ज्यांचा पुरुषाशीं संयोग झाला त्या सर्व स्त्रियांस मारा अशी निर्दयपणाची आज्ञा कां देतो ? वास्तव मोशे हा निर्दय व कामासक्त विषयी होता. ॥ ४४ ॥

४५—जो मनुष्याला मरण येई असें हाणील त्याला जिवें मारावेंच. जर कोणी टपून मारलें असें नाहीं पण देवानें त्याच्या हातीं लावू केलें, तर जेथें त्यानें पळावें असें ठिकाण मी तुजसाठीं नेमून देईन. —निर्गम अ. २१ ओ. १२।१३ ॥

**समीक्षक:**—हा जर ईश्वरी न्याय असेल तर ख्रिस्त्यांच्या देवानें मोशानें जेव्हां एक मनुष्याला मारून पुरून टाकलें होतें हा दंड मोशाला त्यानें कां दिला नाहीं ? जर म्हणाल देवानें त्या मनुष्याला मारण्यासाठींच मोशाला तत्पर केलें होतें तर तो पक्षपाती बनला, कारण त्या मोशाचा राजाकडून न्याय कां होऊं दिला नाहीं ? ॥ ४५ ॥

४६—आणि त्यानें इस्राएलाच्या संतानांतील तरुणास पाठविलें, आणि त्यांनीं परमेश्वराला होम केले व गोऱ्ह्यांचीं शान्त्यर्पणें केलीं. तेव्हां मोशानें अर्धे रक्त घेऊन वाट्यांत ठेवलें लोकांवर शिंपडून म्हटलें कीं, पाहा, या अवघ्या गोष्टींविषयीं जो करार परमेश्वरानें तुम्हांशीं केला त्याचें हें रक्त आहे. तेव्हां परमेश्वरानें मोशाला सांगितलें, तूं डोंगरावर मजपाशीं चढ व तेथें रहा, मग त्यांस शिकविण्यासाठीं मी तुला त्या दगडांच्या पाट्या, नियम व आज्ञा ज्या लिहिल्या त्या देईन.

—निर्गम अ. २४ ओ. ५, ६, ७, ८, ९, १२, ॥

**समीक्षक:**—आतां या जंगली लोकांच्या गोष्टी आहेत किंवा नाहींत त्या पहा. परमेश्वर गोऱ्ह्यांचें बलिदान घेतो, वेदीवर त्यांचें रक्त शिंपडतो तेव्हां ही किती अमानुषता, असभ्यता होय ? जेथें ख्रिस्त्यांचा ईश्वरच गोऱ्ह्यांचीं शान्त्यर्पणें घेतो तेथें त्याचे भक्त गायींचें बलिदान करून स्वतःचें उदरभरण कां करून घेणार नाहींत ? व जगताचें वाटोळें कां करणार नाहींत ? असल्या किळसवाण्या गोष्टी बायबलांत भरलेल्या आहेत. असले कुसंस्काराधीन लोक स्वतःच्या बायबलांतून पाहून वेदांनाही कलंक लावूं पाहतात ! परंतु वेदामध्यें असल्या गोष्टींचें नांव नाहीं. दुसरी गोष्ट दिसून येते ती ही कीं, ख्रिस्त्यांचा ईश्वर पहाडावर राहात होता. त्याला शाई, लेखणी, कागद बनविता येत नव्हते म्हणून दगडी पाट्यांवर तो मजकूर लिहून देत होता. आणि त्या जंगली लोकांपुढें स्वतः ईश्वर म्हणून बसत होता. ॥ ४६ ॥

४७—तेव्हां त्यानें ह्मटलें; तुझ्यानें माझें तोंड पाहवत नाहीं, कां तर कोणी मनुष्य मला पाहून जगणार नाहीं, आणि परमेश्वर बोलला, पाहा, मजपाशीं ठिकाण आहे आणि तूं खडकावर उभा राहा. मग असें होईल कीं, माझें वैभव जवळून चालतें तेव्हां मी तुला खडकाच्या खोलग्यांत ठेवीन, आणि मी जवळून जातो तेव्हां हातानें तुजवर झांकण करीन, मग मी हात काढीन, असें माझें मागलें अंग तुला दिसेल, परंतु माझें तोंड दिसणार नाहीं.

—निर्गम अ. ३३ ओ. २०, २१, २२, २३ ॥

**समीक्षक:**—खिस्त्यांचा देव केवळ मनुष्यवत् शरीरधारी व मोश्याशीं कपटजाल रचून आपणच ईश्वर होऊन बसला ! मागलें अंग पाहील त्याला रूप दिसू नये याकरितां स्वहातानें त्याच्यावर झांकण घातलें. परंतु रूप दिसलें नसेल तरी देवाचे हात मोश्याला दिसले असतील ? ॥ ४१ ॥

## जुना करार. लेवीय

४८—आणि परमेश्वरानें मोश्याला हाक मारुन सभामंडपांतून त्याला असें सांगितलें कीं, इस्राएलाच्या संतानाशीं बोलून त्यांस सांग कीं, तुमच्यांतला मनुष्य परमेश्वराला पशूंतल्यांचें अर्पण करील तर तुह्मीं आपलें गुरांचे किंवा शेरडांमेंढरांचे करा.

—लेवीय अध्याय १ ओ १, २॥

**समीक्षक**—विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं, खिस्त्याचा परमेश्वर गाय, बैल आदींचें बलिदान करण्याचा उपदेश करीत आहे तर तो गायबैल यांच्या रक्तमांसांचा तहानेला व भुकेला आहे किंवा नाहीं ? जो मांसाहारी साधारण मनुष्यासारखा आहे त्याची गणना ईश्वरांत कशी करावी ?

४९—आणि त्यानें गोऱ्हा परमेश्वरापुढें कापावा; मग अहेरानाचे पुत्र याजक यांनीं त्याचे रक्त आणावें; आणि सभामंडपाच्या दारीं जी वेदी आहे तिवर चहुंकडे रक्त शिंपडावें आणि त्यानें होमपशूचें कातडें काढावें मग तो कापून त्याचे तुकडे करावे आणि अहेरान याजक याच्या पुत्रांनीं वेदीवर अग्नि ठेवून अग्नीला लांकडें लावावी. मग वेदीवरील अग्नीच्या लांकडांवर अहेरानाचे पुत्र याजक यांनीं तुकडे व शिर व मांदे ठेवावें आणि त्यानें त्याची आंतडी व त्याचे पाय पाण्यानें धुवावें मग याजकांनें वेदीवर अवघीं जाळावीं; हा होम परमेश्वराला सुगंध असें होत्र आहे.

—लेवीय अ, १ ओ, ५।६।७।८।९॥

**समीक्षक:**—थोडा विचार करा ! परमेश्वरासमोर त्याच्या भक्तानें गोऱ्हा मारावा व त्यानेंही त्याला मारूं द्यावें व त्याचें रक्त वेदीच्या चोहोंबाजूस शिंपडावें, अग्नीमध्यें त्याचा होम करावा. ईश्वरानें त्याचा सुगंध घ्यावा हे प्रकार खाटिकांच्या गृहस्थितीपेक्षां

काही कमी आहेत ? यावरून बायबल हे न ईश्वरकृत ठरतें, पण उलट ख्रिस्त्यांचा ईश्वर जंगली मनुष्याच्या लीलांना मागें सारतो. ॥ ४९ ॥

५०—आणि परमेश्वरानें मोशयाला असें सांगितलें कीं, जर अभिषिक्त याजक लोकांच्या दोषाप्रमाणें पाप करितो तर त्यानें आपण केलेल्या पापासाठीं बिर्दोष खोंड असें पापाकरितां अर्पण परमेश्वराला करावें. आणि त्यानें खोंड सभामंडपाच्या दाराजवळ परमेश्वरासमोर आणावा व आपला हात खोंडाच्या डोक्यावर ठेवावा, मग परमेश्वरासमोर खोंड कापावा.

—लेवीय. अ. ४ ओ. १।३।४.

**समीक्षकः**—आतां पहा कीं, पापापासून मुक्त होण्याकरितां प्रायश्चित्त काय तर आणखी एकदां स्वतः पाप करावें, गाय आदि निर्दोष व उत्तम पशू यांची हत्या करावी आणि खुद्द परमेश्वरानेंच ती करण्यास भक्तांस लावावें. ख्रिस्ती लोकांची धन्य असो ! अशा गोष्टी करणारा व करविणारा जो आहे त्याला ईश्वर मानतात त्यापासून मुक्तीची आशा बाळगतात ! ! ! ॥ ५० ॥

५१—जर अधिकारी पाप करतो तर त्यानें जे पाप केलें तें त्याचें पाप त्याला कळलें तेव्हां त्यानें आपलें अर्पण शेळयातलें निर्दोष नर आणावें. आणि आपला हात करडाच्या डोक्यावर ठेवावा, मग परमेश्वरापुढें ज्या ठिकाणीं होमपशु कापीत असतात तेथें तो कापावा, हें पापाकरितां अर्पण आहे.

—लेवीय, अ. ४ ओ. २२।२३।२४

**समीक्षकः**—वाहवा ! ! वाहवा ! ! ! जर असें आहे तर त्यांचें अधिकारी अर्थात् न्यायाधीश, सेनापति आदि लोक पाप करण्यास कां भीतील ? स्वतः मनमुराद पापें करावींत आणि त्यांच्या प्रायश्चित्तार्थ गायी, वासेर, करडें वगैरेचे प्राण घ्यावेत ! आणि ह्मणूनच ख्रिस्ती लोक पशु वा पक्षी यांचे प्राण घेण्यास मुळींच कचरत नाहींत.-ख्रिस्ती लोकांनों ! आतां तरी ह्या जंगली मताचा त्याग करून सुसभ्य धर्ममय वेदमताचा स्वीकार करा ह्मणजे तुमचें कल्याण होईल. ॥ ५१ ॥

५२—पण जर त्याला बकरें मिळेना तर त्यानें केलेल्या पापाविषयीं, त्याच्या दोषामुळें होले किंवा पारव्याचीं दोन पिलें एक पापाकरितां अर्पणासाठीं व एक होमासाठीं अशीं परमेश्वराजवळ आणावीं. त्यानें तीं याजकाकडे आणावी, मग त्यानें जें पापाकरितां अर्पणासाठीं आहे तें प्रथम वाहावें, ह्मणजे त्याची मान मुरगाळून त्याचें शिर तोडावें पण तें चिरूं नये. मग विधीप्रमाणें त्यानें दुसऱ्याचा होम करावा; असें त्याविषयीं त्यानें केलेल्या पापासाठीं याजकानें प्रायश्चित्त केल्यावर त्याची क्षमा होईल, आणि ज्यानें पाप केलें त्याला जर दोन होले किंवा पारव्याची दोन पिलें मिळत नाहींत तर त्यानें आपलें अर्पण एका मापाचा दहावा वांटा समीप पापाकरितां अर्पणासाठीं

आणावें; त्यानें त्यावर तेल घालूं नये. धुपही ठेवूं नये, कां कीं, तें पापाकरितां अर्पण आहे. त्यानें तें याजकाकडे आणावें मग याजकानें आपल्या मुठीनें मूठभर घेऊन सूचनेसाठीं त्यांतलें कांहीं वेदीवर परमेश्वराला जीं होत्रें त्याप्रमाणें जाळावें, तें पापाकरितां अर्पण आहे. असें यांतल्या एखाद्याविषयीं त्यानें केलेल्या पापाकरितां याजकानें त्यासाठीं प्रायश्चित करावें ह्मणजे त्याची क्षमा होईल, *आणि उरलेलें पीठ अन्नार्पणाप्रमाणें याजकाचें असावें. —लेवीय अ० ५ व्ने ७।८।९।११।१२।१३.

**समीक्षकः**—ऐका, दरिद्री अगर श्रीमंत असो कोणताही ख्रिस्ती मनुष्य पाप करण्यास भीत नसेल कारण कीं, त्यांच्या ईश्वरानें पापाचें प्रायश्चित करून घेणें सहज साध्य करून ठेवलें आहे. ख्रिस्त्यांच्या बायबलांत एक गोष्ट मोठी अद्भुत आहे कीं परिश्रमाशिवाय पापांतून मुक्तता होते. कारण प्रथम पाप करावें. नंतर त्याच्या क्षालनार्थ दुसऱ्या जिवांचा वध करावा आणि त्याचे मांस मग मोठ्या गमतीनें मिटक्या मारून खावें आणि अशा रीतीनें पापांतून मुक्त व्हावें. पारव्याच्या पिलाची मान मुरगळतांना तें किती तडफडत असेल तरी देखील ख्रिस्त्यांना दया येत नसावी ना ? त्यांना दया तरी कां व कशी यावी ? त्यांच्या आकाशांतील बापाचा त्यांना उपदेशच तसा आहे. जर सर्व पापांचे प्रायश्चित अशा प्रकारचें आहे तर येशूवर विश्वास ठेवल्यानें पाप नष्ट होतें असलें विचित्र अवडंबर ख्रिस्ती लोक कां माजवितात ? ॥ ५२ ॥

५३—आणि जो याजक कोणाचा होम करतो त्यानें अर्पिलेल्या होमपशूचें कातडें याजकाचें आहे, त्याचेंच असावें आणि प्रत्येक अन्नार्पण जें भट्टींत भाजलेलें व कढईवर व तव्यावर सिद्ध केलेलें प्रत्येक हें अर्पणाऱ्या याजकाचें आहे यांचे असावें. —लेवीय अ. ७ आ ८।९

---

*अशा ईश्वराची धन्य आहे! ज्यानें वासरूं, कोकरूं, मेंढरूं, होला, पारवा आणि सपीट हीं देखील भक्तांपासून घेण्याचा नियम केला. अद्भुत गोष्ट ह्मणजे हीं कीं, " पारव्यांच्या पिलांच्या, माना मुरगळावयास लावीत होता ह्मणजे गर्दन तोडण्याचे परिश्रमसुद्धा भक्तांना पडूं नये इतका भक्तवत्सल ख्रिस्त्यांचा देव असलेला पाहून वाटतें कीं तो परमेश्वर नसून जंगली लोकांतला एखादा चतुर पुरुष होता, तो पर्वतावर बसून स्वतःलाच ईश्वर भासवीत असावा परंतु जे अज्ञानी असे जंगली लोक होते त्यांनींहि त्याला ईश्वर मानलें ! त्यानें युक्ति योजून बसल्या ठिकाणींच पर्वतावर खाण्याची सोय करून ठेवण्यासाठीं पक्षी, अन्नादि मागवीत होतां आणि मौज करित होता त्याचे दूत त्याचे सर्व काम करीत होते. सज्जन लोकांनींच विचार करावा कीं, बायबलांतील वासरूं, करडूं, मेंढरूं, पारवा व " उत्तम सपीट गट्ट करणारा ईश्वर कोठें व सर्वव्यापक, सर्वज्ञ अजन्मा, निराकार, सर्वशक्तिमान् व न्यायकारी इत्यादि उत्तम उपयुक्त गुणयुक्त वेदोक्त ईश्वर कोठें ?

समीक्षकः—आमची समजूत होती कीं, येथेंच देवाचे भोपे व मंदिरांचे पुजारी यांच्याच उदरंभरणार्थ असल्या विचित्र भटीलीला आहेत परंतु ख्रिस्त्यांचा ईश्वर व त्याचे पुजारी यांच्या पोपलीला येथल्यापेक्षां सहस्रपट विचित्र आहेत ! कारण कातड्याचा पैसा व भोजनाचे पदार्थ खावयास मिळत तेव्हां ख्रिस्ती भटाची मोठी चंगळ होत असेल, आणि आतांही होत असेल ! एखादा मनुष्य एका मुलास मारून दुसऱ्या मुलास त्याचें मांस खाण्यास देईल असें कधीं होईल काय मग परमेश्वराचे सर्व माणसें, पशु, पक्षी हे सर्व जीव पुत्रवत् असतांना तो असें कसें करील ? ईश्वर असें काम कधींच करीत नाहीं. आणि ह्मणूनच हे बायबल ईश्वरकृत आहे व त्यांतील ईश्वर किंवा त्याचा उपदेश हे मानणारे जन धर्मज्ञ केव्हांहि होऊं शकत नाहींत असल्याच गोष्टी लेवीय आदि पुस्तकांत भरलेल्या आहेत त्या कोठवर वर्णन कराव्यात ? ॥५३॥

## 'गणना' चें पुस्तक,

५४—आणि परमेश्वराचा दूत वाटेंत उभा राहिलेला व त्याच्या हातीं त्याची तरवार उपसलेली असें गाढवीनें पाहिलें आणि गाढव वाटेंतून वळून शेतांत चालली ह्मणून बलामानें गाढव वाटेंत फिरावयास तिला मारलें. मग परमेश्वरानें गाढवीचें तोंड मोकळें केलें आणि ती बलामाला ह्मणाली, म्यां तुझें काय केलें ह्मणून त्वां मला आतां तीन वेळां मारलें ?

—गणना. अ. २२ ओ. २३।२८

समीक्षक;—पूर्वीं गाढवालासुद्धां परमेश्वराच्या दूतांचें दर्शन होत असें. पण आतां मोठमोठे बिशप, पाद्री वगैरेंनां व श्रेष्ठ कनिष्ठ मनुष्यानांही परमेश्वर किंवा त्याचे दूत यांचें दर्शन होत नाहीं ! कां ? आतां परमेश्वर किंवा त्याचे दूत हे अस्तित्वांतच नाहींत वाटते ? जर असतील तर कोणत्या गाढ झोपेंत तें पडले आहेत ? कां रोगग्रस्त आहेत ? कां दुसऱ्या कोणत्या भूगोलावर ते गेले आहेत ? वा कोणत्या अन्य धंद्यामध्यें गुंतले आहेत ? कां आतां ख्रिस्ती लोकांवर ते रुसले आहेत ? कां मेले आहेत ? झालें तरी काय ! कळत नाहीं कोठें आहेत ते अनुमान तर असें आहे कीं, जे सांप्रत नाहींत, जे दिसत नाहींत, तें पूर्वींही नव्हते व दिसत नव्हते पण ह्या सर्व केवळ भाकडकथा रचलेल्या आहेत. ॥ ५४ ॥

## शमुएलचें दुसरें पुस्तक.

५५—आणि त्या रात्रीं असें झालें कीं, परमेश्वराचा शब्द नाथाकडे असा आला कीं, जाऊन माझा सेवक दावीद याला सांग कीं परमेश्वर असें ह्मणतो तूं मला राहण्यासाठीं घर बांधशील काय ? म्यां इस्राएलाचें वंश मिसर देशांतून आणलें त्या दिवसापासून आजपर्यंत मी घरांत राहिलों नाहीं, डेऱ्यांत व मंडपांत वर्तत आलों आहे.

—श. पु. २ रे अ. ७ ओ. ४।५६।

**समीक्षक**—आतांतर ख्रिस्त्यांचा ईश्वर मनुष्याप्रमाणें देहधारी आहे हें समजण्यास कसलीच शंका राहिली नाहीं. तो ह्मणतो कीं, मी फार श्रम केले; डेरे मंडप यामध्यें राहिलों. दावीदाला सांगा कीं, मला राहण्यासाठीं घर बांधून दे ह्मणजे मी त्यांत आनंदानें राहीन! असलें पुस्तक व असला ईश्वर मानण्यास ख्रिस्त्यांना लज्जा वाटत नाहीं काय? वाटत असेल, पण करतील काय बिचारे, फसले आहेत, आतां यांतून सुटका करून घेण्यास त्यांना अत्यंत पुरुषार्थ करणेंच उचित होय॥ ५५ ॥

## " राजे "

५६—आणि बाबेलाचा राजा नबुखद्नेस्सर याच्या राज्याच्या एकुणिसाव्या वर्षी पांचव्या महिन्याच्या शुद्ध सप्तमीस बाबेलाच्या राजाचा सेवक हुजऱ्यांचा सरदार नबूजरखान यरूशलेमास आला तेव्हां त्यानें परमेश्वराचें मंदिर व राजाचें घर जाळलें, आणि यरूशलेमांतलीं सर्व घरें व महाजनांचीं घरें सर्व अग्नीनें जाळून टाकलीं. आणि हुजऱ्यांच्या सरदारासंगतीं खास्द्यांचें सर्व सैन्य यानें यरूशलेमाचे कोट चहूंकडून मोडले ॥

—राजे २ अ. २५ ओ. ८।९।१० ॥

**समीक्षक**—काय करावें? ख्रिस्त्यांच्या ईश्वरानें सौख्यासाठीं ह्मणून दावीदाकडून स्वतःस आरामशीर रहाण्यास घर बांधून घेतलें होतें व त्यामध्यें मोठ्या आनंदानें तो वास्तव्य करीत असेल परंतु नबुखद्नेस्सर कसला दुष्ट, त्यानें त्या परमेश्वराच्या मंदिराचा चक्काचूर कां हो केला? यावेळीं बिचारा ख्रिस्त्यांचा परमेश्वर व त्याची दूतसेनाहि अगदीं हतबल बनली! यापूर्वी ख्रिस्त्यांच्या परमेश्वरानें पुष्कळ लढाया मारल्या होत्या व विजय प्राप्त केले होते; परंतु या खेपेस काय झालें कोण जाणें, स्वतःच्या मंदिराचा चक्काचूर होत असतांहि तो गरीब बिचारा गप्प बसला आणि त्याचे दूतहि कोठें दडून बसले होते त्यांचाहि पत्ता नव्हता! अशा कठीण समयीं ख्रिस्त्यांच्या ईश्वराच्या कोणी कामीं पडला नाहीं किंवा प्रत्यक्ष ईश्वराचा पराक्रमहि त्यांच्या उपयोगास आला नाहीं! या वेळेस ईश्वराचा पराक्रम खरोखर निरुपयोगी बनला असेल तर यापूर्वी त्याच्या पराक्रमाचीं जीं बहारीचीं वर्णनें बायबलांत वर्णिलीं आहेत तीं सर्व पोकळच ह्मणावयाचीं! मिसरस्थ रहिवाश्यांचीं मुलेंबाळें ठार करण्यापुरताच त्याचा पराक्रम होता व आतां शेराला सव्वा शेर असे शूरवीर भेटतांच त्याचा सर्व पराक्रम लयास गेला असें समजावयाचें काय? या अपमानजनक कृत्यानें ख्रिस्त्याच्या परमेश्वरानें सर्वत्र आपली निंदा व अप्रतिष्टा करून घेतली आहे! असल्या गप्पा या बायबलांत सर्वत्र भरपूर भरल्या आहेत ॥ ५६ ॥

---

# जुना करार, दुसरा भाग—जबूर.

## कालवृत्तांत १.

५७—मग परमेश्वरानें इस्राएलावर मरी लावली तेव्हां इस्राएलांतली सत्तर हजार माणसें पडलीं. —कालवृत्तांत १ अ. २१ ओ. १४.

**समीक्षकः**—आतां पहा ! एस्राएलाच्या ख्रिस्त्यांच्या ईश्वराची लीला. एका वेळेस ख्रिस्त्यांच्या ईश्वराचें इस्राएल कुल मोठें आवडतें होतें, त्यानें अहोरात्र त्या कुलाची काळजी घेतली, त्याचें पालन केलें आणि आतां तोच ईश्वर क्रोधवश बनून इस्राएलावर मरीचा आजार पाठवतो व तद्वारें सत्तर हजार माणसांचा फन्ना पाडतो ! एक कवी ह्मणतो तें अगदीं सत्य आहे कीः—

**क्षणे रुष्टः क्षणे तुष्टो रुष्टस्तुष्टः क्षणेक्षणे**
**अव्यवस्थितचित्तस्य प्रसादोऽपि भयङ्करः ॥ ९ ॥**

ज्याप्रमाणें एखादा मनुष्य क्षणांत प्रसन्न, क्षणांत अप्रसन्न होतो ह्मणजे जो क्षणोक्षणीं प्रसन्नाप्रसन्न बनतो त्याची प्रसन्नता देखील भयावह होय ! त्याप्रमाणें ख्रिस्त्यांच्या ईश्वराची लीला आहे ॥ ५७ ॥

## ईयोबाचें पुस्तक.

५८—आणखी एका दिवशीं असें झालें कीं, देवाचे पुत्र परमेश्वरासमोर उभे राहावयास आले, आणि त्यांमध्यें सैतानही परमेश्वरासमोर उभा राहावयास आला. आणि परमेश्वरानें सैतानाला ह्मटलें, तूं कोठून आला आहेस ? तेव्हां सैतानानें परमेश्वराला असें उत्तर दिलें, पृथ्वीवर इकडे तिकडे फिरून व तीवर खालीं वर हिंडून मी आलों आणि परमेश्वरानें सैतानाला ह्मटलें, माझा सेवक ईयोब याजकडे तूं आपलें मन लावून समजला आहेस काय ? कीं पृथ्वीवर त्यासारखा कोणी नाहीं तो पूर्ण व सरळ, देवाला भिणारा व पापापासून दूर राहणारा मनुष्य आहे; आणि निष्कारण त्याचा नाश करावा ह्मणून त्वां जरी मला त्याजवर उत्तेजित केलें तरी अजूनपर्यंत तो आपलें पूर्णपण अखंड धरितो. तेव्हां सैतानानें परमेश्वराला असें उत्तर दिलें, त्वचेबद्दल त्वचा होय, जें कांहीं मनुष्याचें असेल तें तो आपल्या जिवाबद्दल देईल, परंतु आपला हात पुढें करून त्याच्या हाडांला व त्याच्या मांसाला शीव ह्मणजे तो निश्चयें तुझ्या तोंडावर तुझा त्याग करील. आणि परमेश्वरानें सैतानाला ह्मटलें, पाहा, तो तुझ्या हातीं आहे, केवळ त्याचा जीव वाचूं दे. मग सैतानानें परमेश्वरासमोरून जाऊन ईयोबाला त्याच्या तळपायापासून त्याच्या टाळूपर्यंत वाईट गळवांनीं पीडिलें; त्यानंतर त्यानें आपलें अंग खाजवायास ह्मणून खापरी घेतली व तो राखेवर बसला. —ईयोब अ. २ ओ. १ ते ८

**समीक्षकः**—आतां ख्रिस्त्यांच्या ईश्वराचें सामर्थ्य पहा. प्रत्यक्ष ईश्वरासमोर सैतान ईश्वरभक्ताला दुःख देतो तरी भक्ताचा कैवारी जो ख्रिस्त्यांचा परमेश्वर तो सैतानाचें कांहीं पारिपत्य करीत नाहीं. किंवा भक्ताला वांचवूं शकत नाहीं अथवा देवाचे दूत हे सैतानाचा सामना करूं शकत नाहींत. एका सैतानानें सर्वांना भयभीत करून ठेवलें आहे ! ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञहि नाहीं जर तसा तो असता तर सैतानाकडून ईयोबाची परीक्षा कां घेतां ? ॥ ५८ ॥

## उपदेशकाचें पुस्तक.

५९—म्यां आपल्या मनांत बोलत झटलें, पाहा मी फार मोठा झालों आहे आणि जे सर्व मजपूर्वी यरूशलेमांत होते त्यांच्यापेक्षां मला अधिक ज्ञान प्राप्त झालें आहे; होय, माझ्या मनानें बहुत ज्ञान व विद्या अनुभवली होती आणि ज्ञान समजायला व उन्मत्तता व मूर्खपणा जाणायाला म्यां आपलें मन दिलें, मग हीही रिकामी खटपट आहे, असें मी समजलों. कांकीं बहुत ज्ञानांत बहुत खेद असतो, आणि जो विद्या वाढवितो तो शोक वाढवितो ॥ ५९ ॥

—उपदेशक अ. १ ओ. १६।१७।१८

**समीक्षकः**—बुद्धि व ज्ञान हे पर्यायवची शब्द असून ते भिन्न मानले आहेत आणि बुद्धि वृद्धि पाहून शोक व दुःख मानणें हें अविद्यायुक्त अज्ञानी जनाचें काम आहे. विद्वान् असें कसें लिहील ? याकारितां हें बायबल पुस्तक ईश्वरीय तर नाहींच परंतु एखाद्या विद्वानाचें देखील होऊं शकत नाहीं ॥ ५९ ॥

येथपर्यंत तौरेत जबूर हे जे जुन्याकराराचे भाग त्यांतून थोडेसें लिहिलें. यानंतर मत्तय वगैरे जे नव्या कराराचे भाग आहेत त्याविषयीं थोडेसें विवेचन करूं. कारण 'क्रिस्त्यांचा नवा करार' हा ग्रंथ त्यांनीं प्रमाणभूत मानिलेला आहे. व त्याचें नांव 'पवित्रशास्त्र' ह्मणून ठेवलें आहे. त्यांतील वर्णनावरूनच त्याची किंमत समजेल.

---

# नवा करार अथवा पवित्रशास्त्र

## मत्तयकृत

६०—येशू क्रिस्ताचा जन्म याप्रकारें झाला. त्याची आई मरीया इचें योसेफास वाग्दान झाल्यावर त्यांचा सहवास झाल्यापूर्वी ती पवित्र आत्म्याकडून गरोदर झालेली अशी दिसण्यांत आली. तो त्या गोष्टीच्या विचारांत आहे तों, पहा, प्रभूच्या दूतानें त्याला स्वप्नांत दर्शन देऊन झटलें, योसेफा, दाविदाच्या पुत्रा, तूं आपली स्त्री मरीया इचा अंगिकार करायाला भिऊं नको, तिच्याठायीं जो गर्भ आहे तो पवित्र आत्म्याकडून आहे.

—मत्तय अ. १ ओ. १८।२० ॥

**समीक्षकः**—कोणीहि विद्वान् प्रत्यक्षादि प्रमाण व जी गोष्ट सृष्टिक्रमविरुद्ध आहे ती कधींच मानणार नाहीं. या गोष्टीवर मूर्ख व जंगली मनुष्यांनीच विश्वास ठेवावा. तें काम सभ्य विद्वानाचें नव्हे. ईश्वरी नियमांना भंग करण्यास कोण समर्थ आहे बरें ? जो सर्वज्ञ व निर्भ्रम आहे अशा परमेश्वराच्या नियमांचा भंग करील तर कोणीहि त्याच्या आज्ञा मानणार नाहीं. मरीयेला जसा गर्भ राहिल्या तसा सर्वदेन ज्या ज्या कुमारिका गरोदर राहतील तेव्हां सर्व कोणी असेंच म्हणूं शकतील कीं, ती कुमारिका ईश्वरापासूनच गरोदर आहे आणि कोणीं तरी सांगूं शकतील कीं परमेश्वराच्या दूतानें प्रत्यक्ष मला स्वप्नांत येऊन सांगितलेलें आहे कीं, तो कुमारिकेचा गर्भ परमेश्वराचा आहे तर ती गोष्ट शक्य नाहीं. ज्याप्रमाणें मेरीचा गर्भ [illegible] असून कांहीं तरी लटपटपंची लढविली आहे. त्याप्रमाणें सूर्यापासून कुंती गर्भवती राहणें वगैरे जे पुराणांत आरूढ रचलें आहे तेंहि असंभवनीय आहे. असल्या गोष्टी फक्त 'बैल गाभणा, तर सातवा महिना' म्हणून उत्तर देणारे असे लोकच मानतील व फसतील. असें झालें असेल कीं, अन्य परक्या पुरुष समागमानें मरीया गरोदर झाली असेल, त्यानेंच किंवा दुसऱ्या कोणीं गप्प उठविली असेल कीं, मरीया ईश्वरापासून गरोदर झाली आहे ॥ ६० ॥

६१—तेव्हां सैतानाकडून येशूची परीक्षा व्हावी म्हणून आत्म्यानें त्याला रानांत नेलें. आणि तो चाळीस दिवस व एक रात्र उपाशी राहिल्यावर मग त्याला भूक लागली. परीक्षक त्यापाशीं येऊन म्हणाला, तूं देवाचा पुत्र असलास तर धोंड्यांच्या भाकरी व्हाव्या अशी आज्ञा कर.

मत्तय प. ४, आ. १।२।३

**समीक्षकः**—यावरूनच स्पष्ट सिद्ध होत आहे कीं, ख्रिस्त्यांचा ईश्वर सर्वज्ञ नाहीं कारण तो सर्वज्ञ असता तर त्याची परीक्षा तो सैतानाकडून का घेतो ? स्वतः त्यानेंच ती घेतली असती किंवा अगोदर ख्रिस्ताचें अंतःकरण त्यानें ओळखलें असतें. आज-काल एखाद्या ख्रिस्त्याला ४० दिवस व रात्री उपाशी ठेवलें तर तो जगूं शकेल काय ? दुसरीहि गोष्ट यावरून सिद्ध झाली कीं, येशूख्रिस्त ईश्वराचा पुत्र नव्हता किंवा त्याच्या अंगीं कांहीं करामत असती तर त्यानें सैतानासमक्ष धोंड्यांच्या भाकरी बनवून दाखविल्या असत्या. त्यानें फार तर खावयाच्या नव्हत्या. पण त्यावरून त्याचें ईश्वरपुत्रत्वसिद्ध झालें असतें व मग त्याला जी भूक लागली म्हणून [illegible] सांगितलें आहे तशी त्याला भूकहि न लागती. खरी गोष्ट ही आहे कीं, परमेश्वराशिवाय धोंड्यांच्या भाकरी बनविण्यास कोणीहि समर्थ नाहीं. ईश्वर सर्वज्ञ असल्यामुळें तोहि पूर्वोक्त नियम बदलूं इच्छिणार नाहीं आणि म्हणूनच त्याचीं कृत्यें सर्व जगदारंभापासून बिनचूक होत आहेत ॥

६२—त्यानें त्यास ह्मटलें. माझ्या मागून या, ह्मणजे मी तुह्मांस मनुष्यें धरणारे करीन. मग ते लागलेच जाळीं सोडून देऊन त्याच्या मागून चालले.

—मत्तय. अ. ४ ओ. १९।२० ॥

**समीक्षकः**—जुन्या करारांतलि तौरेत भागांत लिहिलें आहे कीं, मुलांबाळांनीं आपल्या आईबापांची सेवा करावी व त्यांना प्रिय असें वागावें ह्मणजे त्यांना दीर्घायुष्य प्राप्त होईल. क्रिस्तानें आईबापांची सेवा व त्यांना प्रिय अशी वागणूक न ठेविल्यामुळेंच त्या पापाचें फळ ह्मणून तो अकालीं मेला. आईबापाची सेवा करणें दूरच, परंतु इतर लोकांना त्यानें आपल्या जाळयांत अडकवून हजारों आईबापांपासून त्यांचीं मुलेंबाळें सोडवून त्यांचे शाप घेतले! आणखी हेंहि कळून येतें कीं, येशूनें मनुष्यांना फसविण्याकरितां एक मत प्रचलित केले आहे. त्या मताच्या जाळयांत जर स्वतः ख्रिस्तानें कित्येक अज्ञ मनुष्यें माशाप्रमाणें पकडलीं, तर गुरूचें अनुकरण करून त्याचे शिष्य आजकाल हजारों अज्ञ लोकांना फसवून ख्रिस्ती करतात यांत नवल ते काय? कारण ज्याप्रमाणें मोठमोठे व विपुल मासे मिळविणाऱ्या लोकांचा चरितार्थ उत्तम चालतो त्याप्रमाणें जितके अज्ञानी, दरिद्री लोक स्वमतांत जास्त जो कोणी मिशनरी आणील त्याची प्रतिष्ठा व जीविका उत्तम चालते! हे क्रिस्ती लोक, जगांतील स्वधर्माविषयीं जे लोक अज्ञानी आहेत, ज्यांना गरीबीनें त्रस्त केलें आहे, जे भोळे, अंधश्रद्धाळूजन आहेत अशांना आपल्या जाळयांत पकडून त्यांना आपलें आईबाप, बंधुभगिनी, नातलग या सर्वांपासून पृथक करितात! ह्मणून सर्व विद्वान् आर्यांचें उचित कर्तव्य आहे कीं, त्यांनीं स्वतः क्रिस्ती मिशनरींच्या जाळयांत सांपडूं नये व आपल्या इतर धर्मभोळ्या बंधूंना या जाळयापासून वांचवावें ॥ ६२ ॥

६३—नंतर येशू सभास्थानांत शिक्षण देत व राज्याची सुवार्ता गाजवीत व लोकांतलें सर्व प्रकारचे रोग आणि सर्व प्रकारचीं दुखणीं बरीं करीत सर्व गालीलांत फिरला आणि त्याची कीर्ति सूरिया देशभर पसरली. तेव्हां ज्यांस नानाप्रकारचे रोग व वेदना लागल्या होत्या, जे भूतग्रस्त व फेंपरेकरी व पक्षपाती होते अशा सर्व दुखणेकऱ्यांस त्याकडे आणिलें आणि त्यानें त्यांस बरें केलें.

—मत्तय अ. ४ ओ. २३।२४

**समीक्षक**—जर आजकालची रामरक्षा, मंत्र, तंत्रादि प्रयोगांनीं भूतेंप्रेतें निघतात हें खरें असेल तर असल्याच पोपलीलांनीं बायबलांत वर्णिलेले रोगग्रस्त लोक बरे होत असतील. जर यावरून येशूचें देवपुत्रत्व मानावयाचें तर आमच्या येथील भटे, पुजारी, गंडादोरा करणारे हे सर्व देवपुत्रच होत! या सर्व थापा धर्मभोळ्या लोकांना फसविण्याकरितां आहेत. येशूनें रोगी बरे केले ह्या बायबलांतलि व आमच्यांतलि गंड्यादोऱ्यांनीं भूत पिशाच नाहींसें झालें या गप्पा सारख्याच होत.

६४—जे आत्म्यानें " दीन " ते धन्य, कारण स्वर्गाचें राज्य त्यांचें आहे. " जे शोक करितात " ते धन्य, कारण " ते सांत्वन पावतील " मी तुह्मांस खचीत सांगतों, कीं आकाश व पृथ्वी नाहींशीं होईपर्यंत सर्व गोष्टी पूर्ण झाल्यावांचून नियमशास्त्राची एक मात्रा किंवा एक बिंदु नाहींसा होणार नाहीं. यास्तव जो कोणी या अगदीं लहान आज्ञांतील एक रद्द करील व तदनुसार लोकांस शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यांत अगदीं लहान ह्मणतील, आणि जे कोणी त्या पाळील व शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यांत मोठा ह्मणतील. —मत्तय अ. ५ आ. ३।४।१८।१९

**समीक्षकः**—जर स्वर्ग एक असेल तर राजाही एकच असला पाहिजे. जितके " दीन " आहेत ते सर्व स्वर्गाला जातील. मग स्वर्गाचे अधिकारी फार झाल्यावर ते आपापसांत लढाई झगडे करतील आणि राज्यव्यवस्थेचे तुकडे तुकडे पडतील. " दीन " ह्मणजे कोण ? जर कंगाल, दरिद्री, निष्कांचन ह्मणणें असेल तर तें योग्य नव्हे व मनानें जो दीन असेल त्याला समाधान वृत्ति लाभणें कठीण; ह्मणून हाही अर्थ योग्य नव्हे व जर निरभिमानता ह्मणणें असेल तर दीनता व अभिमान यांचा अर्थ एकच नव्हे. जर आकाश व पृथ्वी ह्या नाहींशा झाल्या तर नियमशास्त्रच तेवढें कोठें राहील ? असलें अनित्य नियमशास्त्र मनुष्यकृत असतें, सर्वज्ञ ईश्वरप्रणीत तें होऊं शकत नाहीं. याठिकाणीं नियमशास्त्र बलात्कारानें लोकांकडून पालन करवून घेण्यासाठीं स्वर्गाच्या राज्याची लालुच दाखविली आहे व जो हें करणार नाहीं त्याला स्वर्गांत लहान ह्मणतील अशी भीति घातली आहे. ॥ ६४ ॥

६५—आमची प्रति दिवसाची भाकर आज आह्मांस दे. पृथ्वीवर आपणांकरितां सांठवूं नका, तेथें कसर व जंग खाऊन नाश करितात. आणि चोर घर फोडून चोरी करितात. —मत्तय अ. ६ आे. ११।१९

**समीक्षकः**—यावरून स्पष्ट दिसतें कीं, येशूख्रिस्ताच्या काळीं लोक जंगली व दरिद्री होते. येशूही दरिद्री होता. म्हणूनच त्यानें प्रति दिवसाची भाकरी ईश्वराजवळ मागितली आहे व आपल्या शिष्यांना मागण्यास सांगितलें आहे. संपत्ति सांठवूं नका अशी गुरूची आज्ञा असतां ख्रिस्ती लोक संपत्तीसाठींच धडपडत आहेत. त्यांचें कर्तव्य हें कीं, गुर्वाज्ञा मान्य करून जवळील सर्व संपत्तीचें दान पुण्य करून त्यांनीं " दीन " ॥६५॥

६६—मला, हे प्रभू, असें ह्मणणाऱ्या प्रत्येकाचा प्रवेश स्वर्गाच्या राज्यांत असें नाहीं. —मत्तय अ. ७ आे. २१

**समीक्षकः**—जर हें येशूचें वचन सत्य असेल तर त्याला नुसते प्रभू प्रभू ह्मण- णारे मोठे मोठे असे त्याचे अनुयायी यांचा प्रवेश स्वर्गाच्या राज्यांत होणार नाहीं, कारण ख्रिस्ताविरुद्ध वागणें हें पाप होय ह्मणून येशूला त्यांनीं प्रभु ह्मणूं नये ॥ ६६ ॥

६७—त्या दिवशीं मला बहुत ह्मणतील, हे प्रभु, हे प्रभू, आह्मी तुझ्या नांवानें प्रवचन सांगितलें, व तुझ्या नांवानें भूतें घालविलीं, व तुझ्या नांवानें बहुत अद्भुत कृत्यें केलीं. नाहींत काय? तेव्हां मीं त्यांस स्पष्ट सांगेन कीं, मला तुमची कधींच ओळख नव्हती "अहो अधर्म करणाऱ्यांनों, मजपासून निघून जा."

—मत्तय अ. ७ ओ. २२।२३

**समीक्षकः**—या ठिकाणीं भोळ्याभाळ्या लोकांना चकविण्यासाठीं येशूनें आपण स्वर्गातील न्यायाधीश आहों अशी बतावणी केलेली आहे, ह्या प्रलोभनाला भोळे लोकच भीतील ॥६७॥

६८—आणि पाहा, एक कुष्टरोगी येऊन त्यांच्या पायां पडून ह्मणाला, हे प्रभू तुझी इच्छा असली तर मला शुद्ध करायास तूं शक्तिमान आहेस. तेव्हां त्यानें हात पुढें करून त्याला स्पर्श केला व ह्मटलें, माझी इच्छा आहे, शुद्ध हो, तेव्हांच त्याचें कुष्ट जाऊन तो शुद्ध झाला.

—मत्तय अ. ८ ओ. २।३

**समीक्षकः**—ह्या सर्व गोष्टी विद्या, सृष्टिक्रमविरुद्ध अशा आहेत व त्या अज्ञानीं व धर्मभोळ्या लोकांनींच खऱ्या मानाव्या. बायबलांतील या गोष्टी जर खऱ्या मानावयाच्या तर शुक्राचार्य, धन्वंतरि, कश्यप वगैरेविषयींच्या ज्या चमत्कारिक गोष्टी पुराणांत व भारतामध्यें सांगितल्या त्या खिस्ती लोकांनीं सत्य कां मानूं नयेत? दैत्यांचे मेलेले सैन्य जिवंत केलें, बृहस्पतीच्या पुत्राचे-कचाचे तुकडे तुकडे करून ते जनावरांना व माशांना खाऊं घातलें तरीहि पण शुक्राचार्यांनीं त्याला जिवंत केलें, नंतर त्याच कचाला मारून शुक्राचार्यांनीं तो गट्ट केला आणि पुनः आपल्या पोटांत त्याला सजीव करून बाहेर काढलें व स्वतः मेला, पण कचानें शुक्राचार्य यांस जिवंत केलें! कश्यपानें तक्षकाकडून भस्म झालेलीं मनुष्यें व वृक्ष यांना जिवंत केलें! धन्वंतरीनें लाखों प्रेतें उठविलीं लाखो कुष्टरोगी वगैरे बरें केले, लाखो अंधांना दृष्टि व बहिऱ्यांना श्रवणशक्ति प्राप्त करून दिली या सर्व गोष्टी खिस्ती लोकांनीं असत्य कां मानाव्या? वर पुराणांतील चमत्कार खोटे तर येशूच्या नांवावर उगाच लादलेले चमत्कार तेवढेच खरे असें खिस्त्यांनीं कां मानावें? जे दुसऱ्यांच्या गोष्टींना खोटें व आपल्या खोट्याला खरें मानतात ते पक्षपाती व हट्टी लोक नव्हेत काय? आणि ह्मणूनच खिस्त्यांच्या ह्या भाकडकथा सर्वथैव खोट्या व हट्टी लोकांच्या होत. ॥६८॥

६९—मग तो पलीकडे गदरेकरांच्या देशांत आल्यावर दोन भूतग्रस्त मनुष्य कबरींतून निघून येत असतांना त्याला भेटले; ते इतके विक्राळ होते कीं, त्या वाटेनें कोणाच्यानें जाववत नसें. तेव्हां पाहा, ते ओरडत ह्मणालें, हे देवाच्या पुत्रा, आमचा व तुझा काय संबंध? नेमलेल्या समयापूर्वीं तूं आह्माला पीडायास एथें आलास काय? तेथें त्यांपासून दूर अंतरावर डुकरांचा मोठा कळप चरत होता. मग त्या भूतांनीं त्याला

विनंती केली कीं, जर आह्मांस काढीत असलास तर आह्मांस त्या डुकरांच्या कळपांत पाठीव त्यानें त्यांस ह्मटलें जा, मग तीं निघून डुकरांत शिरलीं; आणि, पाहा, तो अवघा कळप कड्यावरून समुद्रांत धडक धांवत जाऊन पाण्यांत बुडून मेला.

—मत्तय अ. ८ ओ. २८ ते ३२.

**समीक्षकः**—थोड्याशा विचारांतीं आपणांस सहज समजेल कीं, ह्या गोष्टी ह्मणजे शुद्ध थोतांडें होत. मेलेला मनुष्य कबरस्थानांतून कधींतरी उठूं शकेल काय ? अशीं कबरामधील मनुष्यें उठूं शकत नाहींत, कोणाशीं संवाद करूं शकत नाहींत, ना कोणाच्या अंगांत प्रवेश करूं शकतात; या गप्पा फक्त अज्ञानीं लोकांनींच पिकविलेल्या असतात व त्यांवर केवळ महाजंगली जे लोक आहेत तेच विश्वास ठेवतात. पण ही बायबली लीला पहा कीं, तीं कबरस्थ प्रेतें मोठ्यानें ओरडत उठलीं व येशूला ह्मणाली आह्माला त्या डुकरांच्या कळपांत पाठीव. येशूनें तसें केलें ! आतां या ठिकाणीं डुकरांची जी हत्या झाली तीं, डुकरांच्या मालकांचें जें नुकसान झालें तें, या सर्वांचें पाप येशूला लागलें तरीहि आमचा प्रभु येशु पापांची क्षमा करणारा व पवित्र आहे अशी ख्रिस्त्यांची समजूत आहेच ! येशु पवित्र होता. तर त्या भूतांनाच त्यानें पवित्र कां केलें नाहीं ह्मणजे सर्व कांहीं ठीक झालें असतें ? व न्यायी होता तर निरपराधी असे जे डुकरांचे मालक त्यांची त्यानें व्यर्थ नुकसानी तरी कां केली ? व केली तर तिची भरपाई करणें हें त्याचें कर्तव्य नव्हतें काय ? आजकालचे सुशिक्षित पाश्चात्य लोक या भाकडकथांवर विश्वास ठेवीत असतील काय ? जर ठेवीत असतील तर तेही अद्याप भ्रमजालांतच अडकले आहेत ह्मणावयाचें. ॥६९॥

७०—आणि पहा, खाटेवर पडलेल्या कोणी एका पक्षपाती मनुष्यांस त्याकडे आणिलें, तेव्हां येसू त्याचा विश्वास पाहून पक्षपात्याला ह्मणाला. मुला, धीर धर. तुझ्या पापाची क्षमा झाली आहे. मी धार्मिकांस नाहीं, तर पाप्यांस बोलावयास आलों;

—मत्तय अ. ९ ओ. २।१३

**समीक्षक**—हीहि गप्प वरीलप्रमाणेंच असंभवनीय असून भोळ्या जनतेला येशूच्या जाळयांत अडकविण्याकरितां रचलेली आहे. पापाच्या क्षमेबद्दल लिहिलें तें तर फारच विचित्र आहे. ज्याप्रमाणें मद्यपी, अफीणबाज यांची मद्य, अफू, भांग, गांजा याची नशा दुसऱ्याला येऊं शकत नाहीं त्याप्रमाणें एकाचें पाप सुद्धां तें दुसऱ्या कोणाला लागत नाहीं किंवा नष्ट होत नाहीं परंतु जो तें करितो त्यालाच तें भोगावें लागतें हा न्यायी ईश्वराचा चोख न्याय होय. जर एकाचें पाप पुण्य दुसऱ्याला प्राप्त होत असेल तर मोठीच मौज होईल. आरोपीच्या अपराधाबद्दल न्यायाधीशाला कां शिक्षा मिळूं नये ! पण असें नाहीं हें खास ! ईश्वरानें पाप्याला यथावत् जर शासन केलें नाहीं व त्याच्याबद्दल निष्पाप्याला केलें तर असा ईश्वर अन्यायी होय. त्रिकाल सत्य हे आहे

कीं, धर्मच मनुष्याला कल्याणप्रद आहे, येशू अथवा दुसरा कोणीहि नाहीं आणि धर्मात्म्याकरितां येशू वगैरे मधल्या दलालाची मुळींच आवश्यकता नाहीं. व तारण हें धार्मिकासाठींच आहे. पाप्याच्याकरितां नव्हे; कारण पाप्यानें कृतकर्मांचें फल भोगलेंच पाहिजे. ॥ ७० ॥

७१—तेव्हां त्यानें आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांनीं अशुद्ध आत्म्यांस काढावें, आणि सर्व प्रकारचे रोग व सर्व प्रकारचीं दुखणीं बरी करावी असा अधिकार दिला. कारण बोलणारे तुह्मी नाहीं, तर तुमच्या बापाचा आत्मा ह्याच तुह्मामध्यें बोलणारा आहे. मी पृथ्वीवर शांतता चालवायास आलों असें समजूं नका, परंतु तरवार चालवायास आलों. कारण " पुत्र व बाप, कन्या व आई, सून व सासू यांत विरोध " पाडण्यास मी आलों.

—मत्तय अ. १० ओ. १।२।३४ ते ३६

**समीक्षक**—ज्यानें येशू ख्रिस्ताला ३० रुपयांची लांच खाऊन पकडून दिलें व ऐन प्रसंगीं ख्रिस्ताला सोडून जे पळाले तेच हे ख्रिस्ताचे अत्यंत प्रिय असे बारा शिष्य होत ! आह्मीं वारंवार सांगितलें आहे कीं, अशुद्ध आत्मे काढणें, बिना औषधानें रोग बरें करणें ह्या गोष्टी अज्ञानी लोकांच्या असून त्या सृष्टिक्रमविरुद्ध असल्यामुळें असंभवनीय होत. जर जीव बोलणारे नसून ईश्वर बोलणारा आहे तर जीव काय काम करीत असतो ? सत्य व असत्य भाषणाचें फल जर सुख दुःख असेल तर त्याचा भोक्ता मग ईश्वरच ठरला हा सिद्धांत देखील पूर्ण चुकीचा आहे. येशू जसा पृथ्वीवर शांतता स्थापन करण्यासाठीं आला नव्हता, त्याचप्रमाणें आज त्याच्या शिष्यांकडून जगांत अशांतता नांदत आहे. ' गुरु तैसा चेला ' हेंच खरें ! सांप्रत तरवारीचें राज्य आहे हें कोण अमान्य करील ? पितापुत्र, कन्या माता, सासू सुना यांच्यामध्यें विरोध असल्यावर कोणतें कुटुंब सुखसमृद्ध राहणार आहे ? याच उपदेशानुसार पिता पुत्राची, कन्या माताची, सासू सूनांची ताटातूट करून त्यांना दुःखांत लोटण्याचें श्रेय येशूभक्त घेत असतील काय ? पृथ्वीवर अशांतता, दुःख, कलह, झगडे चालविणारे असे आपले सच्छिष्य पाहून गुरूला खरोखर धन्यता वाटत असेल, कारण गुरूचेंच ब्रीद पृथ्वीवर अशांतता माजाविण्याचें होतें !!! पण हें श्रेष्ठ पुरुषांचें काम नव्हे. ॥७१॥

७२—येशूनें त्यांस विचारिलें तुह्माजवळ किती भाकरी आहेत ? ते ह्मणाले सात, व कांहीं मासोळ्या. मग त्यानें समुदायास जमिनीवर बसावयास सांगितलें आणि त्यानें त्या सात भाकरी व मासोळ्या घेऊन उपकारस्तुति करून त्या मोडिल्या व शिष्यांस दिल्या आणि शिष्यांनीं समुदायाला दिल्या मग ते सर्व जेवून तृप्त झाले आणि त्यांनीं उरलेल्या तुकड्यांचें सात टोपले भरून घेतले. जेवणारे तर बायका व लेकरें खेरीज करून चार हजार पुरुष होते.

—मत्तय अ. १५ ओ. ३४ ते ३९

**समीक्षकः**—आजकाल ज्याप्रमाणें दांभिक व इंद्रजाल रचणारे लोक असतात, त्याप्रमाणेंच वरील क्रिस्तकहानी आहे किंवा नाहीं तें पाहा. त्या भाकरीमध्यें दुसऱ्या भाकरीची भरती कोठून आली? जर खिस्तांत हें सामर्थ्य होतें तर चाळीस दिवसांच्या उपवासानंतर त्याला जेव्हां भूक लागली होती ते वेळीं अंजिराचीं फळें शोधण्यार्थ तो कां भटकत होता आणि स्वतीं, झाडधोंडे यांच्याच त्यानें पुरणपोळया कां बनविल्या नाहींत? हे सर्व बालिश प्रकार होत. सध्या वेषधारी साधु संन्याशी जसे बायाबापड्यांना फसवितात तसलाच हा प्रकार! ॥ ७२ ॥

७३ त्यासमयीं "**तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कामाप्रमाणें फल देईल.**"

मत्तय अ. १६ ओ. २७॥

**समीक्षक**—ज्याला त्याला कर्मानुसारच फल मिळणारें आहे तर मग खिस्तावर विश्वास ठेवल्यानें पापांची क्षमा होणारी आहे हा उपदेश व्यर्थ होय. जर तो खोटा असेल, व्यर्थ असेल तर हा खोटा होय. जर कोणी ह्मणतील कीं, क्षमा करण्यास योग्य असतील त्यांना क्षमा होईल नसतील तर नाहीं, तर हेंही ठीक नव्हें; कारण सर्व कर्मांचीं फलें यथायोग्य रीतिनें दिल्यास तोच न्याय व दया होय. ॥ ७३ ॥

७४—तेव्हां येशूनें उत्तर दिलें कीं, आहाहा अविश्वासी व कुटील पिढी, मी **कोठवर तुह्माबरोबर असूं? कोठवर तुमचें सोसू? कारण मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, जर तुह्मांमध्यें मोहरीच्या दाण्याएवढा विश्वास आहे तर या डोंगराला एथून तिकडे सर, असें तुह्मी ह्मटल्यास तो सरेल; तुह्मांला कांहीं असाध्य होणार नाहीं.**

मत्तय. अ. १७ ओ. १७।२०॥

**समीक्षकः**—खिस्ती मिशनरी उपदेश करीत असतात 'अहो विद्यार्थ्यांनों, या, खिस्ताला शरण या व मुक्त व्हा.' पण हा उपदेश वरील क्रिस्त वाक्यानेंच सपशेल खोटा ठरतो. कारण प्रत्यक्ष खिस्त सहवासांत जन्म घालविला असतांही त्याचे शिष्य अविश्वासी व कुटील राहिले ते राहिलेच. मग खिस्तानंतरच्या हजारों वर्षांच्या खिस्त-शिष्यांची गोष्टच बोलावयास नको. स्वतः खिस्ताचे वेळेस जर त्याच्या शिष्यांचे अंगीं मोहरीच्या दाण्याएवढाहि विश्वास खिस्ताला आढळून आला नाहीं, तर सांप्रतच्या क्रिस्तशिष्यांत तो कसला असणार? जर त्याच्याठायीं खिस्त विश्वास आहे तर त्यांनीं एखादा डोंगर सारून दाखवावा, बिना औषधांचे रोगी बरे करून दाखवावेत. पण जेथें त्यांच्याजवळ मोहरीच्या दाण्याएवढाहि विश्वास नाहीं तेथें त्या गोष्टी आजच्या खिस्त्यांना साध्य व्हाव्या कशा! 'परोपदशे पांडित्य' करायाला त्यांची काय नुकसान होते? झाला तर फायदाच होतो! येशूच्या स्वतःच्या ठायीं पापमुक्त करण्याचें सामर्थ्य असतें, दुसऱ्यांच्या ठायीं विश्वास उत्पन्न करण्याची शक्ति असती, पवित्र बनविण्याची ताकद असती, तर त्यानें आपल्या हयातींतच आपल्या शिष्यांचे आत्मे निष्पाप,

विश्वासी, पवित्र बनविले नसते काय ? जी कामगिरी तो स्वतः करूं शकला नाहीं, ती ह्मणे आतां त्याच्या शिष्याकडून होत जावी हें समजणेंच चूक आहे. खिस्त शिष्य मोहरीच्या दाण्याएवढाही विश्वास बाळगीत नव्हतें अशा अविश्वासी लोकांकडून जें पवित्रशास्त्र-बायबल रचलें गेलें आहे तें शास्त्र कितपत प्रमाण मानावें हा प्रश्नच आहे; कारण अविश्वासी, अपवित्रात्मे, अधर्मी लोकांचे लेख तसेच असणार. त्यांवर विश्वास ठेवणें हें काम, ज्यांना स्वतःचें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे, त्यांचें नव्हें. वरील खिस्त वचन सत्य असेल तर आजच्या एखाद्या खिस्ती मिशनरीला एखादा डोंगर सारण्यास सांगवें; जर तो सरला तर, पूर्ण विश्वास नसला तरी, मोहरीच्या दाण्याएवढा कां होईना, पण विश्वास आहे हे खास व मुळींच न सरला तर अणूमात्र नाहीं असें बेलाशक समजावें. ह्या ठिकाणीं कोणी असें ह्मणतील कीं, पहाड ह्मणजे अभिमानादि दोष असें समजा, तरीही ठीक नाहीं, कारण या ठिकाणीं असा अर्थ घ्यावयाचा तर प्रेतें, आंधळे, कुष्ठरोगी, भूतग्रस्त यांना खिस्तानें बरें केल्याच्या ज्या गोष्टी आहेत त्या ठिकाणीं आळसी, अज्ञानी, विषयी व भ्रान्त लोकांना उपदेश करून सचेत, कुशल असें क्रिस्तानें बनविलें असा अर्थ कां घेऊं नये ? वास्तविक असें ह्मणणें देखील धाडसाचेंच आहे, कारण स्वशिष्यांनाच त्यानें सचेत, कुशल असें कां केलें नाहीं ? याकरितां असंभवनीय उपदेश करणें हें येशूचें अज्ञान-प्रदर्शन होय. येशु खिस्तांत विद्याच असती तर असल्या मनमानेल त्या जंगली गप्पा तो कां मारतां ? तथापि ( **निरस्तपादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते** ) ज्याप्रमाणें एखाद्या अरण्यांत कोणताच वृक्ष नसावा व त्यामध्यें एरंडाचें झाड, हाच सर्वांपेक्षां उंच व उत्तम वृक्ष समजला जावा तद्वतच महाजंगली अविद्वानांच्या देशांत येशूलाही श्रेष्ठत्व प्राप्त होणें स्वाभाविक होतें परंतु सांप्रतकाळीं येसूची बिचाऱ्याची गणना ती काय ?

७५—मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, मन फिरल्याशिवाय व तुह्मी बालकासारखे झाल्याशिवाय स्वर्गाच्या राज्यांत तुमचा प्रवेश होणारच नाहीं.

मत्तय अ. १८ ओ. ३॥

**समीक्षक**—आपल्या इच्छेवर मनाचें फिरणें वा न फिरणें अवलंबून आहे व त्यायोगें स्वर्ग अगर नरक प्राप्ति ही मिळणारी आहे, तर हा वैदिकधर्माचा सिद्धांत झाला. मग क्रिस्तावरील विश्वासानें पाप नष्ट होतें हें ह्मणणें फोल ठरलें. खरें हें आहे कीं, कोणी कोणाचें पाप घेऊं शकत नाहीं. मात्र बालासारखें मन झाल्याखेरीज ह्मणजे ज्ञान अज्ञान न समजतां वागल्यानें स्वर्गप्राप्ति होते हें क्रिस्ताचें ह्मणणें अज्ञानद्योतक होय. ह्यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं, बालकासमान सर्वांचीं मनें बनलीं, त्यांची सारासार बुद्धि जागृत झाली नाहीं, ह्मणजे कोणीही आपल्या उपदेशाविरुद्ध ब्र काढणार नाहीं. मग आपण जी तीच अमावास्या लोक मानतील, व डोळे झांकून आपलें अनुयायीत्व ते पतकरतील असें क्रिस्ताला वाटलें असावें ! क्रिस्ताच्या उपदेशाचाच हा परिणाम आहे कीं, बाय-

बलांतील सृष्टिक्रमाविरुद्ध व अविद्याजनक असंभवनीय गोष्टीवर त्याचे चेले विश्वास ठेवतात. क्रिस्ताचा उपदेशच बालिश, मग तो मागणारे बालिश कां नसावेत ? असे बालिश–बाळवत् लोक बनावेत हीच ख्रिस्ताची इच्छा होती कारण त्याचे उपदेश बालकांना शोभणारे आहेत विद्वानासाठीं नव्हेत. ॥ ७५ ॥

७६—मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, स्वर्गाच्या राज्यांत धनवानाचा प्रवेश होणें कठीण आहे. आणखी तुह्मांस सांगतों, देवाच्या राज्यांत धनवानाचा प्रवेश होणें यापेक्षां उंटाला सूईच्या नाकांतून जाणें सोपें आहे. —मत्तय अ. १९ आे. २३।२४॥

**समीक्षक**—यावरून सिद्ध होतें कीं, येशू दरिद्री होता, धनवान लोकांमध्यें त्याची कांहीं प्रतिष्ठा नव्हती, याकरितांच त्यानें असें लिहिलें असावें. तथापि दरिद्री काय किंवा धनवान काय सर्वांमध्यें बरे वाईट लोक असावयाचेच. जो कोणी सत्कर्में करतो तो पुण्यवान व जो वाईट कामें करतो तो पापी होय. ईश्वराचें राज्य संबंध भूगोलावरच आहे, त्यामध्यें दरिद्री व श्रीमंत आहेत पण येशूची जन्मभूमि दरिद्री लोकांची असेल व अपवादादाखल श्रीमंतहि असतील अशा श्रीमंतांना स्वर्गाचें दार येशूनें बंद ठेवलें, परंतु त्यामध्यें संपत्तीनें श्रेष्ठ व आत्म्यानेंही श्रेष्ठ असा एकही नसेल काय ? परंतु येसूचें स्वर्गाचें राज्य सर्वव्यापक नव्हतें यावरून क्रिस्ताचा ईश्वर व त्याचें राज्य एकदेशी ठरलें. आणखी या वाक्यानें हेंहि सूचित होतें कीं, जितके श्रीमंत असे क्रिस्ती लोक असतील त्यांना ईश्वराचें राज्य दुष्प्राप्य ठरलें ! अरेरे, ते सर्व नरकांत जातील काय ? व दरिद्री क्रिस्ती बेधडक स्वर्गांत जावेत ना ? येशू क्रिस्तानें थोडा तरी विचार केला असतां तर त्याला कळून आलें असतें कीं, दरिद्र्याजवळ जशी सारासार-बुद्धि, विवेक, पापभीरूता व ईश्वरनिष्ठा असते तशीच श्रीमंतांजवळहि असते उलट दरिद्री लोकांजवळ ही साधनसामग्री कमीच असते, त्यांना बिचाऱ्यांना पोटाचीच मारामार अशी स्थिति, म्हणूनच, ' बुभुक्षितः किं न करोति पापं ' या न्यायानें पापें झालीं तर तीं दरिद्र्यांकडूनच सहसा ज्यास्त व्हावयाची ! श्रीमंत तर स्वतः पापभीरू राहूनहि शक्य तों अनाथ, दरिद्री यानां मदत करील किंवा अन्य धर्ममार्गी पैशाचा व्यय करील पण क्रिस्त महाराजानें जेव्हां श्रीमंतांना स्वर्गाच्या राज्यांतील प्रवेश कठीण व दरिद्र्यांना सहज साध्य सांगितला आहे. क्रिस्तानुयायांनीं दरिद्री होण्याची धडपड करावी ! ॥ ७६ ॥

७७—येशूनें त्यांस ह्मटलें, मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, पुनरुत्पत्तींत मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवाच्या सिंहासनावर बसेल तेव्हां माझ्या मागून चालत आलेले तुह्मीही बारा सिंहासनावर इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय कराल. आणि ज्या कोणी घरें किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा शेतें माझ्या नावांकरितां सोडिलीं आहेत, त्याला शंभरपट मिळेल, व सार्वकालिक जीवन हें वचन मिळेल.

मत्तय अ. १९ ओ. २८।२९

**समीक्षक**—आतां क्रिस्ताची विचित्र लीला पहा! मेल्यानंतरहि लोकांनीं आपल्या मोहजालांतून निसटूं नये ह्मणून येशूनें थापा देण्यास प्रारंभ केला आहे! तो ह्मणतो, माझ्या मागून चालत आलेले तुह्मी बाराहि जण मी ज्या सिंहासनावर बसेन त्यावरच मजजवळ बसाल, ह्या शिष्यामध्यें ३० रुपड्यांच्या लालचीनें स्वगुरुद्रोह करून येशूला पकडून देणारा नराधम पापी शिष्य देखील आहे. अशा शिष्यगणासह क्रिस्ताची स्वारी सिंहासनावर न्यायदानासाठीं आरूढ होईल! न्यायदिनीं कोणत्या कुलाचा व जातीचा सूड उगवला जाणार आहे तर जे इस्राएल नाहींत त्या कुलाचा!!! इस्राएल कुलाच्या अभिमानानें त्याचा न्याय न करितां त्यानां सर्व गुन्हे माफ आणि अन्य कुलांचा न्याय होईल! यावरून अनुमान हेच निघतें कीं, क्रिस्ती लोक न्याय देतांना स्वजातीचा पक्षपात करितात व ह्मणूनच एखाद्या गोऱ्यानें काळ्या मनुष्याचा खून केला तर गोरा आदमी निरपराधी होऊन बहुधा सुटतो! ज्याप्रमाणें गोऱ्या क्रिस्तानुयायांचा विचित्र न्याय त्याप्रमाणें त्यांच्या स्वर्गीय सद्गुरूचा स्वर्गीय खासा न्याय!!! या न्यायदानांत आणखी एक मोठा दोष उत्पन्न होतो, तो असा कीं, एक मनुष्य सृष्टीच्या मध्यकालीं मृत्यु पावला व एक न्यायाच्या आदल्या दिवशीं मेला तर जो मध्यकालीं मेला तो बिचारा न्यायाच्या दिवसाची वाट पहात शेंकडों वर्षें स्वस्थानींच तडफडत राहील व जो न्यायदिनाच्या आदल्या दिवशीं मरेल त्याचा २४ तासांत झटपट न्याय होईल हा न्याय का न्यायाचाच फार्स? आमच्यामतें हा घोर अन्याय होय! आणि जो नरकांत जाईल तो सर्वकाळ जाईल व स्वर्गांत जाणारा सर्वकाळ स्वर्गांत राहील, हा देखील न्यायाचा एक प्रकार! वास्तविक रीतीनें ज्या साधनांना व कर्मांना अंत आहे त्याचे परिणाम व फलें यांनांही अंत असला पाहिजे, समसमान पापपुण्य दोन जीवांचें कधीं होऊं शकत नाहींत. एखाद्याचें पुण्य दुसऱ्याच्या पापापेक्षां कमजास्त असणारच किंवा दुसऱ्याचें पाप एखाद्याचे पुण्यापेक्षां न्यूनाधिक असणार पण शिक्षा मात्र समसमान! याकरितां तारतम्य न्यायानें अधिक न्यून सुख-दुःखवाले अनेक स्वर्ग व नरक हे असावेत तरच सुखदुःखें भोगतां येतील पण ही व्यवस्था ख्रिस्ती शास्त्रांत नसल्यामुळें हें शास्त्र ईश्वरकृत आहे वा ख्रिस्त न्यायाधीश हे ईश्वराचे चिरंजीव आहेत ह्या गोष्टी खोट्या होत. आणखी एक विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, कोणाचेही आईबाप शंभर शंभर असूं शकत नाहींत पण ख्रिस्तराज भाविक भक्तांना थाप देत आहेत कीं, मजकरितां तुह्मी आपले आईबाप, बहीणभाऊ वगैरे हे सर्व सोडून द्या कारण मी तुह्मांला त्यांच्या ऐवजीं शंभरपट देईन. मुसलमानी शास्त्रांत स्वर्गामध्यें एकएकाला ७२।७२ बायका मिळतात असें जें वर्णन आहे त्यावरून मात्थीनें हें अत्यंत ' शुभवर्तमान ' सांगितलें असेल ॥ ७७ ॥

७८—मग सकाळीं तो परत नगरांत येत असतां त्याला भूक लागली आणि वाटेवर एक अंजिराचें झाड पाहून तो त्याकडे गेला; पण पानांवांचून त्यावर कांहीं

मिळालें नाहीं; मग त्यानें त्याला ह्मटलें यापुढें तुला कधीं न फळ येवो, आणि लागलेंच तें अंजिराचें झाड वाळून गेलें. —मत्तय अ. २१ ओ. १८।१९

**समीक्षकः**—सर्व लहान मोठे ख्रिस्तभक्त मोठ्या आव्यतेनें ख्रिस्तशांति क्षमा रसभरीत रीतीनें वर्णन करीत असतात; आमचा गुरु फार क्षमाशील व फारच शांततेचा पुतळा! त्याला मग क्रोध कसा तो शिवला नाहीं? परंतु वरील प्रकारावरून त्याची शांतता ठळकपणें दृग्गोचर होत आहे. येशू शांतशील तर नव्हताच पण क्रोधी व ऋतुविषयींचें त्याला ज्ञानहि नव्हतें. येशूच्या क्षुधाशांतिस्तव ऋतुनें आपलें नियमित कार्य सोडून द्यावयाचें असें या ईश्वरपुत्राला वाटलें काय? भूकेनें व्याकुळ झाल्यामुळें तो अंजिराजवळ गेला, पण तेथें फक्त पानेंच राहिलेलीं! मग काय विचारतां शांतीनें खांबी प्राण सोडणारा ईश्वरपुत्र खवळला व वृक्षा तुझें भस्म होवो ह्मणतांच अंजिराचें झाड एकदम वाळून मेलें!!! केवढा हा पराक्रम! झाडानें केवढा महान् अपराध ईश्वरपुत्राचा केला? बरें, बेट्याला प्रायश्चित्त मिळालें! झाडाचें तर ठीक झालें पण ही कृति साधारण मनुष्याला तरी शोभतें काय? शापानें जर झाड वाळलें तर, मग आशीर्वादानें त्याला फळें आलीं नसतीं काय? ॥ ७८ ॥

७९—त्या दिवसांतलि संकटामागून लागलाच "सूर्य अंधकारमय होईल" व चंद्र प्रकाश देणार नाहीं, व तारे आकाशांतून पतन पावतील व आकाशांचीं बळें डळमळतील." —मत्तय अ. २४ ओ. २९.

**समीक्षक**—वाहवारे येशू! तारे पतन पावतात व आकाशांचीं बळें डळमळतात हें ज्ञान कोणत्या विद्येनें त्यानें प्राप्त केलें कोण जाणें. येशूला थोडाबहुत तरी विद्येचा गंध असतां तर अवश्यमेव त्याला ज्ञान झालें असतें कीं, हे तारे सर्व भूगोलांतर्गत आहेत ते पडत नसतात. येशू हा सुताराचा मुलगा असल्याकारणानें लांकडें फोडणें, त्यांची चिरफाड करणें, तोडजोड करणें हाच त्याचा वास्तविक धंदा परंतु लहर आली कीं मी ह्या अडाणी देशांत पैगंबर व्हावें. बस्स, मग काय उशीर? लागला गप्पाष्टकें झोडायला! त्याच्या मुखांतून कित्येक वचनें चांगलीं व बोधप्रदहि निघालेलीं आहेत व पुष्कळशीं असंभवनीय अशीं कांहींतरी आहेत. तेथील लोक जंगली होते, त्यांनीं त्याचें सर्व ह्मणणें ब्रह्मवाक्य मानलें. सांप्रत युरोपादि पाश्चात्य देश ज्याप्रमाणें विद्यासंपन्न उन्नतियुक्त आहेत त्याप्रमाणें पूर्वी असते तर येसूचें सिद्धपण कांहींच त्यांच्यापुढें चालते ना. आतां पाश्चात्यांना ख्रिस्ताचें अगाध ज्ञान कळून चुकलें आहे तथापि व्यवहार व खोटा देशाभिमान वगैरे दुराग्रहांत ते फसले आहेत एवढेंच. पाश्चात्यांनीं हट्टास न पेटतां सर्वथा सत्य अशा वेदमार्गाचा अवलंब करून भौतिक उन्नतिबरोबर आध्यात्मिक उन्नति करावी. आध्यात्मिक उन्नति एवढीच त्यांच्यांत उणीव आहे. ॥ ७९ ॥

८०–आकाश व पृथ्वी नाहींशीं होतील, परंतु माझी वचनें नाहीशी होणार नाहींत.

—मत्तय अ. २४ ओ. ३५

**समीक्षक**—हीहि फिलॉसाफि वरीलप्रमाणेंच अविद्यायुक्त व मूर्खपणाची आहे. आकाश नाहींसें कसें होईल ? जर आकाश अतिसूक्ष्म आहे व तें नेत्रानांहि पाहतां येत नाहीं तर त्याचें डळमळणें कोणाला दिसेल ख्रिस्तःच्या मुखानें स्वतःची बढाई मारणें हें विद्वान शहाण्या मनुष्याचें काम नव्हे ॥ ८० ॥

८१––मग डावीकडल्यांसही तो ह्मणेल, अहो शापग्रस्तहो, सैतान व त्याचे दूत यांसाठीं जो सार्वकालिक अग्नि सिद्ध केला आहे त्यांत माझ्या पुढून जा.

—मत्तय अ. २५ ओ. ४१

**समीक्षक**—आपल्या शिष्यांना स्वर्ग व शिष्येतरांना सार्वकालिक अग्नि ही योजना पक्षपाताची नव्हे काय ? अध्याय २४ मध्यें सांगितल्याप्रमाणें आकाश नाहींसें झाल्यावर सार्वकालिक अग्नि व स्वर्ग हा कोठें राहणार आहे ? सैतान व त्याचे दूत यांना ईश्वरानें निर्माणच केलें नसतें तर सार्वकालिक अग्नीची तरी त्याला यातायात कां करावी लागती ? ज्या ईश्वराला यत्किंचित् सैतानानें भीक घातली नाहीं तो ईश्वर तरी कसला, कारण सर्वसमर्थ ईश्वरानें प्रारंभींच सैतानाला पकडून बन्दीगृहांत ठेवलें असतें तर चाललें नसतें काय ? पण खिस्त्याचा ईश्वर सैतानाला बंदीगृहांत ठेवूं शकला नाहीं, मारूं शकला नाहीं, त्याला उत्पन्नच न होऊं देऊं शकला नाहीं ! या दुष्ट सैतानानें ईश्वराचे प्यारे चिरंजीव खिस्त महाराज यांना ४० दिवस दुःख दिलें तरी पिताजीला सैतानाचा बंदोबस्त करणें शक्य झालें नाहीं. जेथें बापाची ही स्थिति तेथें पुत्राला थोडाच सैतान दाद देणार ! हा बाप ह्मणजे ईश्वर नव्हे व येशूक्रिस्त ह्मणजे ईश्वरपुत्र नव्हे. आणि या सर्वांवरून बायबलोक्त ईश्वर हा परमेश्वर होऊं शकत नाहीं ॥ ८१ ॥

८२––तेव्हां यहूदा इस्कारयोते नांवाच्या बारांतील एकानें मुख्य याजकांकडे जाऊन ह्मटलें, मीं त्याला धरून तुमच्या स्वाधीन केलें तर मला काय द्याल ? त्यांनीं त्याला तीस रुपये तोलून दिले.

—मत्तय अ. २६ ओ. १४।१५

**समीक्षक**—येशूचें सर्व कौशल्य व ईश्वरीयत्व या ठिकाणीं खासें सिद्ध होत आहे तें पहा खिस्ताच्या सहवासांत रात्रंदिन राहात असतांही जर शिष्यसंघातील प्रमुख शिष्य यहूदा पवित्रात्मा बनला नाहीं तर येशूच्या मरणानंतरचे शिष्य किती पवित्रात्मे बनले असतील याचा विचार करा. येशू खिस्तावर अंधपणें विश्वास ठेवणारे लोक किती फसताहेत तेंही पहा. मूर्तीमंत जिवंत असतां ज्यानें आपल्या शिष्यांची सुधारणा व कल्याण केलें नाहीं तो मेल्यावर आपल्या शिष्यांचें काय कल्याण करील तें उघडच आहे. ॥ ८२ ॥

८३—आणि तो भोजन करीत असतां येशूनें भाकर घेऊन व आशीर्वाद देऊन ती मोडिली, आणि शिष्यांस देऊन ह्मटलें, घ्या, खा, हें माझें शरीर आहे. आणि त्यानें प्याला घेतला व उपकारस्तुति करून तो त्यांस दिला, व ह्मटलें सर्व तुह्मी त्यांतील प्या. हें माझें "करारावें रक्त" आहे. —मत्तय अ. २६ ओ. २६।२७।२८

**समीक्षक**—अविद्वान् जंगली मनुष्याशिवाय असा उपदेश कोण करील? खावयाच्या भाकरीला मांस व पेयाला रक्त कोण ह्मणूं शकेल? परंतु सुधारणेच्या कळसास पोंहचल्यावर बाता मारणारे आजकालचे ख्रिस्ती लोक या प्रकाराला 'प्रभुभोजन' संबोधून येशूच्या रक्त मांस सेवनानें ढेंकर देता असतात! जे आपल्या गुरूचें रक्तमांस खाण्यास सोडीत नाहींत ते इतरांचा काय मुलाजा राखतील? ॥ ८३ ॥

८४—मग त्यानें पेत्र व जब्दीचे दोघे पुत्र यांस बरोबर घेतलें आणि तो खिन्न व अति कष्टी होऊं लागला. तेव्हां त्यानें त्यांस ह्मटलें "माझा जीव" मरणप्राय "अति खिन्न" झाला आहे, तुह्मी एथें राहा व माझ्याबरोबर जागृत असा. मग कांहींसा पुढें जाऊन पालथा पडला. आणि त्यानें अशी प्रार्थना केली कीं, हे माझ्या बापा, होईल तर हा प्याला मजवरून टळून जावो.

—मत्तय अ. २६ ओ. ३७।३८।३९

**समीक्षक**—पहा! जर तो साधारण मनुष्य नसता व ईश्वराचा पुत्र असतां व त्रिकालदर्शी, विद्वान् असता तर असल्या हास्यास्पद चेष्टा न करतां. यावरून स्पष्ट कळून येतें कीं, हें वाग्जाल येशूनें किंवा त्याच्या शिष्यांनीं उगाच खोटेंनाटें बनविलें आहे कीं, येशू हा ईश्वर होता, तो त्रिकालज्ञ होता, तो पापांची क्षमा करणारा आहे वगैरे. येशू हा साधारण, अडाणी असा एक मनुष्य होता. तो विद्वान नव्हता, योगी व सिद्धहि नव्हता ॥ ८४ ॥

८५—तो बोलत आहे इतक्यांत, पाहा, बारांतील एक जो यहूदा (Judah) तो आला; आणि त्या संगतीं मुख्य याजक व लोकांचे वडील यांकडला मोठा समुदाय तरवारी व सोटे घेऊन आला. त्याला धरून देणारा यानें त्यांस खूण सांगून ठेविली होती; ती अशी कीं, मी ज्याचें चुंबन घेईन तोच तो आहे, त्याला धरा. लागलेंच त्यानें येशूजवळ येऊन हे गुरू, सलाम, असें ह्मणून त्याचें पुष्कळ चुंबन घेतलें. येशूनें त्याला ह्मटलें, गड्या, ज्या करितां आलास तें कर. तेव्हां त्यांनीं जवळ येऊन येशूवर हात टाकून त्याला धरिलें. यावेळीं त्याचे बाकीचे शिष्य दूर पळाले. देवाचे देऊळ मोडावयास व तीन दिवसांत तें बांधावयास मी समर्थ आहे असें ह्यानें ह्मटलें. तेव्हां प्रमुख याजक उठून त्याला ह्मणाला, तूं कांहींच उत्तर देत नाहींस काय? हे तुझ्याविरुद्ध कशी साक्ष देतात? तथापि येशू उगाच राहिला. त्यावरून प्रमुख याजकानें त्याला ह्मटलें, मी तुला जिवंत देवाची शपथ घालून विचारितों कीं, देवाचा पुत्र ख्रिस्ती तो तूं आहेस कीं नाहींस

हें आम्हांस सांग. येशू त्याला म्हणाला तूं म्हटलेंस तसेंच. आणखी मी तुम्हांस सांगतों,- यापुढें तुम्ही "मनुष्याच्या पुत्राला पराक्रमाच्या उजवीकडे बसलेला व आकाशाच्या मेघांवर बसून येतांना" पाहाल, तेव्हां प्रमुख याजकानें आपलीं वस्त्रें फाडून म्हटलें यानें दुर्भाषण केलें आहे; आम्हांस आणखी साक्षी कशास पाहिजे ? पाहा, आतां तुम्हीं हें दुर्भाषण ऐकिलें आहे. तुम्हांस कसें वाटतें ? त्यांनीं उत्तर दिलें कीं, मरणदंडास पात्र आहे. तेव्हां ते त्याच्या तोंडावर थुंकले, व त्यांनीं त्याला बुक्क्या मारल्या; आणि कोणी त्याला चपडाका मारून बोलले, अरे ख्रिस्ता, आम्हांशीं अंतर्ज्ञानानें बोल; तुला कोणी मारिलें ? इकडे पेत्र तर वाड्यांत बाहेर बसला होता. तेव्हां एक दासी त्याकडे येऊन म्हणाली, तूंही गालीलकर येशूबरोबर होतास. तो सर्वांच्या समोर नाकारून बोलला, तूं जें म्हणतेस तें मला ठाऊक नाहीं. मग तो बाहेर देवडीवर गेल्यावर दुसरीनें त्याला पाहून तेथल्या लोकांस म्हटलें हाही नासोरी येशूबरोबर होता. पुनः तो शपथ वाहून नाकारून बोलला कीं, मी त्या मनुष्याला ओळखीत नाहीं.

—मत्तय अ. २६ ओ. ४७ ते २० व ६१ ते ७२

**समीक्षक**—आतां वाचकांनींच विचार करावा कीं, ज्याला आपल्या अनुयायांच्याठायीं दृढ विश्वास उत्पन्न करता आला नाहीं त्याचें सामर्थ्य व प्रताप कितपत होता तो. आणि अनुयायी तरी किती प्रामाणिक ! वास्तविक त्यांनीं आपल्या गुरुबरोबर प्राण द्यावयाचे तें बाजूस राहून एक लांच खाऊन पकडून देतो तर एक मला येशू हा कोण आहे हें मला मुळींच माहीत नाहीं म्हणतो व खोट्या शपथा वाहतो. बायबलांत वर्णिल्याप्रमाणें येशू ख्रिस्ताच्या अंगीं चमत्कार करून दाखविण्याचें सामर्थ्य नव्हतें असें दिसतें. जर असतें, तर बायबलांत एका ठिकाणीं सांगितलें कीं लूकाचे घरीं त्याच्या पाहुण्यांना मारण्याकरितां कित्येकजण आले होते पण त्यावेळीं ईश्वराच्या दूतानें त्या मारेकऱ्यांचे डोळे अंध बनविले ही गोष्ट असंभवनीय असली तरी तसलाच प्रयोग ईश्वराच्या दूतांनीं आपल्या स्वामी पुत्रास वांचविण्यासाठीं यावेळीं करावयास पाहिजे होता. किंवा ख्रिस्त सामर्थ्यानें तो घडून यावयास पाहिजे होता. परंतु एवढेंही ख्रिस्ताकडून झालें नाहीं ! पण त्याच्या अनुयायांच्या बढाया, कोटिक्रम, लंगडी वकिली इत्यादि ऐकल्यावर हसूं येतें. असे हालहाल होऊन मरण्यापेक्षां समाधि वा दुसऱ्या एखाद्या विहित मार्गानें येशूनें प्राण द्यावयाचा होता पण विद्या व ज्ञान याखेरीज तशी बुद्धि निर्माण कशी होईल ? ॥ ८५ ॥ तोच येशू म्हणतो:—

८६ मला आपल्या बापाजवळ मागतां येत नाहीं, आणि आतां तो मला दूताच्या बारा सैन्यापेक्षां अधिक पाठवून देणार नाहीं असें तुम्हाला वाटतें काय ?

—मत्तय अ. २६ ओ. ७३

**समीक्षक**—अत्यंत आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, बापाच्या बढाया सांगतो, लोकांस धमक्या देतो पण स्वतः मात्र किंकर्तव्यमूढ बनून ' हा प्याला मजवरून टळून

जावी अशीच इच्छा बाळगता. नच टळला तर ईश्वरेच्छा ! देवपुत्र खरा ! याजकांनें विचारलें असतां स्तब्ध राहतो व तूं ह्मणतो तसेंच हें उत्तर देतो. परंतु शपथेवर सांगण्यास तयार होईना कीं, मी ईश्वरपुत्र आहे ! यापूर्वी शेंकडो वेळेस मी ईश्वराचा पुत्र आहे अशा वल्गना येशूखिस्तानें केलेल्या होत्या. ज्यांनी खिस्ताचा छळ करून त्याला मारिलें त्याचेंहि कृत्य दूषित नव्हतें कारण देहांत प्रायश्चित्त देण्याइतका त्याचा भयंकर अपराध नव्हता. परंतु ते देखील तरी जंगली लोकच होते. त्यांना अन्याय समजावा कसा ? जर खिस्तानें मी ईश्वराचा पुत्र आहे असा खोटानाटा उपदेश केला नसता, व त्याच्या शत्रूंनीं त्याचे हालहाल केले नसते तर उत्तमतानांही तें भूषणावहच झालें असतें. परंतु इतकी विद्या, धर्मात्मता व न्यायशीलता कोठून आणावी ? ॥ ८६ ॥

८७ येशु सुभेदाराच्या पुढें उभा राहिला असतां सुभेदारानें त्याला विचारिलें तूं यहुद्यांचा राजा आहेस काय ? येशूनें त्याला ह्मटलें, तूं ह्मणतोस तसेंच. मुख्य याजक व वडील हे त्यावर दोषारोप करीत असतां त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, तेव्हां पिलात त्याला ह्मणाला, हे लोक तुझ्याविरुद्ध किती गोष्टींची साक्ष देतात, हें ऐकत नाहींस काय ? परंतु त्यानें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं. एका शब्दानेंहि नाहीं; यावरून सुभेदाराला फार आश्चर्य वाटलें. पिलातानें त्यांस ह्मटलें, तर खिस्त ह्मटलेल्या येशूचें मीं काय करावें ? सर्व ह्मणाले त्याला वधस्तंभीं द्यावें. तो ह्मणाला, कां ? त्यानें काय वाईट केलें ? ते फारच ओरडतच ह्मणाले, त्याला वधस्तंभीं द्यावें. तेव्हां आपलें कांहींच चालत नाहीं, उलटी अधिकच गडबड होत आहे असें पाहून पिलातानें पाणी घेऊन समुदायासमोर हात धुऊन मी या धार्मिक मनुष्याच्या रक्ताविषयीं निर्दोष आहें. तुमचें तुह्मी पाहा, असें ह्मटलें. सर्व लोकांनीं उत्तर दिलें कीं, त्याचें रक्त आह्मांवर व आमच्या लेंकरांवर असो. तेव्हां त्यानें त्यांकरितां बरब्बाला सोडिलें व येशूला फटके मारून वधस्तंभीं देण्याकरितां सोपून दिलें नंतर सुभेदाराच्या शिपायांनीं येशूला कचेरींत नेलं आणि सगळें पलटण मिळून त्यावर आणिलें. आणि त्यांनीं त्याचीं वस्त्रें काढून त्याच्या अंगांत किरमिजी झगा घातला. व कांट्यांचा मुगुट गुंफून त्याच्या मस्तकीं घातला व त्याच्या उजव्या हातांत वेत दिला, आणि त्याच्यापुढें गुडघे टेंकून हे यहूद्यांच्या राजा, जय जय ! असें ह्मणून त्यांनीं त्याची थट्टा मांडिली. आणि ते त्यावर थुंकले व तो वेत घेऊन त्याच्या मस्तकावर मारूं लागले. मग त्याची थट्टा केल्यावर त्यांनीं त्याच्या अंगांतून तो झगा काढून त्याचीं वस्त्रें त्याच्या अंगांत घातलीं, आणि त्याला वधस्तंभीं देण्याकरितां नेलें.

आणि गुलगुलता नांवाची जागा, ह्मणजे कवटीची जागा, एथें येऊन पोहोंचल्यावर त्यांनीं त्याला "पित्तमिश्रित" द्राक्षारस प्यावयास दिला, परंतु तो चाखून पाहिल्यावर तो पिईना. त्यांनीं त्याच्या दोषारोपाचा लेख त्याच्या डोक्यावर लाविला,

तो असा कीं, हा यहुद्यांचा राजा येशू आहे नंतर त्यांनीं त्याबरोबर दोन लुटारू एक उजवीकडे व डावीकडे असे वधस्तंभीं दिले. आणि जवळून जाणाऱ्यांनीं "डोकीं डोलवीत" त्याची अशी निंदा केली कीं, अरे देऊळ मोडून तीन दिवसांत बांधणाऱ्या तूं आपलें तारण कर, तूं देवाचा पुत्र असलास तर वधस्तंभावरून खालीं ये. तसेंच मुख्य याजकही, शास्त्री व वडील यांसहित थट्टा करीत ह्मणाले कीं, त्यानें दुसऱ्याचें तारण केलें, त्याला आपलें तारण करवत नाहीं; तो इस्राएलाचा राजा आहे, त्यानें आतां वधस्तंभावरून खालीं यावें, ह्मणजे आह्मी त्यावर विश्वास ठेवूं, तो देवावर भरंवसा ठेवितो त्याला तो प्रिय असला तर त्यानें त्याला आतां सोडवावें." कारण मी देवाचा पुत्र आहे असें तो ह्मणाला. जे लुटारू त्याच्या बरोबर वधस्तंभी दिले होते त्यांनींही त्याची तशीच निंदा केली. मग दोन प्रहरापासून तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व देशावर अंधार पडला. आणि सुमारें तिसऱ्या प्रहरीं येशू मोठ्यानें आरोळी मारीत बोलला, "एली, एली, लमा, शबकनी," ह्मणजे "माझ्या देवा, माझ्या देवा, तूं माझा कां त्याग केलास ?" जे तेथें उभे होते त्यांतील कित्येकांनीं हें ऐकून ह्मटलें कीं, तो एलीयाला बोलावितो. त्यांतून एकानें लागलेंच धांवत जाऊन स्पंज घेतलें, आणि "आंबेनें" भरून वेतावर ठेवून, त्याला "प्यावयास दिलें" वरकड ह्मणाले, असूं दे. एलीया त्याला तारायास येतो किंवा नाहीं हें आपण पाहूं. मग येशूनें पुनः मोठ्यानें ओरडून प्राण सोडिला.

—मत्तय अ. २७ ओ. ११ ते १४; २२ ते ३१; ३३, ३४, ३७ ते ५०

**समीक्षक**—त्या दुष्ट लोकांनीं येशू खिस्ताचा जो छळ केला तो सर्वथैव इष्ट असा नसून दूषणास्पद आहे. यामध्यें लोकांचा तर दोष आहेच पण येशू खिस्त हा पूर्ण निर्दोषी होता असें नव्हे. कारण ईश्वर हा कोणाचा बाप नाहीं ना त्याचा कोणी पुत्र आहे. जर तो अमुक एखाद्याचा बाप असेल तर कोणाचा तरी सासरा, मेहुणा, सोयराधायराहि असलाच पाहिजे. याकरितां मुख्य याजकानें विचारतांच खरें खरें उत्तर देणें येशूचें काम होतें. लोकांनीं त्याची निंदा केली ती अयोग्य नव्हती, कारण यंव केलें न त्यंव केलें अशा दर्पोक्ति स्वतः खिस्तानें काढल्या होत्या व त्याचे शिष्य अद्यापिहि काढतात त्या खऱ्या असल्या किंवा असा शूर जो देवाचा एकुलता एक लाडका पुत्र तो असतां तर 'देवा देवा सोडीव' अशा हृदयद्रावक किंकाळ्या न मारतां लोकांनीं ह्मटल्याप्रमाणें वधस्तंभावरून खालीं आला असता व सर्वांना त्यानें आपले शिष्य बनविलें असतें ! आणि ईश्वर जर त्याचा खराखरा बाप असता तर स्वपुत्राचे असे झालेले हे हालहाल त्याला खचित पाहवले नसते ! जर येशू त्रिकालदर्शी असता तर "पित्तमिश्रित द्राक्षारस" चाखून पाहण्याची गरज नव्हती, प्रथम त्याला तो कसा आहे हें कळतें. ईश्वरपुत्राच्या तोंडून, ईश्वरा, तूं माझा कां त्याग केलास

प्रमाणें व मंदिराप्रमाणें दिसतो. कारण यांच्या गोकुळांत पुरुषापेक्षां स्त्रियांचा मान जास्त असतो. ह्याच्याप्रमाणें खुदाच्या घरीं पुरुषापेक्षा स्त्रियांचा मानमरातब बहुत व त्यांवर त्याचें प्रेमहि दांडगे दिसतें, कारण अल्लानें बिबींना स्वर्गात जसें ठेऊन घेतलें आहे तसें पुरुषांना नाहीं ! ! सांगा, खुदाच्या हुकुमाशिवाय त्या स्वर्गात राहूं शकतात काय ? जर हें वर्णन यथार्थ असेल तर खुदा स्त्रीलंपट बनण्याचा सम्भव आहे. ॥ ९ ॥

**१०—आदम को सारे नाम सिखाये फिर फरिश्तों के सामने करके कहा जो तुम सच्चे हो मुझे उनके नाम बताओ ॥ कहा हे आदम ! उनको उनके नाम बता दो तब उसने बता दिये तो खुदाने फरिश्तों से कहाकि क्या मैंने तुमसे नहीं कहा था कि निश्चय मैं पृथिवी और आस्मान की छिपी वस्तुओं को और प्रकट छिपे कर्मों के जानता हूं ॥**

**—मं १ सि १ सू २ आ. २९, ३२॥**

**समीक्षकः**—दूतांना असा धोका देऊन आपली प्रशंसा करून घेणें हे ईश्वराच्या थोरपणाला शोभतें काय ? ही शुद्ध दांभिकता असल्यामुळें तिला कोणीहि विद्वान् किंमत देणार नाहीं किंवा तीबद्दल अभिमान बाळगणार नाहीं. परंतु ईश्वर अशा तऱ्हेनेंच आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित करूं पाहतो काय ? अशा रीतीनें फक्त जंगली लोकच फसतील व त्यामध्येंच असलीं पाखंडे खपूं शकतील ज्ञानी लोकांत त्यांची डाळ शिजणार नाहीं ॥ १० ॥

**११—जब हमने फरिश्तों से कहा कि बाबा आदम को दण्डवत करो देखा सभों ने दण्डवत् किया परंतु शैतान ने न माना और अभिमान किया क्योंकि वो भी एक काफिर था ॥ —मं १ सि २ आ. ३२॥**

**समीक्षक**—यावरून मुसलमानांचा ईश्वर अल्पज्ञ व कमकुवत आहे हें स्पष्ट ठरतें. कारण बाबा आदमला सैतान नमस्कार करणार नाहीं हें जाणूनच त्यानें प्रथमच सैतानाखेरीज सर्वांनीं नमस्कार करावा. म्हणून सांगावयाचें होतें ह्मणजे ऐनवेळीं अशी फजिती झाली नसती ! प्रथम असा मगरूर व दुष्ट सैतान उत्पन्नच कां केला ? बरें, उत्पन्न करूनहि त्याच्यापुढें ईश्वरानें इतकें दीन बनावें हें युक्त नव्हे. ज्यानें ईश्वराचा हुकुम अमान्य केला त्याचें पारिपत्य ह्या कुराणोक्त ईश्वराला कांहीं करतां आलें नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे ! पहा ! जेथें सैतानासारखा एकच काफर मुसलमानाच्या ईश्वराला पुरून उरला तेथें ज्या ठिकाणीं मुसलमानांच्या कथनानुसार कोट्यावधि काफर बसत आहेत त्याठिकाणीं खुद्द मुसलमानांचा ईश्वर येऊन उतरला, तरी त्याला अथवा त्याच्या अनुयायाला कोणीही डरणार नाहीं हें उघड आहे ! ईश्वर कधीं कधीं रोग वाढवतो, फसवितो पण ह्या विद्या त्यानें सैतानापासून शिकल्या असल्या पाहिजेत का

सैतानानें खुदाजवळ. कारण खुदाखेरीज सैतानाचा योग्य सद्गुरु व वस्ताद दुसरा कोण असणार ? ॥ ११ ॥

**१२--हम ने कहा कि जो आदम तू और तेरी जोरू बहिश्त में रहा कर आनन्द में जहां चाहो खाओ परन्तु मत समीप जाओ उस वृक्ष के कि पापी हो जाओगे ॥ शैतान ने उनको डिगाया कि और उनको बहिश्त के आनन्द से खोदिया तब हमने कहा कि उतरो तुम्हारे में कोई परस्पर शत्रु है तुम्हारा ठिकाना पृथिवी है और एक समय तक लाभ है आदम अपने मालिक की कुछ बातें सीखकर पृथिवी पर आगया ॥**

**---मं. १ सि. १ सू. २ आ. ३३।३४।३५॥**

**समीक्षक**--ईश्वराची चंचलता पहा! आतांच आदमाला सहकुटुंब स्वर्गांत राहण्याचा आशीर्वाद दिला व लगेच पुनः अल्पावधींत त्यांची स्वर्गांतून हकालपट्टी केली, पुढें काय होणार याचें यथार्थ ज्ञान ह्या ईश्वराला असतें तर त्यानें अगोदर आशीर्वाद दिलाच नसता! व सैतानालाही त्यानें दंड केला असता. बरें, तो वृक्ष कोणाकरितां त्यानें निर्माण केला होता? स्वतः करितां किंवा दुसऱ्यासाठीं? दुसऱ्याकरितांच असेल तर मग प्रतिबंध करण्याचें कारण काय? ह्यावरून हें सर्व काम ईश्वराचें किंवा ईश्वरीय पुस्तकांचें म्हणून होऊं शकत नाहीं. आदमसाहेब स्वर्गांत होते तोपर्यंत त्यांनीं ईश्वराजवळ राहून कोणकोणत्या विषयांचें ज्ञान प्राप्त केलें व स्वर्गांतून त्यांची पृथ्वीवर रवानगी झाली, पण ती कोणत्या वाहनाद्वारें? स्वर्ग हा एखाद्या पर्वतावर आहे कां आकाशावर? आदमाला व त्याच्या बायकोला स्वर्गांतून उड्डान करतेवेळीं पक्षाप्रमाणें पंख फुटलें होते काय? किंवा वरून भूमीवर आदळून पडले? आदामाचा पुतळा ईश्वरानें ज्याअर्थीं मातीचा तयार केला होता त्याअर्थीं स्वर्गांत माती होती तर? ह्यावरून एवढें कळतें कीं, स्वर्गांत जेवढे म्हणून दूत वगैरे लोक आहेत ते सर्व प्रथम मातीचे तयार केले गेले कारण मातीखेरीज शरीर व त्याचे भाग बनवितां येणार नाहींत व जर शरीरें मातीचीं आहेत तर तीं केव्हांतरी नष्ट व्हावयाचींच! मग अशा स्थितींत स्वर्गीय दूत वगैरे लोक मेले म्हणजे ते कोठें जातात? जर त्यांना मरण नसेल तर जन्महि नसला पाहिजे, परंतु जन्म तेथें मृत्यु आहेच. जर हा निश्चित सिद्धांत आहे तर कुराणांत लिहिलें आहे कीं, स्वर्गांत सर्वकाळ बीबी राहात असतात हें सर्व खोटेंच ठरलें, कारण त्या मेल्याही असतील व ह्या स्वर्गांत जाणारेही सर्व मृत्यु पावत असतील ॥ १२ ॥

**१३--उस दिन से डरो कि जब कोई जीव किसी जीव से भरोसा न रक्खेगा न उसकी सिफारिश स्वीकार कीजावेगी न उससे बदला लिया जावेगा और न वे सहाय पावेंगे ॥ --मं. १ सि. १ सू. २ आ. ४६ ॥**

**समक्षिक**—चालू असलेल्या प्रत्येक दिवसास भिण्याचें कारण नाहीं काय ? वाईट काम करतेवेळीं दररोज भ्यालें पाहिजे, शिफारस जर मान्य करण्यांत येणार नाहीं, तर मग पैगंबराची साक्ष वा वकिली अगर मध्यस्थी यामुळें ईश्वरापासून स्वर्गप्राप्ती करून घेतां येईल ही आशा सफल कशी होणार ? स्वर्गस्थ लोकांचा सहाय्यकर्ता परमेश्वर आहे व नरकस्थ लोकांचा नाहीं ? जर असें आहे तर तो ईश्वर पक्षपाती आहे ॥ १३ ॥

**१४—हमने मूसा को किताब और मोजिजे दिये ॥ हमने उनको कहा कि तुम निन्दित बन्दर होजाओ यह एक भय दिया जो उनके सामने और पीछे थे उनको और शिक्षा ईमानदारों को ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. ६० ।६१॥**

**समीक्षक**—मूसाला जर पुस्तक दिलें होतें तर कुराण हें निरर्थक ठरलें. व त्याला चमत्कार करण्याचें सामर्थ्य दिलें हें बायबल व कुराणांतही सांगितलें आहे, पण तें माननीय ह्मणतां येत नाहीं. कारण तसें असतें तर आतांही खिस्ति मुसलमानांनीं चमत्कार करून दाखविलें असतें, पण ज्याअर्थी त्यांना ते आतां करून दाखवतां येत नाहींत, त्याअर्थी पूर्वीही त्यानीं किंवा त्यांच्या पैगंबरानीं व गुरूनीं करून दाखविले नाहींत. अडाणी लोकांसमक्ष ज्याप्रमाणें आजही पोट भरण्यार्थ जादूगार, गारोडी वगैरे लोक चमत्कार करून दाखवितात त्याप्रमाणें त्या काळच्या जंगली लोकांना वश करण्यासाठीं स्वार्थी लोकांनीं कांहीं कापट्यनीतीचे प्रयोग केले असतील. ईश्वर व त्याचे भक्त आजही विद्यमान आहेत मग त्यांना त्यानें चमत्कार करण्याची शक्ति कां दिली नाहीं ? मुसाला जें पुस्तक दिलें त्यामध्यें घोडचूका आढळून आल्यामुळें महंमदसाहेबांना नवीन ग्रंथ-कुराण-दुरुस्त करून ईश्वरानें दिलें काय ? केवळ भीति दाखविण्याकरितां तुम्ही निंदार्ह वानर व्हाल असा ईश्वरानें धाक दाखविला असेल तरीहि ईश्वर लबाड ठरतो व मनुष्याचा छळ करणारा बनतो. अशा गोष्टी ईश्वराच्या व त्याच्या पुस्तकाच्या होऊं शकत नाहींत. ॥ १४ ॥

**१५—इस तरह खुदा मुर्दोंको जिलाता है और तुम को ॥ अपनी निशानियां दिखलाता है कि तुम समझो ॥**

**—मं. १ सि. १सू. २ आ. ६७॥**

**समीक्षकः**—मुडद्यांना ईश्वर जिवंत करीत होता पण आतां कां करीत नाहीं ? त्यांना आतां जिवंत केल्यावर बिचाऱ्यांना न्यायाच्या दिवसापर्यंत तरी थडग्यांत सडत पडावें लागणार नाहीं ! आजकाल दौरा सुपुर्द आहे काय ? ईश्वराची चिन्हें एवढीच आहेत काय ? पृथ्वि, सूर्य, चंद्र हीं त्याच्या कृतीचीं चिन्हें नाहींत काय ? संपूर्ण सृष्टीमध्यें जीं जीं नानाविध चिन्हें दृग्गोचर होत आहेत ह्यावरून त्या जगच्चालकाचीं सामर्थ्य शक्ति व्यक्त होत नाहीं काय ? ॥ १५ ॥

१६-वे सदैव काल बहिश्त अर्थात् वैकुंठ में वास करनेवाले हैं ॥
—मं १ सि. १ सू. २ आ. ७५॥

**समीक्षकः**—एकहि जीव अनन्त पाप करण्याचें सामर्थ्य बाळगीत नाहीं. अर्थात् त्याला सदैव नरकांत किंवा स्वर्गांत ठेवणें हें अन्यायाचें व अज्ञानाचें काम आहे. जर ईश्वर एखाद्याला सदैव स्वर्गांत अथवा नरकांत ठेवील तर तो ईश्वर अन्यायी व अज्ञानी होय. न्यायदिनी सर्वांचा न्याय होणार असेल तर मनुष्यांचीं पापपुण्यें समसमान असणें उचीत होय; कारण जें कर्म सदैव होत नाहीं त्याचें फल मात्र सदैव अनन्त कसें असूं शकेल ? जर मृत्युत्पत्ति ७।८ हजार वर्षांतील आहे असें प्रतिपादण्यांत येते, तर तिच्या उत्पत्तीपूर्वी ईश्वर स्वस्थ झोंपा घेत पडला होता काय ? आणि न्यायदिनानंतरही तो रिकामटेंकडा बनणार काय ? ह्या सर्व बालिश गोष्टी आहेत. परमेश्वर सदैव असून त्याचीं स्वाभाविक कर्में सदैव वर्तमान आहेत आणि ज्याचीं जशीं पापपुण्यें असतील त्याला तशींच त्याबद्दल फलें मिळणें योग्य असल्यामुळें ईश्वर तशीच फलें देतो म्हणून ही कुराणाची न्यायदानरीति सर्वथैव खोटी आहे ॥ १६ ॥

१७—जब हमने तुमसे प्रतिज्ञा कराई, न वहाना लोहू अपने आपस के और किसी अपने आपस के घरों से न निकालना फिर प्रतिज्ञा की तुमने इसके तुम ही साक्षी हो ॥ फिर तुम वे लोग हो कि अपने आपस को मार डालते हो एक फिरके को आप में से निकाल देते हो ॥
—मं. १ सि. १ सू २ आ. ७७।७८॥

**समीक्षक**—शपथ घेणें व घेण्याला लावणें अल्पज्ञतेचा प्रकार आहे वा सर्वज्ञतेचा ? जर परमेश्वर सर्वज्ञ आहे तर ह्या संसारी मनुष्यासारख्या त्याला भानगडी करण्याचें कांहीं कारण आहे काय ? आपापसांत रक्ताचे पाट न वाहाविणें व स्वधर्मबंधूला त्याच्या गृहांतून हांकून न काढणें अर्थात् भिन्न धर्ममतावलंबी मनुष्याच्या रक्ताचा पाट वहविणें व त्याला त्याच्या स्वगृहांतून पिटाळून काढणें हा मिथ्याभिमान, मूर्खता व पक्षपात नव्हे काय ? अगोदरच परमेश्वराला समजलें नव्हतें काय कीं, हे लोक शपथेचा भंग करतील ? यावरून विदित होतें कीं, मुसलमानांचा खुदा ख्रिस्त्यांच्या आकाशांतील बापाची बरीच साम्यता धारण करितो व हें कुराण स्वतंत्र पुस्तक नसून, थोड्याशा गोष्टी अपवादादाखल सोडल्यास, प्रति बायबलचीच आवृत्ति होय. ॥ १७ ॥

१८—ये वे लोग हैं कि जिन्होंनें आखरतके बदले जिन्दगी यहांकी मोल लेली उनसे पाप कभी हलका न किया जावेगा और न उनको सहायता दी जावेगी ॥ —मं. १ सि. १ सू. २ आ. ७९॥

**समीक्षक**—अशा तऱ्हेच्या ईर्ष्यास्पद व द्वेषमूलक गोष्टी ईश्वरीय होतील काय ? ज्या लोकांचीं पापें हलकी केली जातील अथवा ज्यांना मदत दिली जाईल ते कोणते लोक आहेत ? जर ते पापीजन असतील, तर त्यांच्या पापाबद्दल त्यांना शिक्षा करण्यापूर्वी त्यांचीं पापें हलकीं करणें अन्याय होणार आहे; जर शिक्षा देऊन हलकीं केलीं जातील तर या आयतमध्यें जें वर्णन आहे त्यानांही शिक्षा होऊन त्याचीं पापें हलकीं होऊं शकतात. दंड देऊनही जर पापें जशीचीं तशीं कायम रहातील तर तोही अन्याय होईल. धर्मात्म्याचीं पापें हलकी होतील असें ह्मणण्याचा उद्देश असेल तर त्याचीं पापाचरणेंच मूलतः अगदीं थोडी असतात, ती ईश्वराला आणखी हलकी काय करतां येणार ? हा लेख विद्वानाचा नाहीं. वास्तविक धर्मात्म्यांना सुख व अधर्मात्म्यांना दुःख त्यांच्या कर्मानुसार सदैव देणें हेंच ईश्वराचें कर्तव्य आहे ॥ १८ ॥

**१९ निश्चय हमने मूसा को किताब दी और उसके पीछे हम पैगंबर को लाये और मरियम के पुत्र ईसा को प्रकट मौजिज़े अर्थात् दैवीशक्ति और सामर्थ्य दिये उसके साथ रूहुलकुद्स* के जब तुह्मारे पास उस वस्तु सहित पैगम्बर आया कि जिसको तुह्मारा जी चाहता नही फिर तुमने अभिमान किया एक मत को झुठलाया और एक को मार डालते हो॥**

**—मं. १ सि. १। सु. २ आ. ८०॥**

**समीक्षक**—ज्याअर्थी, कुराण प्रतिपादित आहे कीं, मोश्याला ईश्वरप्रणित ग्रंथ देण्यांत आला त्याअर्थी तोच मुसलमानांनीं मानणें आवश्यक आहे व ज्या ज्या गोष्टी त्यामध्यें दोषार्ह आहेत त्यांही त्यांनीं निमूटपणें कबूल केल्या पाहिजेत. " मौजिजे " अर्थात् दैवीशक्तीबद्दल जें कथन आहे तें सर्वस्वी झूट आहे व भोळ्या मनुष्यांना स्ववश करण्याची ती एक अजब क्लृप्ति आहे. सृष्टिक्रमाविरुद्ध व अविद्याजनक गोष्टी पूर्वी होत असत्या तर आजही त्या ख्रिस्ती मुसलमानांना करून दाखवितां आल्या असत्या पण जर त्या आज अशक्य आहेत तर पूर्वींही त्या तशा होत्या हें निःसंशय आहे ॥ १९ ॥

**२०—और इससे पहिले काफिरो पर विजय चाहते थे जो कुछ पहिचाना था जब उनके पास वह आया झट काफिर होगए काफिरों पर लानत है अल्लाह की ॥ —मं. १ सि. १ सू. २ आ. ८२॥**

**समीक्षक**—तुह्मी जसें अन्य मतावलंबीयांना काफर ह्मणतां तसें तेही तुह्माला काफर ह्मणत नाहींत काय ? आणि त्यांच्या मतानुसार ईश्वरही तुमचा धिःकार करतो मग, मुसलमान बंधुनों, तुह्मीच सांगा यांतील खरा कोण व खोटा कोण आहे तो ? विचारांतीं पाहूं गेल्यास सर्व मतमतांतरामध्यें असत्याचा थोडा बहूत भाग आढळून

* रुहुलकुद्स एका दूताला ह्मणतात. जो सदैव मशिहाबरोबरच रहात होता.

येईल, पण जें सत्य आहे तें मात्र सर्वांमध्यें एकसारखें व सर्वांना समान आहे. धार्मिक कलह, झगडे हीं सर्व मूर्खपणाचीं लक्षणे आहेत ॥ २० ॥

**२१—आनन्द का सन्देशा ईमानदारों को अल्लाह, फरिस्तों पैगम्बरों जिबराईल और मीकाइल का जो शत्रु है अल्लाह भी ऐसे काफिरों का शत्रु है ॥ —मं. १ सि. १ सू. २ आ. ९० ॥**

**समीक्षक**—मुसलमानांचें ह्मणणें असतें कीं, ईश्वर 'लाशरीक' आहे ह्मणजे त्यांमध्यें कोणी भागीदार नाहीं. त्याला आपलें काम पार पाडण्यासाठीं कोणाचें सहाय्य घ्यावें लागत नाहीं. पण येथें पहावें तो फौजेची फौज त्याच्या साहाय्यार्थ त्यानें गोळा केलेली आहे ती कोठून व कशाकरितां आणली ? जो कोणी मनुष्यांचा शत्रु तो ईश्वराचाही शत्रुच काय ? जर असें असेल तर तें ठीक नव्हे, कारण ईश्वर कोणाचाही शत्रु असणेंच शक्य नाहीं ॥ २१ ॥

**२२—और कहो कि क्षमा मांगते है हम क्षमा करेंगे तुह्मारे पाप और अधिक भलाई करनेवालों के ॥ —मं. १ सि. १ सू. २ आ. ९४॥**

**समीक्षक**—ईश्वराचा हा उपदेश सर्वांना पतित बनविणारा आहे कि नाहीं याचा विचार करा. पापाची क्षमा मागितल्यास ती खात्रीपूर्वक मिळते अशी पापी जनांची दृढभावना झाल्यामुळें ते कोणती ह्मणून पापें करण्याचें सोडतील ? पापाची क्षमा करणारा परमेश्वर व हें परमेश्वराचें पुस्तक हे दोघेही अन्यायी होत ! ॥ २२ ॥

**२३—जब मुसानें अपनी कौम के लिये पानी मांगा हमने कहा कि अपना असा ( दंड ) पत्थर पर मार उस में से बारह चश्में बहु निकले ॥ —मं. १ सि. १ सू. २ आ. ९६ ॥**

**समीक्षक**—ह्यापेक्षां असंभवनीय गप्पा दुसऱ्या कोणत्या असूं शकतील काय ? एक बडगा शिळेवर मारतांच त्यांतून बारा झरे उत्पन्न झाले ! कदाचित् शिळा कोरून तीमध्यें पाणी भरलें असेल व बारा छिद्रें तिच्या पृष्ठभागीं पाडून ठेवली असतील. एरवी तर ही गोष्ट शक्य नाहीं ॥ २३ ॥

**२४—और अल्लाह खास करता है जिसको चाहता है साथ दया अपनी के ॥ —मं. १ सि. १ सू. आ. ९७ ॥**

**समीक्षकः**—जो योग्य व प्रमुखपणाला लायक नसेल त्यावरहि तो दया करून त्याला स्वामी बनवितो काय ? अशी स्थिती असेल तर तो खुदा मोठा धांदलबाज आहे ह्मणावयाचा व मग अंगीं गुणसंचय व लायकी आणण्याचें तरी कारण काय ? खुदाच्या मेहरबानीवर कर्मफलें अवलंबून आहेत तर मोठीच अनवस्था उत्पन्न होणार असून कर्मोच्छेदप्रसंग येणारा आहे. ॥ २४ ॥

**२५—ऐसा न हो कि काफिर लोग ईर्ष्या करके तुमको ईमान से फेर देवें क्योंकि उन में से ईमानवालों के बहुत से दोस्त है ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. १०१ ॥**

**समीक्षक**—ईश्वर खरा ! तोच आपल्या कट्टया अनुयायांना चिथवीत आहे कीं, सांभाळा तुमची श्रद्धा काफर लोक डळमळवितील ! असा भित्रा ईश्वर व असे भित्रे इस्लामी लोक जगाला काय ज्ञान देतील ? ईश्वर असा उपदेश करील काय ? ॥२५॥

**२६—तुम जिधर मुंह करो उधर ही मुंह अल्लाह का है ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. १०७॥**

**समीक्षक**—ही गोष्ट खरी आहे, तर मुसलमान लोक प्रार्थनेचे वेळीं काबा मशिदीकडे तोंड कां करितात ? जर म्हणाल कीं तिकडेच मुख करण्याची आम्हांला आज्ञा तर मग वरील आयतमध्यें सांगितलेली काय चेष्टा आहे ? एक आज्ञा खरी व दुसरी खोटी असते काय ? ईश्वराला मुख आहे तर तें एकाच वेळीं सर्व बाजूला असणें शक्य आहे काय ? ही आज्ञा सुसंगत नव्हे ॥ २६ ॥

**२७—जो आसमान और भूमि का उत्पन्न करनेवाला है जब वो कुछ करना चाहता है यह नहीं कि उसको करना पडता है किन्तु उसे कहता है कि हो जा बस हो जाता है ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. १०९ ॥**

**समीक्षक**—ईश्वरानें हुकूम दिला कीं 'हो' पण तो कोणाला दिला व कोणी तो ऐकला ? आणि काय झालें ? कशापासून झालें ? जर सृष्टींपूर्वी ईश्वराशिवाय कांहींच नव्हतें असें बायबल कुराण यांत सांगितलें आहे तर हें जग कशापासून बनविलें ? कोणतेंही कार्य कारणाखेरीज होऊं शकत नाहीं. मग एवढ्या मोठ्या विश्वरूपी कार्याचें उपादान कारण कोणतें ? हा प्रकार शुद्ध पोरकटपणाचा आहे ! ( पूर्वपक्षी ) नव्हे, नव्हे ईश्वरेच्छेनें हें सर्व बनले. ( उत्तरपक्षी ) तुमच्या इच्छेनें एखाद्या माशीचा पाय तरी बनूं शकतो काय ? जर नाहीं तर नुसत्या इच्छेनें हें जग ईश्वरानें उत्पन्न केलें हें कसें ? ( पूर्वपक्षी ) ईश्वर सर्वशक्तिमान् आहे त्याच्या इच्छानुसार तो सर्व कांहीं करतो ( उत्तरपक्षी ) सर्वशक्तिमान ह्याचा अर्थ काय ? ( पूर्वपक्षी ) वाटेल तें करण्याचें सामर्थ्य ( उत्तरपक्षी ) काय ईश्वर दुसरा ईश्वरही निर्माण करूं शकतो ? ( पूर्वपक्षी ) असें होऊं शकत नाहीं. ( उत्तरपक्षी ) याकरितांच परमेश्वर आपल्या दुसऱ्यांच्या गुण, कर्म व स्वभाव यांच्याविरुद्ध कांहींहि करूं शकत नाहीं. जगांतील कोणत्याही वस्तूला बनवावयाचें तर तीन गोष्टींची आवश्यकता असते:—एक बनविणारा उ० कुंभार; दुसरी, भांडें तयार ज्याचें करावयाचें तें साधन-माती. तिसरी गोष्ट, ज्याच्या सहाय्यानें भांडें तयार करावयाचें तें चक्र आदि. याठिकाणीं भांडें बनविण्यापूर्वी ज्याप्रमाणें कुंभार, माती

व चाक हो होती त्याप्रमाणें जग बनविण्यापूर्वी जगताचें कारण प्रकृति व तिचे गुण, कर्म व स्वभाव हे होते, यावरून ही कुराणोक्त फिलॉसाफि असंभवनीय ठरत आहे. ॥ २७ ॥

**२८—जब हमने लोगों के लिये काबे को पवित्र स्थान सुख देनेवाला बनाया तुम नमाज़ के लिये इबराहिम के स्थान को पकडो ॥**

**मं. १ सि. १ सू. २ आ. ११७ ॥**

**समीक्षक**—काबा मशिदीपूर्वी ईश्वरानें पवित्र स्थान एकहि निर्माण केलेलें नव्हतें काय ? जर एकादें बनविलें होतें, तर मग काब्याची जरूर काय ? जर बनविलें नव्हतें तर काबाच्यापूर्वी मुसलमानाचे जे पूर्वज होऊन गेले त्यांच्याकरितां पवित्र स्थान नव्हतेंच काय ? हो, कदाचित् ईश्वराला ह्या गोष्टीचें स्मरण कालांतरानें झालें असेल! २८

**२९—वो कौन मनुष्य है जो इबराहिम के दीन से फिर जावे परन्तु जिसने अपनी जान को मूर्ख बनाया. और निश्चय हमने दुनिया में उसी को पसन्द किया ओर निश्चय आखरतकमें वोहि नेक है ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. १२२ ॥**

**समीक्षक**—इब्राहिमच्यादीन (धर्म) मध्यें जे नाहींत ते सर्व मूर्ख होत हें कसें संभवनीय आहे ? ईश्वरानें इब्राहिमालाच पसंत केलें याचें कारण काय ? धर्मात्मा म्हणून पसंत केलें असेल तर एकटा इब्राहिमच धर्मात्मा होता आणखी कोणीच नव्हते? धर्मात्मा नसतांनाहि पसंत केला असेल तर ईश्वरानें अन्याय केला. होय, धर्मात्मा असून त्याला जर पसंत केलें असेल तर ठीक आहे. कारण धर्मात्मेच ईश्वराला प्रिय असतात. ॥२९॥

**३०—निश्चय हम तेरे मुख को आसमान में फिरता देखते हैं अवश्य हम तुझे उस किबले को फेरेंगे कि पसन्द करे उसको बस अपना मुख मस्जिदुल्हाराम की ओर फेर जहां कहीं तुम हो अपना मुख उसकी ओर फेर लो ॥**

**—मं. १ सि. १ सू. २ आ. १३५ ॥**

**समीक्षक**—मुर्तिपूजेची ही छोटीसी नक्कलच नव्हे काय ? हुबेहुब तीच. ( पूर्वपक्षी ) आम्हीं मुसलमान लोक मूर्तिपूजक नसून मूर्तिभंजक आहों; काबा मशिदीला आम्हीं ईश्वर मानीत नाहींत. ( उत्तरपक्षी ) ज्यांना तुम्ही मूर्तिपूजक समजता, ते त्या मूर्तिला ईश्वर मानीत नाहींत पण त्या साधनाद्वारें ते ईश्वरभक्ति करीत असतात; जर तुम्ही मूर्तिभंजक आहा तर काबा मशिद ही एक मूर्तिच आहे, ती तोडून कां टाकीत नाहीं ? ( पूर्वपक्षी ) वाहवा ! काबा मशीदीकडे तोंड करून नमाज पाडण्याची आम्हांला जशी कुराणाज्ञा आहे तशी मूर्तीद्वारें ईश्वरोपासना करण्याची त्यांना आज्ञा नाहीं म्हणून ते मूर्तिपूजक होत; आम्ही नाहीं. कारण ईश्वराज्ञा पालन करणें आमचें कर्तव्य आहे. ( उत्तरपक्षी ) ज्याप्रमाणें तुम्हाला कुराणामध्यें हुकूम आहे, त्याप्रमाणें त्यांना पुराणांत मूर्तिपूजा करण्यास सांगितलें आहे. तुम्ही जसे कुराणाला ईश्वरीय वचन

मानतां तसें ईश्वराचें अवतार जें व्यास ऋषि त्या व्यासाचीं वचनें ह्मणून पौराणिक लोक पुराणांना ऋषिप्रणित समजतात ! तुमच्यांत व पुराणानुयायी लोकांत मूर्तिपूजक या नात्यानें यत्किंचितहि भिन्नभाव दिसत नाहीं ! उलट तुह्मी बडे मूर्तिपूजक, ते छोटे मुर्तिपूजक एवढाच फार तर फरक ! ज्याप्रमाणें एखाद्या गृहस्थानें घरांत शिरलेलें मांजर हांकून काढण्याचा प्रयत्न करावा तोंच उंटानें त्या घरांत प्रवेश करावा असाच प्रकार महंमदसाहेबांनीं छोटी मूर्तिपूजा तर मुसलमानी मतांतून काढून टाकली, परंतु पहाडसदृश जी काबा मशिद आहे ती सर्व मुसलमानांना पूजनीय ह्मणून इस्लाम धर्मांत प्रविष्ट केली. आतां तुह्मीच सांगा, ही मोठी कां छोटी मूर्तिपूजा आहे ती ? याला उपाय एवढाच कीं, आह्मी वैदिक लोक जसें एकेश्वरोपासक आहों तसें तुह्मीहि वेदानुयायी मूर्तिपूजा आदि अनिष्ट गोष्टींचा त्याग करा ह्मणजेच तुमचें कल्याण होईल अन्यथा नाहीं ! जोपर्यंत तुह्मी ही मूर्तिपूजा सोडली नाहीं, तोपर्यंत दुसऱ्यांच्या छोटया मूर्तिपूजेचें खंडन करते-वेळीं तुह्माला शरम वाटली पाहिजे व स्वतः मूर्तिपूजेच्या बालिश प्रकारापासून दूर राहून पवित्र बनले पाहिजे ॥ ३० ॥

**३१—जो लोग अल्लाह के मार्ग में मारे जाते हैं उनके लिये यह मत कहो कि य मुतक हैं किन्तु वे जीवित हैं॥—मं १ सि. २ सू २ आ. १४४॥**

**समीक्षकः**—ईश्वरीय मार्गामध्यें मरणें मारणें ह्या गोष्टीची काय आवश्यकता आहे ? उघड उघड असें कां सांगत नाहीं कीं, ही आज्ञा फक्त आपला तळीराम शांत करण्यासाठीं सांगितलेली आहे. अशी आशा दाखविली ह्मणजे लोक आपापसांत रक्तपात करतील, विजय मिळवतील, कत्तल करण्यास भिणार नाहींत, लूटमार करून राज्यें मिळवतील, धर्म प्रसार करतील व तद्द्वारें ऐश्वर्य प्राप्त होईल आणि मग विषयानन्द भोगतील. इतक्या गोष्टी साध्य करण्याकरितांच ही विपरीत कल्पना लढविली आहे ! ॥ ३१ ॥

**३२—और यह कि अल्लाह कठोर दुःख देनेवाला है। शैतान के पीछे मत चलो निश्चय वो तुह्मारा प्रत्यक्ष शत्रु है उसके बिना और कुछ नहीं कि बुराई और निर्लज्जता की आज्ञा दे और यह कि तुम कहो अल्लाह पर जो नहीं जानते ॥ —मं. १ सि. २ सू. २ १५३, १५४, १५५॥**

**समीक्षकः**—कठोर दुःखें देणारा दयाळु (?) खुदा पापी व पुण्यात्मे यावर दयाळू आहे कां फक्त मुसलमानांवरच त्याची दया आहे ? ईश्वरन्यायी असल्यामुळें सर्वांवरच तो दया करणारा आहे; पण फक्त मुसलमानांवर असेल, तर तो अन्यायी खुदा आहे. ईश्वर पक्षपात करीत नाहीं. जो धार्मिक त्यावर त्याची दया व अधार्मिकांना तो कठोर दुःखें भोगावयास लावतो. त्याजवळ इस्लाम गैर इस्लाम हा भेद नाहीं सर्वांना भ्रष्ट करणारा सैतान जो मनुष्यमात्राचा शत्रु आहे असा तो शत्रु दयाळु खुदानें उत्पन्नच करा-

साठीं केला? जर ह्मणाल कीं, मनुष्याची परीक्षा पहावी हा खुदाचा हेतु आहे, तर कोण खरा व कोण खोटा आहे हें जाणण्यास खुदा सर्वज्ञ नाहीं काय? ईश्वर सर्वांची बरीं वाईट कर्में जाणतो व कोण फसले याचीही त्याला जाणींव आहे मग सैतानाचें काम काय? मनुष्याला भ्रष्ट करणारा सैतान, पण सैतानाला भ्रष्ट कोणी केलें? ईश्वरानें केलें असें ह्मणाल तर हा असला खुदा ईश्वर नसून सैतानाचा राजा महासैतान होय. जर सैतान आपो-आप भ्रष्ट झाला असेल तर मनुष्यांनाही भ्रष्ट करण्यासाठीं सैतानाची जरूर नाहीं तर कुसंगत व अविद्या यामुळें मनुष्य पतित बनतो ॥ ३२ ॥

**३३—तुम पर मुर्दार लोहू और गोश्त सूअर का हराम है और अल्लाह के विना जिसपर कुछ पुकारा जावे. —म. १ सि. २ सु. २ आ. १५९॥**

**समीक्षकः**—येथें विचारलें पाहिजे कीं, मुर्दा मग तो आपोआप मेलेला किंवा मारलेला समजावयाचा? मरणें व मारणें यामध्यें भेद आहे, पण प्रेतावस्था ह्यामध्यें कांहींच फरक नाहीं हे उघड आहे. डुकराचा निषेध केला पण मनुष्याचें मांस खाण्यास परवानगी आहे असा अर्थ घेणें अनुचित आहे काय? जर उचीत आहे तर काय मनुष्याचें मांस खाण्यास कुराणोक्त अल्लानें परवानगी दिलेली आहे? ही परवानगी योग्य आहे काय? आणखी परमेश्वराचें नांवावर शत्रु आदिकांना अत्यंत दुःख देऊन प्राणहत्या केली तरी चालेल हें सांगणें अल्लालाच शोभतें ईश्वराला नाहीं. ईश्वराला व त्याच्या नांवाला अशा कृतीनें कलंक लागतो! मुसलमानांच्या हातून दारुण दुःखें प्राप्त करण्याएवढा भयंकर अपराध, पूर्वजन्म नाहीं तर, डुकराशिवाय सर्व प्राण्यांनीं केव्हां केला होता? सर्व प्राण्यावर ईश्वराची दया नाहीं फक्त डुकरावरच ती कां? सर्व प्राण्यांना तो पुत्रवत् मानतो ना? ज्यापासून मनुष्यजातीचें अत्यंत हित होतें अशा गायी वगैरेंचे वध करण्यास मुसलमानांना ईश्वरानें सांगितल्यामुळें खुदाच जगताच्या अहितास कारणीभूत व हिंसारूप पापाचा वाटेकरी बनून कलंकित झाला आहे असलीं अमंगल कृत्यें करण्यास सांगणारें तें पुस्तक ईश्वरीय नव्हे व तो ईश्वरहि नव्हे ॥ ३३ ॥

**३४—रोजे की रात तुम्हारे लिये हलाल कीगई कि मदनोत्सव करना अपनी बीबियों से वे तुह्मारे वास्ते पर्दा हैं और तुम उनके लिये पर्दा हो. अल्लाह ने जाना कि तुम चोरी करते हो अर्थात् व्यभिचार बस फिर अल्लाह ने क्षमा किया तुम को बस उनसे मिलो और ढूंढो जो अल्लाह ने तुह्मारे लिये लिख दिया है अर्थात् संतान खाओ पिओ यहांतक कि प्रकट हो तुह्मारे लिये काले तागे से सुपदे तागा वा रात से जब दिन निकले ॥ —मं. १ सि. २ सू. २ आ. १७२॥**

**समीक्षकः**—यावरून एक निश्चित गोष्ट सिद्ध होत आहे; ती ही कीं, जेव्हां मुसलमानी मत प्रचलित झालें असेल किंवा तत्पूर्वी पौराणिक मतानुयायी हिंदूस ' चान्द्रायण-व्रत ' जें एक मासिकव्रत आहे त्याची माहिती मिळवून नंतर हें चान्द्रायण-व्रत मुसलमानीं मतांत सुरू झाले असावें. या व्रतसमयीं मध्यान्हीं चंद्राच्या कला जसजशा कमी जास्त होतात तद्नुसार घांस कमजास्त करावे लागतात व ऐन मध्यदिनीं भोजन करण्यास सांगितलें आहे. पण ही योग्य माहिती झाली न झाल्यामुळें चंद्रदर्शन करून नंतर भोजन करावें हा प्रकार मुसलमानांनींहि रूढ केला. परंतु या व्रतामध्यें स्त्रीसमागमाचा त्याग करावा लागतो हें विशेष असतांना त्या उलट हे अल्लाचे पैगंबर महंमदसाहेब आपल्या अनुयायाला फर्मावितात कीं, भक्तजनहो! व्रतसमयीं तुह्मीं आपल्या स्त्रियांशीं खूब मदनोत्सव करा व रात्रौ पोटभर सपाटून खा !! व्रताचा हा खासा उपयोग!! दिवसभर उपवास करून रात्रीं पोटभर जेवणें सृष्टिक्रमविरुद्ध असल्यामुळें भोजन करावयाचें तें दिवसाचें केलें पाहिजे रात्रीं नाहीं. ॥ ३४ ॥

**३५—अल्लाह के मार्ग में लडो उन से जो तुम से लडते है ॥ मार डालो तुम उनको जहां पाओ ॥ कतल से कुफ्र बुरा है ॥ यहांतक उनसे लडो कि कुफ्र न रहे और होवे दीन अल्लाह का ॥ उन्होनें जितनी जियादती करी तुम पर उतनी ही तुम उन के साथ करो ॥**

**—मं. १ सि. २ सू. २ आ. १७३, १७५, १७६, १७७, १७८, १७९ ॥**

**समीक्षक**—जर कुराणांत मुसलमानांच्या दयाळु ' अल्ला ' ने अशा प्रकारची आज्ञा दिली नसती तर त्यांनीं हिंदु, पारशी, ख्रिस्ती वगैरे गैरइस्लामियांचीं देवालयें उध्वस्त केलीं नसती, इतरांवर त्यांनीं जुलूम केले नसते, आणि निरपराधी गैर मुसलमान जनतेशीं ते मित्रत्वानेंच वागले असते. मुसलमानी मताचें ग्रहण न करणारा ' काफर ' होय व अशा ' काफर ' लोकांची 'कत्तल' करणें हें ' अल्ला ' ला प्रिय असून कत्तलीपेक्षां काफरता हें पाप होय अशीच मुसलमानांची प्रामाणिक समजूत आहे. ती त्यांना यथाशास्त्र, यथान्याय व पुण्यप्रद वाटते. ह्या सर्वांचें मूळ बीज सदर्हू कुराणविहित आज्ञेंत आहे ! !! जो आमच्या धर्मास मानणार नाहीं त्याची आह्मी कत्तल करूं अशी त्यांची प्रतिज्ञा व प्रतिज्ञेनुसार त्यांचें आचरण यांत विसंगत काय आहे ? या चुकीच्या धर्मकल्पनेमुळेंच त्यांनीं अनेक धर्मयुद्धें ( जिहाद ) केली व लढतां लढतां त्यांनीं आपली कित्येक राज्यें नष्ट करून घेतलीं ! चोरीचा बदला चोरी नसल्यामुळें गैरइस्लामी जगतानें मुसलमानांशीं या न्यायानें वागणें ( जशास तसें ) फार अन्याय होईल ह्मणून मुसलमानेतर जनतेनें दुष्टात्मे व सज्जन या सर्वांशीं प्रेमानें वागणेंच श्रेयस्कर आहे. मुसलमानांना असल्या तऱ्हेची राक्षसी आज्ञा देणारा त्यांचा ' अल्ला ' ईश्वर नव्हे. ती पालन करणारे विद्वान् नव्हेत आणि ही आज्ञा ज्या पुस्तकांत आहे तें कुराण ईश्वरोक्त नव्हे. ह्या सर्व गोष्टी स्वार्थी ज्ञानरहित मनुष्यांच्या आहेत. ॥ ३५ ॥

**३६—अल्लाह झगडे को मित्र नहीं रखता ॥ ऐ लोगो जो ईमान लाये हो इसलाम में प्रवेश करो ॥ —मं. १ सि. २ सू. २ आ. १९०।१९३॥**

**समीक्षक**–झगडे, लढाया करणें हें मित्रत्वाचें नव्हे, पण स्वतः आपणच अन्य मतावलंबीयाबरोबर धर्मयुद्धें करण्यास हा मुसलमानी खुदा प्रेरणा करीत आहे व अशा झगडालु मुसलमानांशीं तो मैत्री करीत आहे ! मुसलमानी धर्मांत प्रवेश केल्यानेंच ईश्वर संतुष्ट राहतो तर तो असा मुसलमानांचा पक्षपाती परमेश्वर संपूर्ण जगाच्या परमेश्वराहून खास भिन्न आहे. यावरून मुसलमानांचें कुराण न ईश्वरकृत किंवा त्यांत सांगितलेला खुदा ईश्वर नाहीं हें स्पष्ट दिसून येत आहे ॥ ३६ ॥

**३७—खुदा जिसको चाहे अनन्त रिजक देवे ॥**

**—मं १ सि. २ सू. २ आे. १९७ ॥**

**समीक्षक**—कांहीं अपराध नसतांना उगाच ईश्वर अनंत कालपावेतों ( रिजक ) दन्ड देतो काय ? मग पापपुण्य करण्याचें कारण कोठें राहिलें ? केवळ ईश्वरेच्छेवर सुखदुःख अवलंबून आहे या दृढ समजुतीप्रमाणेंच मुसलमान लोक धर्म विमुख बनून यथेष्टाचार करण्यास प्रवृत्त होतात व कित्येक या कुराणोक्तीवर विश्वास न ठेवतां धर्मात्मे बनतात ॥ ३७ ॥

**३८—प्रश्न करते हैं तुझ से रजस्वला को कह वो अपवित्र है पृथक् रहो ऋतु समय में उनके समीप मत जाओ जबतक कि वे पवित्र न हों जब नहा लेवे उनके पास उस स्थानसे जाओ खुदा नें आज्ञा दी॥ तुम्हारी बीबियां तुह्मारे लिये खेतियां हैं बस जाओ जिस तरहं चाहो अपने खेत में । तुमको अल्लाह लगव ( वेकार व्यर्थ ) शपथ में नहीं पकडता ॥**

**म. १ सि. २ सू. २ आ. २०५,२०६,२०८॥**

**समीक्षक**—रजस्वलेचा स्पर्शही होऊं देऊं नका हें जें सांगितलें आहे तें उत्तम आहे. परन्तु इतर वेळीं वाटेल तेव्हां स्त्री-समागमाची आज्ञा देणें ह्मणजे पुरुषांना विषयासक्त बनविण्यासारखें आहे. व्यर्थ शपथेला ईश्वर मानीत नाहीं तर सर्व लोक व्यर्थ शपथ घेण्यास न कचरतां खोटें बोलतील व शपथेचाही भंग करतील. मग ईश्वर खोट्याचा प्रवर्तक बनेल ॥ ३८ ॥

**३९—वो कौन मनुष्य है जो अल्लाह को उधार देवे अच्छा बस अल्लाह द्विगुण करे उसको उसके वास्ते ॥ मं. १ नि. २ सु. २ आ. २२७॥**

**समीक्षक**—ईश्वराला उधार रकम घेऊन त्याला कर्जखोर बनण्याचें काय प्रयोजन आहे ? ज्यानें संपूर्ण विश्व निर्माण केलें त्याला मनुष्यापासून कर्ज काढणें जरूर पडावें काय ? ईश्वराचा खजिना कोरडा ठणठणींत बनला आहे काय ? व्यापार, हुंडणावळ आदि रोजगारांत फसून त्याचें दिवाळें निघालें ह्मणून त्याला मनुष्यापासून

कर्जाऊ रक्कम घेणें भाग पडलें काय ? दामदुप्पट देण्याची तो कबुलायत करीत आहे यावरून मुसलमानांचा खुदा बडा शेटसावकार दिसतो आहे ! असलीं कामें उत्पन्न थोडें व खर्च फार किंवा दिवाळखोर अगर चैनी लोकांनाच करणें भाग पडतें.* ईश्वराला शोभत नाहीं ॥ ३९ ॥

**४०—उनमेंसे कोई ईमान न लाया और कोई काफिर हुआ जो अल्लाह चाहता न लडते जो चाहता है अल्लाह करता है ॥**

**मं. १ सि. ३ सू. २ आ. २३५॥**

**समीक्षक**—ह्या ज्या लढाया होतात त्या सर्व ईश्वराच्या इच्छेनेंच काय ? जर अधर्म करावासा वाटला तर ईश्वर करूं शकतो तर ? असें असेल तर तो परमेश्वर नव्हे; कारण लढाया करणें हें भल्या मनुष्याचें काम नाहीं मग तें ईश्वराचें कसें असेल ? ॥ ४० ॥

**४१—जो कुछ आसमान और पृथिवी पर है सब उसी के लिये है ॥ चाहे उसकी कुरसी ने आसमान और पृथिवी को समा लिया है ॥**

**मं. १ सि. ३ सू २ आ. २३७ ॥**

**समीक्षक**—जे आकाश भूमींत पदार्थ आहेत ते सर्व जीवांच्याकरितां परमेश्वरानें निर्माण केले आहेत; स्वतःकरितां नव्हेत. कारण तो पूर्ण काम आहे त्याला कशाचीहि अपेक्षा नाहीं. आसमान व पृथ्वि ज्या ईश्वराच्या खुर्चीनें व्यापिली आहे तो ईश्वर एकदेशी आहे ॥ ४१ ॥

**अल्लाह सूर्य्य को पूर्व से लाता है बस तू पश्चिम से लेआ बस जो काफिर हैरान हुआ था निश्चय अल्लाह पापियोंको मार्ग नहि दिखलाता ॥**

**॥ मं. १ सि. ३ स २ आ. २०० ॥**

**समीक्षकः**—अल्लाचें हें अगाध ज्ञान पहा ! पूर्वेकडून पश्चिमेकडे किंवा पश्चिमेकडून पूर्वेकडे सूर्य कधीं येत जात नाहीं. तो आपल्या परिधीमध्येंच भ्रमण करतो. यावरून कुराणोक्त अल्लाला भूगोल वा खगोल यापैकीं एकाही विद्येचें ज्ञान नाहीं हें उघड आहे. काफरांना—पाप्यांना जर मुसलमानांचा खुदा सन्मार्ग दाखवित नाहीं, तर पुण्यवानांनाही असल्या खुदाची मुळींच आवश्यकता नाहीं हें स्पष्ट आहे, कारण पुण्यात्मे सन्मार्गी

* ही जी आयात आहे तिच्या भाष्यावरील टीकेंत लिहिले आहे कीं, एक मनुष्य महंमद साहेबाकडे येऊन त्याना विचारूं लागला कीं, पैगंबर महाराज, ईश्वर कर्ज कां मागत आहेत ? महंमद साहेबांनीं सांगितले कीं, स्वर्गांमध्यें तुमची व्यवस्था करण्यासाठीं ! यावर त्या गृहस्थानें उत्तर दिलें, पैगंबर महाराज, आपण जामीन रहात असाल तर मी कर्ज देतों ! ! महंमद साहेब त्याला जामीन राहिलें ! ! खूब, शाबास, ईश्वरावर भरवसा नव्हता पण त्याच्या दूतावर होता ! ! !

असतातच, वस्तुतः पापी लोकांना सन्मार्गी चालविण्यास ईश्वरानें शक्ति द्यावयास पाहिजे पण मुसलमांच्या खुदाच्या शक्तीबाहेरचें हें काम असल्यामुळें कुराणोक्त ईश्वर या दृष्टीनें निरुपयोगी ठरतो. ॥ ४२ ॥

**४३—कहा चार जनावरों से ले उनकी सूरत पहिचान रख फिर हर पहाडपर उनमें से एक २ टुकडा रख दे फिर उनको बुला दौडते तेरे पास चले आवेंगे. ॥ ॥ मं. १ सि. ३ सु. २ आ. २४२ ॥**

**समीक्षक**—भानुमतीप्रमाणेंच हाही एक खेळ मुसलमानांचा खुदा खेळत आहे म्हणावयाचा ? वाहवा ! खुदाचें खुदापण यामध्येंच राहिलें आहे काय ? मूर्ख लोकच अशा खुदाच्या नादीं लागतील बुद्धिमान जन कदापि न फसतां त्यापासून दूर राहून त्यावर कायमची तिलांजली सोडतील ! असल्या बालचेष्टांनीं ईश्वराचें ईश्वरीयत्व व्यक्त न होतां क्षुद्रपणा मात्र दिसून येतो ॥ ४३ ॥

**४४—जिसको चाहे नीती देता है ॥ —मं.१ सि. ३ सू.२ आ.२५१॥**

**समीक्षक**—याच्या मर्जीनुसार तो वाटेल त्याला नीति देतो व वाटेल त्याला देत नाहीं हें ईश्वराचेंच काम काय ? जो पक्षपात सोडून सर्वांना सदुपदेश—नीति देतो तोच खरा ईश्वर होय; दुसरा नाहीं. ॥ ४४ ॥

**४५— वह कि जिसको चाहेगा क्षम करेगा जिसको चाहे दण्ड देगा क्योंकि वह सब वस्तुपर बलवान है—॥ मं. १ सि. ३ सू. २ आ. २६६ ॥**

**समीक्षक**—क्षमेला पात्र जो आहे त्यावर ती न करणें व जो अपात्र आहे त्यावर क्षमा करणें ही शुद्ध झोटिंग पातशाही नव्हे काय ? जर ईश्वर आपल्या मर्जीनुरूप वाटेल त्यास पापी व पुण्यात्मा बनवितो तर जीव हा केलेल्या पाप पुण्याबद्दल जबाबदार नाहीं, ईश्वरानें त्याला पापी बनविलें म्हणून त्यानें पाप केलें किंवा पुण्यात्मा बनविलें म्हणून त्यानें पुण्य केलें अर्थात् पाप पुण्याचें फल जें दुःख व सुख त्यांचा भोक्ता ईश्वर ठरला हें निःसंशय आहे. ज्याप्रमाणें सेनापतीच्या आज्ञेनें सैन्यानें शत्रूचा पराजय केला किंवा स्वतःचा पाडाव करून घेतला असतां त्याबद्दल जबाबदार सेनापती असतो त्याप्रमाणें पापी व पुण्यात्मे हे ज्याच्या आज्ञेनें निर्माण होतात त्याच्या सर्व कर्मांचें प्रायश्चित ह्या कुराणोक्त अल्लाला ईश्वरानें दिलें पाहिजे ! ॥ ४५ ॥

**४६— कह इससे अच्छी और क्या परहेजगारोंको खबर दूं कि अल्लाह कि और से बाहिश्तें हैं जिनमें नहरें चलती हैं उन्हीं में सदैव रहनेवाली शुद्ध बीबियां हैं अल्लाह की प्रसन्नतासे अल्लाह उनको देखने वाला है साथ बन्दों के ॥ —मं. १ सि. ३ सु. ३ आ. ११ ॥**

**समीक्षक**—वाचकहो ! याला 'स्वर्ग लोक' म्हणावा किंवा 'वेश्यावन' म्हणावें याचा विचार तुह्मीच करा. आणि असा स्वर्ग निर्माण करणारा हा ईश्वर आहे अथवा

कोण आहे हें तुह्मीच सांगा. असले अश्लील प्रकार ज्या पुस्तकांत वर्णिले आहेत तें पुस्तक ईश्वरप्रणीत आहे असा कोणता बुद्धिमान प्रतिपादन करील ? ज्या बीबी स्त्रिया स्वर्गांत रहात आहेत त्यांचा जन्म तेथलाच आहे किंवा इहलोकांत जन्म घेऊन त्या स्वर्गवासी बनल्या आहेत ? जर त्यांचा जन्म येथील असेल तर त्यांना, त्यांच्या यजमानांना सोडून, न्यायदिनापूर्वींच बेहिस्तामध्यें ह्या कुराणोक्त ईश्वरानें अगाऊच कां नेऊन ठेवल्या असतील बरें ? न्यायदिनींच सर्वांचा न्याय केला जाईल अशी दवन्डी ज्यानें पिटविली त्यानें मुद्दाम त्या नियमाचा भंग कां केला ? जर तेथेंच जन्मल्या असतील तर न्यायदिनापर्यंत त्या बिचाऱ्या तेथें निर्वाह कशावर करीत असतील ? त्यांच्याकरितां तेथें, बीबी लोकांच्या निर्वाहार्थ पुरुषहि असतील तर इहलोकांतील मुसलमान पुरुष मेल्यावर त्यांच्यासाठीं खुदानें आणखी एखादी बीबी स्त्रियांची पलटण रिझर्व्ह ठेवली आहे काय ? बीबींनां जसा सर्वकाळ वैकुंठांत निवास करण्याचा परवाना खुदानें दिला तसा पुरुषांना कां दिला नाहीं ? मुसलमानांचा खुदा या सर्व प्रकारावरून अन्यायकारी व बेसमझदार दिसतो. ॥ ४६ ॥

**४७ – निश्चय अल्लाह की ओर से दीन इस्लाम है ॥**

**—मं. १ सि. ३ सु. ३ आ. १६ ॥**

**समीक्षकः**—ईश्वर फक्त मुसलमानांचाच आहे इतरांचा नाहीं ? तेराशें वर्षांपूर्वी ईश्वरीय धर्म नव्हताच कि काय ? कुराण ईश्वरानें बनविलें नसून कोणा एखाद्या पक्षपाती मनुष्यानें तें लिहिलें आहे याला वरील आयत हाच मुख्य पुरावा आहे. ॥४७॥

**४८—प्रत्येक जीव को पूरा दिया जावेगा जो कुछ उसने कमाया और वे न अन्याय किये जावेंगे ॥ कह या अल्लाह तू ही मुल्क का मालिक है जिसको चाहे देता है जिसको चाहे छीनता है जिसको चाहे प्रतिष्ठा देता है जिसको चाहे अप्रतिष्ठा देता है सब कुछ तेरे ही हाथ में है प्रत्येक वस्तु पर तू ही बलवान है ॥ रात को दिन में और दिन को रात में बैठाता है और मृतक को जीवित मे जीवित को मृतक से निकालता है और जिसको चाहे अनन्त अन्न देता है ॥ मुसलमानों को उचित है कि काफिरा को मित्र न बनावें सिवाय मुसलमानों के जो कोई यह करे बस अल्लाह की और से नहीं। कह जो तुम चाहते हो अल्लाह को तो पक्ष करो मेरा अल्लाह चाहेगा तुमको और तुह्मारे पाप को क्षमा करेगा निश्चय करुणामय है ॥ मं. १ सि. ३ सु. आ. २१,२२,२३,२४,२७ ॥**

**समीक्षक**—जर प्रत्येकाला कर्मांचें पुरें पुरें फल देण्यांत येणार आहे तर मग क्षमा कशाबद्दल करण्यांत येणार आहे व क्षमा करण्यांत येईल तर पुरें पुरें फल देण्यांत येणार नाहीं, अन्याय होईल. उत्तमोत्तम कर्में केल्याखेरीज जर राज्यादि सौख्यें देण्यांत

येतील तर तेंही अन्यायाचें होईल. मृताला जिवंत करणें व सजीवाला निर्जीव बनाविणें शक्यच नाहीं. कारण ईश्वरीय व्यवस्था अछेद्य व अभेद्य आहे; तींत बदल ह्मणून कधीं व्हावयाचा नाहीं, मुसलमानी धर्मोचा पक्षपात पहा. जे मुसलमान नाहींत त्यांना काफर ठरविणें, काफरामध्येंही जे सदाचारी, थोर, सज्जन आहेत त्यांच्याशींही मैत्री करण्यास प्रतिबंध करणें व दुराचारी, नीच, दुर्जन मुसलमान आहे त्याला मित्र ह्मणून त्याशीं मैत्री ठेवण्यास फर्माविणें हें ईश्वरीय गुणकर्मस्वभावाविरुद्ध होय ! यावरून हें कुराण, कुराणीय खुदा आणि मुसलमान लोक हे केवळ पक्षपाती, अविद्यासंपन्न ठरत आहेत व ह्मणूनच मुसलमान समाज आडदंड दिसत आहे. महंमदसाहेबांची आणखी एक विचित्र लीला पहा ! तुह्मी माझा पक्ष धरला तर खुदा तुमचा पक्ष धरील व तुमच्या हातून युक्त पापकर्में झालीं तरी त्यांची तो क्षमा करील. यावरून सिद्ध होतें कीं, महंमदसाहेबांचें अंतःकरण शुद्ध नव्हतें ह्मणूनच आपला मतलब साधण्यासाठीं महंमदसाहेबांनीं कुराण बनविलें व बनवून घेतलें असें स्पष्टपणें कळून येत आहे. ॥ ४८ ॥

**४९—जिस समय कहा फरिश्तों ने कि ऐ मर्य्यम तुझ को अल्लाह ने पसन्द किया और पवित्र किया ऊपर जगत् को स्त्रियों के ॥**

**—मं. १ सि. ३ सू. ३ आ. ॥ ३५ ॥**

**समीक्षक**—सांप्रतकाळीं खुदाचे फरिश्ते ( ईश्वरीय दूत ) येत नाहींत आणि खुदाहि कोणाशीं कानगोष्टी करण्यांस येत नाहीं मग ते पूर्वींच कसे येत होते ? जर ह्मणाल कीं पूर्वींचीं मनुष्यें पुण्यवान् होतीं आतांचीं तशीं कोठें आहेत ? हें ह्मणणें सपशेल मिथ्या आहे. उलटपक्षीं ख्रिस्ती मुसलमान मतें ज्या काळीं अस्तित्वांत आलीं त्या काळीं व त्या देशांत जंगली, विद्याहीन मनुष्यांचीच अधिकता होती. याकरितांच असलीं असलीं विद्याविरुद्ध मतमतांतरें त्या देशांत रूढ झाली ! आतांचे काळीं विद्वानांचें संख्याधिक्य असल्यामुळें असल्या मतांचा टिकाव लागत नाहीं पण उलट दिवसेंदिवस अशीं जीं पोचळ धर्ममतें आहेत तीं लयास जात चाललीं आहेत; त्यांची वृद्धि होण्याचें नांवच नको ॥ ४९ ॥

**५०—उसको कहता है कि हो वस हो जाता है। काफिरोंने न धोखा दिया, ईश्वरने धोखा दिया, ईश्वर बहुत मकर करनेवाला है ॥**

**—मं. १ सि, ३ सू. ३ आ. ३९, ४६ ॥**

**समीक्षकः**—मुसलमान लोक ईश्वराशिवाय दुसरें कांहीं मानीतच नाहींत. मग या ठिकाणीं ईश्वरानें कोणत्या वस्तूला ह्मटलें कीं, हो; व ती झाली ? याचें उत्तर सात जन्म घेतले तरी मुसलमानांना देतां येणार नाहीं; कारण उपादानकारक असल्यावांचून कार्य होणें कधींच शक्य नाहीं. कारणाखेरीज कार्य होणें ह्मणजे जणूं काय मातापित्याशिवाय माझें हें शरीर झालें असें ह्मणण्यासारखें आहे. जो धोका देतो अर्थात् छल क

कपट करतो तो ईश्वर तर कदापि होऊं शकत नाहीं पण उत्तम मनुष्यहि असें काम करण्यास धजत नाहीं. ॥ ५० ॥

**५१—क्या तुमको यह बहुत न होगा कि अल्लाह तुमको तीन हजार फरिश्तों के साथ सहाय देवें ॥ —मं. १ सि. ४ सू. ३ आ. ११० ॥**

**समीक्षक**—मुसलमानांना एकाकाळीं 'अल्ला' तीन हजार दूतांचें सैन्य मदतीला पाठवीत होता पण अलीकडे इस्लामी राज्यें बहुतेक नष्ट झालेलीं आहेत व होत आहेत तरी त्यांच्या सहाय्यार्थ तो दुतांची कुमक पाठवीत नाहीं यावरून केवळ मूर्ख लोकांना फसविण्याकरितांच ही अत्यंत अन्याययुक्त कथा रचलेली आहे हें उघड आहे५१

**५२ और काफिरों पर हमको सहाय कर ॥ अल्लाह तुमारा उत्तम सहायक और कारसाज है ॥ जो तुम अल्लाह के मार्ग में मारे जावो वा मर जाओ अल्लाह की दया बहुत अच्छी है ॥**

**मं. १ सि. सू. ३ आ. १३०, १३३, १४० ॥**

**समीक्षक**—आपल्या धर्माहून भिन्न धर्मानुयायांना मारण्यासाठीं मुसलमान लोक ईश्वराची प्रार्थना भाकीत आहेत जणूं काय परमेश्वर एखादा भोळा मनुष्य आहे तो यांची प्रार्थना निमुटपणें ऐकतो ! जर मुसलमानांना जयश्रीची माळ घालणारा त्यांचा खुदा आहे तर मग त्यांचीं राज्यें नष्ट कां झालीं ? मुसलमानी खुदा पक्षांध बनून मुसलमानाचे सहाय्यार्थ धांवणारा असेल तर धर्मात्मे पुरुष यांना तो कधींहि उपासनीय होऊं शकणार नाहीं ॥ ५२ ॥

**५३—और अल्लाह तुमको परोक्षज्ञ नहीं करता परन्तु अपने पैगम्बरों से जिसको चाहे पसन्द करे बस अल्लाह और उसके रसूल के साथ ईमान लावो ॥ मं. १ सि. ४ स. ३ आ. १५२ ॥**

**समीक्षक**—जर मुसलमान लोक परमेश्वराशिवाय कोणावरही श्रद्धा ठेवीत नाहींत किंवा परमेश्वराची बरोबरी करणारा दुसरा कोणीही नाहीं असें मानीत आहेत तर मग पैगंबरसाहेबांवर ईश्वर इतकीच तीव्र निष्ठा ठेवून त्याला—महंमद पैगंबराला त्यांनीं प्रति ईश्वर कां बनवून ठेवलें आहे ? ईश्वरानें पैगंबरावर विश्वास ठेवा असें सांगितलें ह्मणजे पैगंबर ईश्वरतुल्य ठरला मग ईश्वर अद्वितीय आहे हें प्रतिपादण्यांत अर्थ काय ? याचा अर्थ असा समजावयाचा असेल कीं, महंमदसाहेब हे एक ईश्वराचे प्रेषित होते असें माना; तर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, महंमदसाहेबांना पाठविण्यांची ईश्वराला कां आवश्यकता वाटली ? जर पैगंबराखेरीज ईश्वराला स्वकार्य पार पाडतां येत नसतील तर तो ईश्वर असमर्थ ठरला ॥ ५३ ॥

**५४—ऐ ईमानवालो ! संतोष करो परस्पर थामे रक्खो और लडाई में लगे रहो अल्लाह से डरो कि तुम छुटकारा पाओ ॥**

**—मं. १ सि. ४ सू. ३ आ. १७८ ॥**

**समीक्षक**—हा कुराण प्रतिपादित खुदा व त्याचा पैगंबर हे दोघेही लढाईबाज होते. लढाईची आज्ञा जो करतो तो शांततेचा पुरस्कर्ता मुळींच होऊं शकत नाहीं. नाममात्र ईश्वरावर विश्वास ठेवणारा मुक्त होणार ? किंवा अधर्मयुक्त लढाई करण्याचे वेळीं ईश्वराची भीति बाळगा ह्मणणारा मुक्त होणार ? प्रथमपक्षीं भिणें न भिणें सारखेच, द्वितियपक्षीं भ्यावयाचें असलें तर तें ठीक आहे ॥ ५४॥

**५५—ये अल्लाह की हद्द हैं जो अल्लाह और उसके रसुल का कहा मानेगा वह बहिश्त में पहुंचेगा जिनमें नहर चलती हैं और यही बडा प्रयोजन है ॥ जो अल्लाह की और उसके रसुल की आज्ञा भंग करेगा और उसकी हद्दों से बाहर हो जायेगा वह सदैव रहनेवाली आग में जलाया जायगा और उसके लिये खराब करनेवाला दुःख है ॥**

**—मं १ सि. ४ सू. ३ आ. १३, १४ ॥**

**समीक्षक**—ईश्वरानेंच महमम्दसाहेब पैगम्बर बनवून आपणामध्यें समाविष्ठ करून त्यांचा दर्जा स्वतः बरोबरीचा केला आहे व स्वर्गामध्यें देखील आपल्या दूतांला साथीदार मित्र ह्मणून खुदानें ठेवून घेतलें आहे अशा तऱ्हेनें कुराणोक्त खुदा पैगंबराधीन बनला असतांहि मुसलमान लोक त्या खुदाला पूर्ण स्वतंत्र आहे असें समजतात. असल्या परतन्त्र ईश्वराला ' अद्वितीय ' ( लाशरीक ) मानणें व्यर्थ होय. अशा गोष्टी ईश्वरोक्त पुस्तकामध्यें होऊं शकत नाहींत. ॥ ५५ ॥

**५६—और एक त्रसरेणु की बराबर भी अल्लाह अन्याय नही करता और जो भलाई होवें उसका दुगुण करेगा उसको ॥**

**—मं. १ सि. ५ सू ४ आ ३७ ॥**

**समीक्षक**—एक त्रसरेणुदेखील ईश्वर अन्याय करीत नाहीं मग पुण्यवानांना दुप्पट फल कां देतो ? व मुसलमानांचा पक्षपात कां करतो ? वास्तविक दुप्पट वा तिप्पट फल देणें हा ईश्वराचा मोठा अन्याय होय ॥ ५६ ॥

**५७—जब तेरे पास से बाहर निकलते हैं तो तेरे कहने के सिवाय ( विपरीत ) सोचतें हैं अल्लाह उनकी सलाह को लिखता है ॥ अल्लाह ने उनकी कमाई वस्तु के कारण से उनको उलटा किया क्या तुम चाहते हो कि अल्लाह के गुमराह किये हुए को मार्ग पर लाओ बस जिसको अल्लाह गुमराह करे उसको कदापि मार्ग न पावेगा ॥**

**—मं. १ सि. ५ सू. ४ आ. ८०,८७ ॥**

**समीक्षक**—ईश्वर मारवाड्याप्रमाणें जमाखर्चाच्या वह्यासारखा प्रत्येकाच्या कर्मांचा जमाखर्च वहीवर लिहून ठेवीत असेल तर तो सर्वज्ञ आहे तर लिहून ठेवण्याचें कारण काय ? मुसलमान ह्मणत असतात कीं, सैतानानें मनुष्यजातीला पापमार्गीं लावलें

पण वरील आयतमध्यें ईश्वरहि मनुष्याला गुमराह करतो ह्मणजे सन्मार्गांपासून परावृत्त करतो असें ह्मटलें आहे. मग सैतान व परमेश्वर यांत फरक काय राहिला ? हां, भेद आहे तो फक्त इतकाच कीं, ईश्वर हा बडा सैतान व सैतान हा ईश्वराचा कनिष्ठ बंधु !! कारण मुसलमानांची प्रतिज्ञा असते कीं, मनुष्यांना जो सन्मार्गापासून परावृत्त करतो तो सैतान ! त्यांच्या ह्या प्रतिज्ञेप्रमाणें ईश्वरहि सैतान ठरत आहे.

**५८—और अपने हाथों को न रोकें तो उनको पकड लो और जहां पाओ मार डालो ॥ मुसलमान को मुसलमान का मारना योग्य नहीं जो कोई अनजान से मार डाले बस एक गर्द्दन मुसलमान का छोडना है और खून वहां उन लोगों की ओर से हुई जो उस कौम से होवे और तुह्मारे लिये जो दान कर देवे जो दुश्मन की कौम से हैं ॥ और जो कोई मुसलमान को जानकर मार डाले वह सदैव काल दोजख में रहेगा उसपर अल्लाह का क्रोध और लानत है ॥—मं. १ सि. ४ सू. ४ आ. ९०।९१।९२ ॥**

**समीक्षक**—जो मुसलमान नसेल त्याला जेथें पहाल तेथें ठार करा ही घोर अन्यायाची अशी पक्षपातपूर्ण ईश्वरीयाज्ञा पहा !! मुसलमानाला मारूं नका, चुकून मुसलमानांचा वध झाल्यास पश्चात्ताप करा, प्रायश्चित घ्या पण गैरइस्लामीयाला ठार करते वेळीं मात्र मोबदला काय तर ह्मणे स्वर्ग !!! आग लागो असल्या ईश्वरीय ग्रंथाला व त्यांतील आज्ञांना !!! असलीं धर्मपुस्तकें, असले पैगंबर व असला ईश्वर ज्या समाजांत मान्य केला असेल त्या समाजाकडून जगाचें कोटकल्याणच होणार आहे ! बुद्धिमान लोकांनीं अशा तऱ्हेच्या घातकी धर्ममतापासून दोन हात दूरच राहणें बरें ! ह्या असत्य मतांत न फसतां निःपक्षपात व सत्य अशा वेदोक्त मताचा सर्वांनीं स्वीकार करणेंच हितप्रद आहे. मुसलमानांच्या मतें गैरइस्लामीयाला ठार करणें स्वर्गप्राप्तिचें साधन व इतरांच्या मतें मुसलमानांना मारणें पुण्यप्रद अशा स्थितींत कोणाचें मन ग्राह्य मानावें याचा विचार वाचकांनींच करावा. यापेक्षां आर्यांचा मार्ग ह्मणजे श्रेष्ठ व सदाचारी सज्जनांचा जो श्रेष्ठ मार्ग—वेदोक्त मार्ग—ह्याचाच सर्वांनीं निःसंकोचपणें अवलंब करावा व जे अनार्य, दस्यु, दुष्ट इत्यादि ह्मणजे दुराचारी असतील त्यांच्या मार्गांपासून परावृत्त व्हावें हेंच सर्वोत्तम होय ॥ ५८ ॥

**५९—और शिक्षा प्रकट होने के पीछे जिसने रसूल से विरोध किया और मुसलमानों से विरुद्ध पक्ष किया अवश्य हम उसको दोजख में भेजेंगे ॥**

**—मं १ सि. ५ सू. ४ आ. ११३ ॥**

**समीक्षक**—ईश्वर व त्याचा पैगंबर यांच्या पक्षपाती लीला कशा आहेत त्या पहा ! महंमदसाहेबांसारखे लोक पूर्ण समजत होते कीं आह्मी ईश्वराच्या नांवावर ह्या गोष्टी लोकांना उपदेशिल्या नाहींत तर आपलें मत वृद्धिंगत होणार नाहीं,

लूटमार करण्यास सांपडणार नाहीं, चैन करावयास मिळणार नाहीं. यावरून खात्री पटते ती एवढीच कीं, असलें धर्मप्रचारक आपला मतलब सिद्ध करण्यांत पूर्ण तरबेज होते आणि ह्मणूनच अशांची गणना 'अनाप्त' या लोकांत करण्यास हरकत नाहीं. कारण ह्यांच्यासारखे प्रकार आप्त ह्मणजे विद्वान्, जगत्कल्याणेच्छु जनांच्या हातून होणेंच शक्य नाहींत व अशा विद्वान् लोकांपुढें अशांची डाळ शिजणेंही अशक्य आहे।५९।

**६०—जो अल्लाह फरिश्तों किताबों रसूल और कयामत के साथ कुफ्र करे निश्चय वह गुमराह है। निश्चय जो लोग ईमान लाये फिर काफिर हुए फिर २ ईमान लाये पुनः फिर गये और कुफ्र में अधिक ब अल्लाह उनको कभी क्षमा न करेगा और न मार्ग दिखलावेगा ॥**

**—मं. १ सि. ५ सू. ४ आ. १३४।३५ ॥**

**समीक्षक**—वरील वचनावरून ईश्वर स्वयंसमर्थ आहे अशी तुमची अद्याप समजूत आहे काय ? एकदा ईश्वर स्वयं समर्थ आहे असें सांगावें व एकदां त्याबरोबरच त्याचे साथीदार वा सहाय्यक आहेत असें मानावें हें परस्परविरुद्ध कथन नव्हे काय ? तीन वेळा क्षमा केल्यावर मग पुनः ह्मणून क्षमा तो करणार नाहीं ना ? तीन वेळेस नास्तिकता बाळगल्यावर सन्मार्ग दाखवितो नंतर नाहीं. चार चारदा नास्तिकता बाळगल्यावर ती फारच वाढेल अशी त्याला भीति पडली असेल ? ॥ ६० ॥

**६१—निश्चय अल्लाह बुरे लोगों और काफिरों को जमा करेगा दोजख में ॥ निश्चय बुरे लोग धोखा देते हैं अल्लाह को और उनको वह धोखा देता है ॥ ऐ ईमानवालो मुसलमानों को छोड काफिरों को मित्र मत बनावो ॥ मं १० सि. ५ सू. ४ आ. १३८।१४१।१४३॥**

**समीक्षक**—मुसलमान तेवढे झाडून सर्व स्वर्गांत जातील व अन्य लोक नरकांत पडतील याला प्रमाण काय ? वाहवा वाहवा ! जो वाईट लोकांच्या धोक्यांत सांपडतो व अन्य लोकांना धोक्यांत घालतो अशा धोकेबाज ईश्वराला दुरूनच नमस्कार असो; कारण जो धोकेबाज आहे त्यानेंच असल्या ईश्वराशी सख्य करावें व तसल्या ईश्वरानेंही धोकेबाज लोकांवर कृपादृष्टि करावी हें स्वाभाविक आहे. कारणः—

**यादृशी शीतला देवी तादृशः खरवाहनः**

जशास तसा भेटल्यास कार्य सुरळीत असतें, ज्याचा ईश्वरच धोकेबाज त्या ईश्वराचे उपासक धोकेबाज कां नसावेत ? दुष्ट मुसलमानाशीं मित्रत्व इतर श्रेष्ठ महात्मा असा गैरमुस्लिम मनुष्य असला तरी त्याजशीं शत्रुत्व-धोकेबाजी करणें कोणालाही उचित आहे काय ? ॥ ६१ ॥

६२-ऐ लोगो निश्चय तुम्हारे पास सत्य के साथ खुदा की ओरसे पैगंबर आया बस तुम उनपर ईमान लाओ ॥ अल्लाह माबूद अकेला है॥ मं १ सि० ६ सू० ४। आ. १६७।१८।

**समीक्षकः**—पैगंबरावर विश्वास ठेवा असें सांगण्यानें पैगंबर हा विश्वासापुरता तरी ईश्वराचा भागीदार बनला वा नाहीं ? ईश्वर एकदेशी आहे व्यापक नाहीं ह्मणूनच तर त्याला पैगंबराची गरज लागते; असा पैगंबरावलंबी ईश्वर, ईश्वरच कधीं होऊं शकत नाहीं. कोठे ईश्वर सर्वव्यापक आहे ह्मणून लिहावें, केव्हां तो पैगंबरावलंबी आहे असें लिहावें यावरून कुराणरचना ही एका व्यक्तीची नसून अनेकांची आहे हें उघड आहे ॥ ६२ ॥

६३—तुम पर हराम किया गया मूर्दार लोहू, सूअर का मांस जिस पर अल्लाह के बिना कुछ और पढा जावे, गला घोटे, मारे, उपरसे गिर पडे, सींग मारे और दरदका खाया हुआ ॥ मं. २ सि. ६ स १ आ. ३ ॥

**समीक्षक**—फक्त एवढेच पदार्थ हराम आहेत ? मग बाकीचे सर्व पशुपक्षी, किडे आदि मुसलमानाना सेवनीय-हलाल समजावयाचें काय ? असें असेल तर ही मिथ्या कल्पना मनुष्याची आहे ईश्वराची नव्हे ह्मणून हें वचन प्रमाण नव्हे ॥ ६३ ॥

६४—और अल्लाह को अच्छा उधार दो अवश्य मैं तुम्हारी बुराई दूर करूंगा और तुम्हें बहिश्तों में भेजुंगा ॥ मं. २ सि. ६ स. ५ आ. १० ॥

**समीक्षक**—वाहवा ! मुसमानांच्या ईश्वराचें दिवाळें निघालें आहे. जर तो धनवान असता तर तो उधार कां मागतां ? आणि दुष्टांना स्वर्गाची लालूच दाखवून त्यांना त्यांची दुष्ट कृत्यें नष्ट करविण्याचें आश्वासन कां देतां ? यावरून खात्री पटते कीं, ईश्वराच्या नांवावर महमदसाहेबानी आपला मतलब साधून घेतला ॥ ६४ ॥

६५—जिसको चाहता है जिसको चाहे दुःख देता है ॥ जो कुछ किसी को भी न दिया वह तुझें दिया ॥—मं. २ सि. ६ सू. ५ आ. १६।१८

**समीक्षक**—ज्याप्रमाणें वाटेल त्याला सैतान पापी बनवितो त्याप्रमाणें मुसलमानांचा ईश्वरहि सैतानि कामें करितो ! असें असल्यास मुसलमानी खुदा स्वर्ग नरक प्राप्तीचा अधिकारी बनला, कारण तो पापपुण्य करणारा ठरला. जसे सेनापतीच्या आधीन असलेल्या सैन्याच्या बऱ्यावाईट कृत्यांची जबाबदारी सैन्यावर नसून सेनापतीवर असते त्याप्रमाणें जीव हा पराधीन असल्यामुळें त्यास बऱ्यावाईट कर्माचें फल सदर्हू वचनानें न मिळतां तें ईश्वरास मिळावें ॥ ६५ ॥

६६—आज्ञा मानो अल्लाह और आज्ञा मानो रसूलकी ॥

मं. २ सि ७ सू. ५। आ. ८९

समीक्षक—ईश्वराच्या बरोबरीचा मान पैगंबराचा आहे. तरी पुनः मुसलमानांचा खुदा " लाशरीक " ह्मणजे स्वयं समर्थ आहेच ! अशा स्थितींत तो सर्वसमर्थ मानणें व्यर्थ आहे. ॥ ६५ ॥

६७—अल्लाह ने माफ किया जो हो चुका और जो कोई फिर करेगा अल्लाह उससे बदला लेगा ॥ —मं. २ सि. ७ सू ५ आ. ९२ ॥

समीक्षक—केलेल्या पापांची क्षमा करणें ह्मणजे जणूं काय नवीन पापें करण्याची आज्ञा देणें होय, पापवृद्धि करणें होय. पाप क्षमा करण्याची गोष्ट ज्या पुस्तकांत आहे तें न ईश्वरकृत, न एखाद्या विद्वानाचें पण तें पापवर्धक पुस्तक समजावें. करण्यांत येणाऱ्या पापांपासून दूर राखण्यासाठीं एखाद्याला प्रार्थना करणें किंवा संयमनपूर्वक तीं न करणें तीं न होईल अशी खबरदारी घेणे, पश्चात्ताप करणें हें उचित आहे परन्तु त्यांतही केवळ पश्चात्ताप करुन भागत नाहीं कारण नुसता पश्चात्ताप व्यर्थ होय ॥६७॥

६८—और उस मनुष्य से अधिक पापी कौन है जो अल्लाह पर झूट बांध लेता है और कहता है कि मेरी ओर वही की गई परन्तु वही उसकी ओर नहीं की गई और जो कहता है कि मैं भी उतारूंगा कि जैसे अल्लाह उतारता है ॥ —मं. २ सि, ७ स. ६ आ. ९४ ॥

समीक्षक—जेव्हां स्वतः महमद साहेब ह्मणतात की, माझ्यावर ईश्वरापासून एक एक आयात उतरत आली तेव्हां ह्या गोष्टीनें स्पष्ट सिद्ध होतें कीं तत्पर्वी दुसऱ्यावरहि त्या उतरत असल्या पाहिजेत. ह्मणूनच महंमदसाहेबानीं आपल्यावर ईश्वरी आयात उतरत आहेत आपणाला लोकांनीं पैगंबर मानावें असा कावा लढविला असावा व स्वतःची प्रतिष्ठा वाढवून घेतली असावी ॥ ६८ ॥

६९—अवश्य हमने तुम को उत्पन्न किया फिर तुम्हारी सूरतें बनाई, फिर हमने फरिश्तों से कहा कि आदम को सिजदा करो बस उन्होंने सिजदा किया परन्तु शैतान सिजदा करनेवालों में से न हुआ ॥ कहा जब मैंने तुझे आज्ञा दी फिर किसने रोका कि तुने सिजदा न कि, कहा मैं उससे अच्छा हूं तूने मूझको आग से और उसको मिट्टी से उत्पन्न किया ॥ कहा बस उसमें से उतर यह तेरे योग्य नहीं है कि तू उसमें अभिमान करे ॥ कहा उस दिन तक ढील दे कबरों मे से उठाये जावें ॥ कहा निश्चय तू ढील दिये गयों से है ॥ कहा बस इसकी कसम हैं कि तूने मुझ को गुमराह किया अवश्य मैं उनके लिये तेरे सींधे मार्ग पर बैठुंगा ॥ और प्रायः तू उनके धन्यवाद करनेवाला न पावेगा ॥ कहा उससे दुर्दशाके साथ निकल अवश्य जो कोई उनमें से तेरा पक्ष करेगा तुम सब से दोजख को भरूंगा ॥

—म. २ सि. ८ सू. ७ आ. १० ते १७ ॥

**समीक्षक**—आतां लक्षपूर्वक ऐका. ज्याची योग्यता एका चपराशापेक्षां जास्त नाहीं असा यःकश्चित् फरिश्ता ईश्वर व सैतान यांचेमधील झगड्यांत ईश्वराला भ्याला नाहीं किंवा त्याला आपल्या बाजूला वळविण्यास ईश्वर समर्थ झाला नाहीं अथवा त्याचा आत्मा खुदा पवित्र करूं शकला नाहीं; उलट असला शिरजोर व पापी, ईश्वरावरहि मात करणारा जो फरिश्ता त्याला इस्लामी खुदा सोडून देतो आहे! यापेक्षां खुदाची भूल ती कोणती असेल? सैतान सर्वांना बहकावणारा व खुदा सैतानाला बहकाविणारा म्हणून सैतानाचा महासैतान खुदा ठरला हें सिद्ध आहे. कारण खुद्द सैतानच ईश्वराला सांगतो आहे कीं, तूं मला बहकाविलेस यावरून कुराणोक्त ईश्वरांत पवित्रता मुळींच दृग्गोचर होत नाहीं इतकेंच काय पण सर्व पापांचें मूल कारणच खुदा झाला! असला ईश्वर मुसलमानांचाच होऊं शकतो, अन्य श्रेष्ठ विद्वज्जनांचा होऊं शकत नाहीं. शिवाय फरिश्त्याशीं मनुष्यवत् वार्तालाप करणारा देहधारी, अल्पज्ञ, न्यायरहित असा मुसलमानांचा खुदा असल्यामुळें विद्वान् लोक मुसलमानांचा इस्लामधर्म मान्य करीत नाहींत. ॥ ६९ ॥

**७०—निश्चय तुह्मारा मालिक अल्लाह है जिसने आसमानों और पृथिवी को छः दिन में उत्पन्न किया फिर करार पकडा अर्शपर ॥ दीनता से अपने मालिक को पुकारा ॥ —मं. २। सि. ८। सू. ७। आ. ५३।५४ ॥**

**समीक्षक**—जो सहा दिवसांत जगत् बनवितो सातव्या दिनीं अर्श म्हणजे वर आकाशांत सिंहासनावर आराम घेतो तो ईश्वर सर्वशक्तिमान् व सर्वव्यापक कधीं तरी असणे शक्य आहे काय? ह्या प्रकारावरून त्याला ईश्वर मानणेंच चुकीचें आहे. ईश्वर काय बहिरा आहे म्हणून मोठमोठ्यानें त्याला पुकारण्याची जरूर आहे? या सर्व अनीश्वरकृत गोष्टी आहेत. म्हणूनच कुराण हें ईश्वरकृत नव्हे. जर सहा दिवसांत जगत् बनवून सातव्या दिवशीं त्यानें आकाशांत विश्रांति घेतली म्हणजे त्याला थकवा आला कीं काय? व सध्यां तो निद्रास्थ आहे कां जागा आहे? जर जागा असेल तर कांहीं कामधंदा करीत आहे कां मजेनें ऐषआराम करित फिरत आहे? ॥ ७० ॥

**७१—मत फिरो पृथिवीपर झगडा करते ॥**
**—मं. २ सि. ८ सु. ७ आ. ७२ ॥**

**समीक्षक**—उपदेश तर उत्तम आहे परंतु याचे उलट दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं धर्मयुद्धें ( जिहाद ) करा, काफर लोकांची कत्तल करा अशा आज्ञा आहेत, त्यांची वाट काय? यांतील सत्य कोणतें? यावरून असें अनुमान निघतें कीं, महमदसाहेब जेव्हां निर्बल झालें असतील तेव्हां त्यांना हा मार्ग सुचला असावा, भर तारुण्यांत खूप लढाया झगडे केले म्हणून यांत कांहीं तथ्यांश नाहीं.

**७२—बस एक ही बार अपना असा डाल दिया और वह अजगर था प्रत्यक्ष ॥ —मं. २ सि. ९ सू. ७ आ. १०५ ॥**

१२८—नहीं योग्य वास्ते तुम्हारे यह कि दुःख दो रसूल को यह कि निकाह करो बीबियों उसकी के पीछे उसके कभी निश्चय यह है समपि अल्लाह के बडा पाप ॥ निश्चय जो लोग कि दुःख देते हैं अल्लाह को और रसूल उसके को लानत की है उनको अल्लाह ने ॥ और वे लोक कि दुःख देते है मुसलमानों को और मुसलमान औरतों को बिना इसके बुरा किया है उन्होंने बस निश्चय उठाया उन्होंने बोहतान अर्थात् झूठ और प्रत्यक्ष पाप ॥ लानत मारे जहां पाये जावें पकडे जावें कतल किये जावें खूब मारा जाना ॥ ऐ रब हमारे दे उनको द्विगुणा अजाब से और लानत से बडी लानत कर ॥ —मं. ५ सि. २२ सु. ३३ आ. ५०,५४,५५,५८,६५ ॥

समीक्षक—वाः काय पण ईश्वर आपलें ईश्वरत्व धर्मांच्या सहाय्यानें प्रकट करतो आहे ! पैगंबराला कोणी दुःख देऊं नये हें खुदाचें सांगणें योग्य आहे, पण इतरांनाहि पैगंबरानें दुःख देतां कामा नये हेंहि त्याबरोबरच खुदाने सांगावयास नको होतें काय ? कोणी दुःख देण्याचा प्रयत्न केल्यास अल्ला दुःखी होत असेल तर तो ईश्वर नव्हे. फक्त स्वतःला व पैगंबराला दुःख देणारांचा निषेध करणें ह्मणजे आह्मी मात्र सर्वांना वाटेल तसें वागवूं, दुःख देऊं, त्याला कांहीं हरकत नाहीं असाच याचा अर्थ नव्हे काय ? 'आत्मवत् सर्व भूतेषु' या सिद्धांताप्रमाणें सर्वांशीं वागणें हेंच खुदा व पैगंबर यांचें कर्तव्य नव्हे काय ? मुसलमान स्त्रियांना दुःख देणें हें जितकें वाईट तितकेंच मुसलमानेतर स्त्रियांनाहि दुःख देणें हें वाईट आहे. असें नसल्यास तो पक्षपात झाला. संपूर्ण जगतांत हाहाःकार माजविणारे खुदा व नबी हे जसे आहेत, तसे अन्य फारच थोडे लोक निर्दयी असतील. जेथें जेथें गैरइस्लाम लोक सांपडतील तेथें तेथें ते पकडावेत, मारावेत अशी आज्ञा हा खुदा देत आहे. पण हाच न्याय जे मुसलमानेतर जन आहेत त्यांनीं मुसलमानांना लागू केला तर मग कशी स्थिती होईल ? पैगंबरादिकांची हिंसकता बघा. आपणापेक्षां इतरांना दुप्पट दुःखें दे अशी ते ईश्वराची प्रार्थना करीत आहेत यावरून त्यांची पक्षपातता, मतलबसिंधुता, अधार्मिकता व्यक्त होत आहे ह्मणूनच अद्यापिहि मुसलमान लोकांत बहुतेक शेठ लोकांचीच भरणा जगास पहावयास सांपडतो. ज्ञानशून्य मनुष्य पशु कोटींतला असतो असें जें ह्मणतात तें ठीक आहे. ॥ १२८ ॥

१२९—और अल्लाह वह पुरुष है कि भेजता है हवाओं को बस उठाता हैं बादलों को बस हांक लेते हैं तर्फ शहर मुर्दे की बस जीवित किया हमने साथ उसके पृथिवी को पीछे मृत्यु उसकी के इसी प्रकार कबरों में से निकलना है ॥ जिसने उतारा बीच घर सदा रहने के दया

अपनी से नहीं लगती हमको बीच उसके महनत. और नहीं लगती बीच उसके मांदगी ॥ —मं. ५ सि. २२ सू. ३५ अ. ९,३५ ॥

**समीक्षक**—खुदाची फिलॉसाफि मोठी अजब आहे. वायूला पाठवितो व वायु वादळांना उत्पन्न करून त्यांना विखुरतो आणि वाऱ्यानें मुडदे जिवंत करून त्यांना चालवितो. ह्या ईश्वरीय गोष्टी होऊं शकतील काय ? ईश्वराचीं कामें सर्वकाल एक-सारखीच असतात. घरें बनविल्याशिवाय होत नाहींत. जें बनावट असतें तें सदैव राहूं शकत नाहीं. ज्याला शरीर असतें तें परिश्रमावांचूनही दुःखी बनतें व शरीरधारी रोगग्रस्त असा केव्हांतरी बनलाच पाहिजे. स्त्री समागमानें शरीर निरोगी कसें राहील ? मग अनेक स्त्रियांशीं विषयभोग केल्यानें त्या शरीराची किती दुर्दशा होत असेल बरें ? या दृष्टीनें मुसलमानाचें स्वर्गीय वास्तव्य हें देखील दुःखमूलकच होय. ॥ १२९ ॥

**१३०—कसम है कुरान दृढ की निश्चय तू भेजे हुओं से है ॥ उस पर मार्ग सीधे के उतारा है गालिब दयावान् ने ॥**

**—मं. ५ सि. २२ सू. ३६ आ. १,२ ॥**

**समीक्षक**—कुराण ईश्वरलिखित असतें तर तो कुराणाची शपथ कां वहाता ? नबी ईश्वरानें पाठविला असतां, तर तो सुनेवर मोहित झाला असता काय ? कुराणाचे अनुयायीच काय ते सन्मार्गावर आहेत असें ह्मणणे शुद्ध बालिशपणाचें आहे. कारण सन्मार्गामध्यें सत्य मानणें, बोलणें, करणें, निःपक्ष असणें, न्यायाचरण करणें वगैरेंचा समावेश होतो याचें उलट वागणें ह्याच तर कुराणाचा उपदेश, मुसलमानांचा व्यवहार व खुदाचा स्वभाव आहे ! महंमद पैगंबरसाहेब या बाबतींत सर्वोत्तम असते तर ते सर्वांहून अधिक विद्वान् व शुभगुणयुक्त झाले नसते काय ? याकरितां एखादी आई ज्याप्रमाणें आपल्या मुलाला वाईट ह्मणत नाहीं त्याप्रमाणें ही गोष्ट आहे. ॥ १३० ॥

**१३१—और फूंका जावेगा बीच सूर के बस नागहां वह कबरों में से मालिक अपने की दौडेंगे ॥ और गवाही देंगे पांव उनके साथ उस वस्तु के कमाते थे सिवाय इसके नहीं कि आज्ञा उसकी जब चाहे उत्पन्न करना किसी वस्तु का यह कि कहता वास्ते उसके कि हो जा बस हो जाता है ॥ —मं. ५ सि. २३सू. ३६ आ. ४८,६१,७८ ॥**

**समीक्षक**—आतां ह्या ऊटपटांग गोष्टी ऐका; पाय कधीं साक्षी देऊं शकतात ? खुदाशिवाय त्यावेळेस जवळ दुसरे कोण होते कीं त्याला त्यानें आज्ञा दिली ? व कोणी ऐकलें ? व काय बनलें ? जर अन्य कांहीं नव्हतें तर हें खोटें ठरलें व जर होतें तर खुदाशिवाय दुसरें कांहींच नव्हतें व खुदानेंच सर्व कांहीं बनविलें हें असत्य होय॥ १३१॥

**१३२—फिराया जावेगा उसके ऊपर पियाला शराब शुद्ध का ॥ सपेद मजा देनेवाली वास्ते पीने वालों के ॥ समीप उनके बैठी होंगी**

नीचे आंख रखनेवालियां सुन्दर आंखों वालियां ॥ मानों कि ये अण्ड हैं छिपाये हुए ॥ क्या बस हम नहीं मरेंगे ॥ और अवश्य लूत निश्चय पैगंबरों से था ॥ जब कि मुक्ति दी हमने उसको और लोगों उसके को सबको ॥ परन्तु एक बुढिया पीछे रहनेवालों में है ॥ फिर मारा हमने औरों के ॥-मं.६सि.२३सू.३७आ.४३,४४,४६,४७,५६,१२६ते १२९ ॥

समीक्षक-काय हो महाराज ? येथील मुसलमान लोक दारूला त्याज्य समजतात, परंतु इस्लामी स्वर्गांत तर दारूच्या नद्या वहात आहेत असें आपला खुदा सांगतो. स्वर्गांत कांहीं असो. पण या भूलोकीं तरी मुसलमानांना मद्यपान निषिद्ध होय अशी आज्ञा दिली हें ठीक केलें मग भूलोकाऐवजी स्वर्ग आणखी कां खराब असेना ! स्त्रियांच्या वास्तव्यानें स्वर्गांत कोणाचेंहि चित्त स्थिर राहत नसेल नाहीं ? व त्यापासून मोठमोठ्या रोगाचें स्वर्ग हा माहेर घर बनत असेल ? तेथें शरीरधारी लोक असतील तर ते मरतही असतील व शरीरधारी नसतील तर मग सुंदर स्त्रिया कोणासाठीं व भोग-विलास तरी कसले ? अशा स्थितींत स्वर्गवास व्यर्थच म्हणावयाचा. जर लूत हा पैगंबर असेल तर बायबलामध्यें वर्णिलें आहे कीं, त्यानें स्वकन्यांशीं समागम करून दोन मुलें उत्पन्न केली, हें वर्णनहि तुम्ही सत्य मानतां किंवा नाहीं ? जर सत्य म्हणत असाल तर अशांला पैगंबर मानणें व्यर्थ होय आणि अशा लोकांनांही खुदा मुक्ति देत असेल तर तो खुदाहि तसलाच असावा. म्हाताऱ्यांच्या गोष्टी सांगणारा व पक्षपात धरून दुसऱ्यांना मारणारा खुदा कदापि ईश्वर होऊं शकत नाहीं. असला खुदा मुसलमानांचेंच घरें शोभिवंत करो. ॥ १३२ ॥

१३३ बहिश्तें ये सदा रहने की खुले हुए हैं दर उनके वास्त उनके ॥ ताकिये किये हुए बीच उनको मंगावेंगे बीच इसके मेवे और पीने की वस्तु ॥ और समीप होंगी उनके नीचे रखनेवालियां दृष्टी और दूसरों से समायु ॥ बस सिजदा किया फरिश्तों ने सब ने ॥ परन्तु शैतान ने न माना अभिमान किया और था काफिरों से ॥ ऐ शैतान किस वस्तु ने रोका तुझ को यह कि सिजदा करे वास्ते उस वस्तु के बनायां मैंने साथ दोनों हाथ अपने के क्यों अभिमान किया तूने वा था बडे अधिकार वालों से ॥ कहा कि मैं अच्छा हूं उस वस्तु से उत्पन्न किया तूने मुझको आग से उसको मट्टी से ॥ कहा बस निकल इन आसमानों से बस निश्चय तू चलाया गया है ॥ निश्चय ऊपर तेरे लानत है मेरी दिन जज़ा तक ॥ कहा ऐ मालिक मेरे ढील दे उस दिन तक कि उठावे जावेंगे मुर्दे ॥ कहा कि बस निश्चय तू ढील दिये गयों से है ॥ उस दिन समय ज्ञात तक ॥ कहा कि बस कसम है प्रतिष्ठा तेरी कि अवश्य गुमराह करूंगा उनको मैं इकट्ठे ॥ —मं. ६ सि. २३ सु. ३८ आ. ४३,४४,४५ ६३ ते ७२ ॥

८. मौल्विक— कुराणांत वर्णन केल्याप्रमाणें बागबगीचे, नद्या व इमारती खरो खरच असतील तर या सर्वांचा नाश केव्हांतरी होईलच कारण जे जे पदार्थ संयोगमूलक आहेत ते ते संयोगापूर्वी अस्तित्वांत नव्हेत अर्थात् ज्यांना आरंभ त्यांना शेवट या न्यायानें ते सर्व नाश पावतील, अशा रीतीनें स्वर्गच नामशेष बनल्यावर स्वर्गस्थ लोक तरी शिल्लक कोठें राहिले ? कुराण ह्मणते कीं, स्वर्गांत गादी, तक्के, मेवे, पेयें वगैरेंची रेलचेल आहे असें ह्मणण्याचें कारण एवढेंच कीं, अरबस्थानवासी जन निर्धन होते हे श्रीमंती चोचले त्यांना उपभोगण्यास कठीण होतें ह्मणून यांची लालूच दाखवून स्वमतात त्यांना फसवून टाकलें आहे, जेथें स्त्रिया आहेत तेथें निरंतर सौख्य कसें वास करील ? आणि त्या स्त्रिया तेथें कोठून आल्या ? त्या प्रारंभापासून स्वर्गवासी आहेत काय ? नसतील तर त्या पुनः केव्हांतरी स्वस्थानीं जाणारच. त्या स्वर्गांतीलच असतील तर न्यायदीनापूर्वी त्या काय करीत होत्या ? केवळ मौजेनें तर त्यांनीं आपल्या आयुष्याचा व्यय केला नाहीं ना ! आतां आणखी गंमत आहे ती पहा. खुदाच्या तेजस्वीतेला देखून सर्व दूतांनीं त्याला वंदन केलें व आदामलाहि सर्वांनीं नमस्कार केला परंतु सैतान मात्र तसाच निर्भयपणें उभा राहिला तेव्हां खुदा रागावला व सैतानाला ह्मणाला, सैताना ! तूं गर्व बाळगूं नको कारण मी तुला माझ्या दोन्हीं हातांनीं निर्माण केलें आहे. यावरून पुष्कळ गोष्टी सिद्ध होतात पण शिवाय हेंहि कळून येतें कीं खुदाला दोन हात आहेत. असा दोन हाताचा मनुष्य ह्मणे सर्व व्यापक व सर्व शक्तिमान असा जगन्नियंता परमेश्वर होता ! सैतानानें ठीक उत्तर दिलें कीं मी आदामाहून श्रेष्ठ आहे. या उत्तराला खुदाला राग कां यावा ? आसमान हें खुदाचें घर आहे काय ? पृथ्वि नाहीं ? मग ‘ काबा ’ हें खुदाचें घर होय असें प्रथम कां सांगितलें ? ईश्वर स्वतः पासून व सृष्टिपासून अलग कसा राहूं शकतो ? ही सृष्टि परमेश्वराची आहे. स्वर्गाचा मक्तेदार असा कुराणाचा खुदा बनला आहे. खुदानें सैतानाचा धिःकार करून त्याला कैद केलें मग सैतान ह्मणाला, स्वामिन्, मला न्यायदिनापर्यंत आपण कृपा करून मुक्त करा. खुदानें त्याला मुक्त केलें. मुक्त होतांच सैतान खुदाला ह्मणाला, मी आतां सर्व लोकांना भ्रष्ट करीन, ठिकठिकाणीं बंडें करीन. खुदानें सांगितलें कीं, तूं असें करशील व जे तुझ्या उपदेशानें भ्रष्ट बनतील त्यांना मी ‘ नरकां ’ त टाकीन व तुलाही ! सज्जनांनीं विचार करावा कीं, सैतान हा स्वतःच पतित झाला किंवा त्याला पतित केला ? जर त्याला पतित केलें असेल तर पतित करणारा जो खुदा तोच महान् सैतान नव्हे काय ? सैतान स्वतःच पतित झाला असेल तर सर्व जीव स्वयंकृतीनेंच पतित बनतात, त्याला सैतान पाहिजे कशाला ? सैतानाला मुक्त करून त्याला लोकांना भ्रष्ट करण्यास सोडलें ह्मणजे सैतानाच्या या निंद्य कामाची वांटेकरी खुदाहि बनला. चोरी करण्यास चोराला उत्तेजन देऊन पुनः चौर्यकर्माबद्दल शिक्षा करणारा जो आहे त्याच्या अन्यायाला कांहीं पारावार आहे काय ? ॥ १३३ ॥

१३४—अल्लाह क्षमा करता है पाप सारे निश्चय वह है क्षमा करनेवाला दयालु ॥ और पृथिवी सारी मूठी में है उसकी दिन कयामत के और आसमान लपेटे हुए हैं बीच दाहने हाथ उसके के ॥ और चमक जावेगी पृथिवी साथ प्रकाश मालिक अपने के और रक्खे जावेंगे कर्म पत्र और लाया जावेगा पैगंबरों को और गवाहों को और फैसल किया जावेगा ॥ —मं. ६ सि. २४ सू. ३९ आ. ५४,६८,७० ॥

**समीक्षक**—सर्व पापांची परमेश्वर क्षमा करित असतां तर समग्र जग पापी बनविण्यास ईश्वरच जबाबदार बनला असतां व निष्ठुरहि बनला असता, कारण दुष्टां-वर दया करून त्याला क्षमा करणें ह्मणजे त्याला अधिक दुष्टता करण्यास उत्तेजन देण्यासारखें व अनेक सज्जनांना त्याकरवीं दुःखें देण्यासारखे अन्याय कृत्य होय. परमेश्वर ह्मणजे अग्निवत् प्रकाश आहे काय ? सर्वांच्या कर्मांची नोंद बुकें त्यानें कोठल्या रेकार्डांत सांठवून ठेवली आहेत ? व कोण कोण तीं लिहिण्याच्या कामावर नेमलीं आहेत ? पैगंबराच्या व साक्षीदारांच्या भरंवशावर खुदा न्याय करतो तर तो अल्पज्ञ व असमर्थ नव्हे काय ? जर तो अन्याय न करितां न्याय करतो तर प्रत्येकाच्या यथावत् कर्माप्रमाणें करीत असेल व तीं कर्मे पूर्वापर वर्तमान जन्मांचींच असणार, मग क्षमा करणें, अंतःकरणावर मोहरा करणें शिक्षा न करणें, सैतानाद्वारें भ्रष्टता करणें, इहलोकांतून परलोकांत, परलोकाहून अन्य. लोकलोकांतरांत भ्रमण करणें ( दौरासुपुर्द रखना ) ह्या सर्व गोष्टी ह्मणजे केवळ मजेच्याच काय ? ॥ १३४ ॥

१३५—उतारना किताब का अल्लाह गालिब जाननेवाले की ओर से है ॥ क्षमा करनेवाला पापों का और स्वीकार करनेवाला तोबाः का ॥

—मं. ६ सि. २४ सु. ४० आ. १,२ ॥

**समीक्षक**—ही थाप एवढ्याचसाठीं देण्यांत आली आहे कीं, जे भोळेभाळे लोक असतील त्यांनीं कुराणावर विश्वास ठेवावा. वास्तविक कुराणांत थोडासा सत्य भाग सोडल्यास बाकी असत्यानेंच तें भरलेलें आहे व थोडेसें सत्य आहे तेंही असत्यांत बेमालूम मिश्र झाल्यामुळें टाकाऊ बनलें आहे. याकरितां कुराण, कुराणाचा खुदा व कुराणानुयायी पाप वृद्धि करणारे व करविणारे होत. कारण पापाची क्षमा करणें हा अत्यंत अधर्म आहे, परंतु ह्या कुराण वचनाप्रमाणें मुसलमान लोक निर्भयपणें पापें कर-ण्यास व उपद्रव देण्यास मुळींच कचरत नाहींत ॥ १३५ ॥

१३६—बस नियत किया उसको सात आसमा बीच दो दिन के और डाल दिया हमने बीच उसके काम उसका ॥ यहांतक कि जब जावेंगे उसके पास साक्षी देंगे ऊपर उनके कान उनके और आंखे उनकी और चमडे उनके उनके कर्म से ॥ और कहेंगे वास्ते चमडे अपने के क्या

साक्षी दी तूने ऊपर हमारे कहेंगे कि बुलाया है हमको अल्लाह ने जिसने बुलाया हर वस्तु को ॥ अवश्य जिलाने वाला है मुर्दों को ॥

—मं ६ सि. २४ सू ४१ आ. १२,२०,२१,३९ ॥

**समीक्षक**—शाबास, वाहवा, मुसलमानानों ! तुह्मी आपल्या खुदाला सर्व शक्तिमान मानतां पण त्याला सात आस्मान निर्माण करण्यास दोन दिवस एकसारखे कावाडकष्ट करावे लागले तें कां? कान, डोळे, कातडीं ही सर्व जड अशी ईश्वरानें निर्माण केली आहेत तीं साक्ष देण्याचें काम कसें काय करतील ? साक्ष देणारी ती असती तर त्यांना त्यानें जड कां बनविली ? व आपल्या पूर्वापार नियमाविरुद्ध त्यानें हें कृत्य कसें केलें ? यापेक्षां आश्चर्यजनक मिथ्यावाद असा कीं, जेव्हां जीवाविषयीं साक्ष देतील तेव्हां जीव आपापल्या कातड्यांना विचारूं लागतील कीं तुह्मी आमच्याविषयीं साक्ष कां दिली ? ! ! ! कातडें ह्मणेल, खुदानें देवविली मी काय करूं ? वाच रहो ! हें संभवनीय आहे काय ? एखाद्यानें ह्मणावें कीं, मी आज वंध्यापुत्रमुखदर्शन केलें त्यांतलाच हा प्रकार ! जर पुत्र आहे तर ती वंध्या कशी ? वंध्या असल्यास तिला पुत्र कसा झाला ? जसे वंध्या पुत्रत्व असंभवनीय तसें कातड्यानें साक्ष देणें असंभवनीय होय. जर मुडद्यांना खुदा जिवंत करतो तर त्यांना प्रथम मारलेंच कां ? स्वतः खुदाचा मुडदा कधींतरी पडतो काय ? जर नाहीं तर मृतावस्थेला तो वाईट कां समजतो ? व न्यायदिनापर्यंत मृतकजीव कोणत्या मुसलमानांच्या घरांत राहतात ? खुदानें विनाकारण जीवांच्या मागें ' पुनरपिजननं पुनरपि मरणम् ' चे हें रहाटगाडगें ( दौरासुपर्द ) कां लावलें ? त्यांचा शीघ्र न्याय कां केला नाहीं ? असलीं कृत्यें ह्मणजे ईश्वराला कालिमा होत. ॥ १३६ ॥

**१३७—वास्ते उसकें कुंजियां है आसमानों की और पृथिवी को खोलता है भोजन जिसके वास्ते चाहता तंग करता है ॥ उत्पन्न करता है जो कुछ चाहता है और देता है जिसको चाहे बेटियां और देता है जिसको चाहे बेटे ॥ वा मिला देता है उनको बेटे और बेटियां और कर देता है जिसको चाहे वांझ ॥ और नहीं है शक्ति किसी आदमी की क्योंकी बात करे उससे अल्लाह परन्तु जी मे डालने कर वा पीछे पर्दे***

* ह्या आयतवरील " तफसीरहुसेनी " च्या भाष्यामध्यें सांगितलें आहे कीं, महंमदसाहेब दोन पडद्या आड होते व तेथून त्यांनीं खुदाचा आवाज ऐकला. एक पडदा जरीचा व दुसरा शुभ्र मोत्यांचा होता आणि ह्या दोन पडद्यांतील अंतर ७० वर्षे चालण्यास पुरेल इतकें होतें. बुद्धिमान लोकांनींच ह्या गोष्टीचा विचार करून ठरवावें कीं, तो खुदा होता किंवा पडदाशीन स्त्री होती ? मुसलमानांनीं खुदाची दुर्दशा करून टाकली आहे. वेद, उपनिषदांमध्यें वर्णिलेला परमात्मा कोणीकडे व पडद्याआड राहून संभाषण करणारा कुराणवर्णित खुदा कोणीकडे. खरी गोष्ट हीच कीं, अरब निवासी लोक अज्ञाणी होतें त्यांना उत्तमोत्तम ईश्वररूपाचें ज्ञान कोठून असेल ?

**के से सेवा भेजे फरिश्ते पैगाक लानेवाला ॥**

**—मं. ६ सि. २५ सू ४२ आ. १०,४७,४८, ४९ ॥**

**समीक्षकः—** खुदाचे जवळ किल्ल्यांचीं घरेंची घरें भरलेलीं असतील कारण सर्व ठिकाणचीं कुलुपें त्याला उघडावीं लागत असतील ! लहरीप्रमाणें वाटेल त्याला पापपुण्यें न करतांहि ऐश्वर्यसंपन्न बनविणें वाटेल त्याला त्रास देणें ही बालिशपणाची गोष्ट असून घोर अन्यायाची गोष्ट आहे. कुराणकर्त्यांची चतुराई आतां कशी आहे ती पहा. तो काय वाटेल तें करूं शकतो मग दुसरा खुदाहि तो उत्पन्न करूं शकत असेल ? जर नसेल तर त्याच्या सर्व शक्तिमत्तेला ओहटी लागली असें समजावयाचें काय ? मनुष्यांना तो आपल्या इच्छेप्रमाणें कन्या पुत्र देतो पण कोंबड्या, मासे, डुकरे आदिकांना खंडोगणती पिलें होतात तीं कोण देतो ? आणि स्त्रीपुरुष समागमविना कां देत नाहीं ? आणि एखादीला वांझ बनवून दुःखित कां टेवतो ? वाः काय खुदाचें तेज, त्याचे पुढें कोणी भाषणहि करूं शकत नाहीं ! हें सत्य असल्यास, देवदूत पैगंबर वगैरेचीं ईश्वराबरोबर संभाषणें झाली, खुदा त्यांच्याशीं असें असें बोलला वगैरे ज्या गप्पा ठिकठिकाणीं बायबल कुराणांत लेखकांनीं मारल्या आहेत त्या केवळ आपला मतलब साधण्यासाठीं नसतील कशावरून ? जर कोणी म्हणेल कीं, खुदा सर्वज्ञ सर्वव्यापक आहे तर त्याचें उत्तर असें कीं, मग पडद्याआडून गोष्टी करणें, पोष्ट ऑफिसाप्रमाणें बातम्या मागविणें, दूताकडून जगांतील घडामोडीचें ज्ञान मिळविणें व्यर्थ होय. कुराणाप्रमाणें ईश्वर सर्वज्ञ व सर्वव्यापक नसून तो एक चलाखी करणारा कोणीतरी मनुष्य दिसतो म्हणून कुराण हें ईश्वरप्रणित नाहीं. ॥ १३७ ॥

**१३८—और जब आया इस साथ प्रमाण प्रत्यक्ष के ॥**

**—मं. ६ सि. २५ सू. ४३ आ. ६३**

**समीक्षक—** जर येशू ख्रिस्ताची रवानगी खुदानेंच केली होती तर ख्रिस्तोपदेशाविरुद्ध कुराण खुदानें कां बनविलें ? कुराणाविरुद्ध बायबल व बायबलाविरुद्ध कुराण आहे म्हणून यापैकीं एकहि ईश्वरकृत नव्हे. ॥ १३८ ॥

**१३९—पकडो उसको बस घसीटो उसको बीचों बीच दोजख के ॥ इसी प्रकार रहेंगे और ब्याह देंगे उनको साथ गोरियों अच्छी आंखवालियों के ॥**

**मं. ६ सि. २५ सू. ४४ आ. ४४,५१ ॥**

**समीक्षक—** वाः खुदा न्यायी असूनहि तो प्राण्यांना पकडतो व ओढतो. जो असा खुदा आहे त्या खुदाचे उपासक जे मुसलमान लोक तेहि जर अनाथ निर्बल अशांना पकडून ओढूं लागले तर त्यांत आश्चर्य कसलें ? तो संसारी मनुष्याप्रमाणें विवाह देखील लावतो म्हणजे जणूं काय तो मुसलमानांचा पुरोहितच आहे. ॥ १३९ ॥

१४०—बस जब तुम मिलो उन लोगों से कि काफिर हुए बस मारो गर्दन उनकी यहांतक कि जब चूर कर दो उनको बस दृढ करो कैद करना और बहुत बस्तियां हैं कि वे बहुत कठिन थीं शक्ति में बस्ति तेरी से जिसने निकाल दिया तुझ को मारा हमने उसको बस न कोई हुआ सहाय देनेवाला उनका ॥ तारीफ उस बहिश्त की कि प्रतिज्ञा किये गये हैं परहेजगार बीच उसके नहरें हैं बिन बिगडे पानी की और नहरें हैं दूध की कि नहीं बदला मजा उनका और नहरें हैं शराब की मजा देनेवाली वास्ते पीनेवालो के और नहरें शहद साफ किये गये की और वास्ते उनके बीच उसके मेवे हैं प्रत्येक प्रकार से दान मालिक उनके से ॥

—मं ६ सि. २६ सू. ४७ आ. ४, १३,१५ ॥

समीक्षक—या आज्ञेप्रमाणें कुराण, खुदा व मुसलमान लोक बंडखोरे, दंगेखोर तापदायक व स्वार्थी दयाहीन बनले आहेत. या कुराणानुसार जर मुसलमानेतर लोक मुसलमानाशीं वर्तन ठेवतील तर मुसलमानांच्या दुःखांना सीमा तरी राहील काय ? त्यावेळेस मुसलमानांची जी स्थिती होईल, तिची कल्पना त्यांनीं केली म्हणजे आज आपण किती दुःख देतो हें त्यांना कळेल. इस्लामी खुदाचा पक्षपात पहा. ज्यांनीं महंमद साहेबांना मानिलें नाहीं त्यांवर तो बहिष्कार घालतो, मारतो ! ज्या ठिकाणीं शुद्ध पाणी दुध, मद्य, शहद यांच्या मोठमोठ्या नद्या आहेत तो इस्लामी स्वर्ग इहलोकांपेक्षां कोणत्या दृष्टीनें श्रेष्ठ आहे ? दुधाच्या नद्या कधीं तरी व कुठें तरी असू शकतात काय ? कारण अल्पकालांतच तें बिघडून जातें. अशा गोष्टीमुळेंच विद्वानांना कुराण मताविषयीं आदर वाटत नाहीं ॥ १४० ॥

१४१—जब कि हिलाई जावेगी पृथिवी हिलाये जानेपर ॥ और उडाए जावेंगे पहाड उडाये जाने पर ॥ बस हो जावेंगे भुनगे टुकडे २ ॥ बस साहब दाहनी और वाले क्या हैं साहब दाहनी ओर के ॥ और बाईं और वाले क्या हैं बाईं और के ॥ ऊपर पलंग सोने के तारों से बुने हुये हैं ॥ तकिये किये हुये हैं ऊपर उनके आमने सामने ॥ और फिरेंगे ऊपर उनके लडके सदा रहनेवाले ॥ साथ आबखोरो के और आफताबों के ॥ और प्यालों के शराब साफ से ॥ नहीं माथा दुखावे जावेंगे उससे और न विरुद्ध बोलेंगे ॥ और मेवे उस किस्म से कि पसंद करें ॥ और गोश्त जानवर पक्षियों के उस किस्म से कि पसंद करें ॥ और वास्ते उनके औरतें हैं अच्छी आंखोंवाली ॥ मानिन्द मोतियों छिपाये हुओं की ॥ और बिछौने बडे ॥ निश्चय हम ने उत्पन्न किया है औरतों को एक प्रकारका उत्पन्न करना है ॥ बस किया है हमने उनको कुमारी ॥ सुहागवालियां

बराबर अवस्था वालियां ॥ बस भरनेवाले हो उससे पेटों को ॥ बस कसम खाता हू मैं साथ गिरने तारों के ॥

—मं ७ सि. २७ सू. ५६ आ. ४ ते ९, १५ ते २३, ३५ ते ३८, ५४,७५ ॥

**समीक्षकः**—कुराणकर्त्यांच्या विचित्र लीला आतां अवलोकन करा. पृथ्वि, ही नेहमींच हालत असते तशी त्यावेळेसहि हालत असेल यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं, कुराणकर्ता पृथ्वि ही स्थिर आहे असें मानीत होता ! बरें, पर्वतांना काय पक्षीवत उडवून टाकील ? जरी बारीक बारीक तुकडे होतील तरीहि पण सूक्ष्म शरीरधारी राहणारच, मग त्यांचा पुनर्जन्म होणार नाहीं काय ? वाहवा, इस्लामी खुदा शरीरधारी आहे एरवी त्याच्या डाव्या उजव्या हाताकडे उभे कसे राहतां येईल ? जर स्वर्गांत तारेचे पलंग शयनार्थ सज्ज आहेत तर ते बनविणारे कारागिर सोनार आदि लोक तेथें असलेच पाहिजेत. पण त्या पलंगांत ढेकूणें होऊन शयन करणाऱ्या दुर्दैवी लोकांना रात्रीच्या रात्रौ जागरणें करावीं लागत असतील त्याची वाट काय ? स्वर्गांत लोडाशीं टेंकून टेंकून तेथील निरुद्योगी लोकांची दोंदें वाढलीं असतील ? किंवा स्वर्गांतील कचेरी, कोर्ट, कारखाने वगैरेमध्यें ते उद्योग धंदे करीत आहेत ? उद्योग धंदे करीत असल्यास ठीक आहे नाहींतर रोग लागून बिचारे मृत्यूच्या दाढेंत सांपडत असतील ? काबाडकष्ट करून उपजीविका करीत असतील तर मग स्वर्गीय स्थिति व इहलोक यामध्यें अंतर काय ? कांहींच नाहीं. तेथें मुलेंबाळें आहेत, त्यांच्या बरोबर त्यांचे आईबापहि असतील सासू सासरे असतील, ह्या सर्वांचें तें एक मोठें शहर वसलें असेल, त्यांत मलमूत्रादिकांचे रोगराई होत असेल ? मिठाई मेवे खाल्यावर प्यालयांतून पाणी पीत असतील, कपभर दारू पित असतील. मग त्यांची डोकीं भणाणत असतील. व मग ते एकमेकांना कमजास्त बोलत असतील? यथेष्ट मेवा मिठाई खाल्यावर जनावरें व पक्षी यांचे मांस खाण्यास मिळेल. हजारों पशु पक्षी तेथें वधिले जात असतील व त्यांची हाडें, पिसें सर्वत्र पडलेले असतील, कसायाचीं दुकानें असतीलच ? वाहवा, वाहवा ! इस्लामी स्वर्गांचें वर्णन व प्रशंसा कोठवर करावी ? तो अरबस्थानपेक्षां सुंदर व वरचढ आहे ! ! ! मद्यमांस खाऊन पिऊन उन्मत्त बनल्यावर सुंदरशा स्त्रिया आणि लांडेहि स्वर्गांत रिझर्व्ह ठेवले आहेत नाहींतर स्वर्गीय वास्तव्य करणारे लोक दारूनें झिंगल्यावर व इतर मादक पदार्थ सेवनानें मस्तकांत गरमी चढून प्रमत्त बनल्यावर कसें होईल ! ! ! अनेक जोडपी निजावयाची तर बिछानेंहि मोठमोठे असतील ? खुदा स्वर्गांत कुमारी उत्पन्न करतो म्हणून तर कुमारहि उत्पन्न करतो. कुमारींचीं लग्नें येथून स्वर्गांत जाणाऱ्या उमेदवाराशीं होऊन गेलीं हें खुदानें कुराणांत लिहिलेंच आहे. पण स्वर्गीय कुमार जे आहेत त्याच्यासाठीं कुमारी खुदानें रिझर्व ठेवल्या आहेत तें त्यानें सांगितलें नाहीं. त्यांचेहि विवाह येथून गेलेल्या उमेदवाराबरोबर कुमारीवत् तर तो लावून देणार नाहीं ना ? ह्या प्रश्नाला

निर्णय न केल्यामुळें खुदाची ही मोठीच चूक झालेली नाहीं काय ? परिपक्व अवस्थेच्या कुमारी पतीशीं संसार थाटील असतील तर ठीकच आहे नाहींतर सगळीच मजा. पति-पत्नीमध्यें दुप्पट निदान दीडपट तरी वयाचें अंतर पाहिजे. मुसलमानांच्या स्वर्गाचें हें कुराणोक्त वर्णन आहे नरकाचें वर्णन ऐका. नरकवासी जन सिंहोड वृक्ष भक्षण करून राहतात. त्या वृक्षाला कांटे असतीलच. गरम पाणी प्यावयाला इत्यादि दुःखें नरकवासाची आहेत. शपथ घेणें हें काम बहुधा लबाडाचें असतें सत्यवाद्यांचें नसतें. खुदा जर शपथ खातो तर तो लबाडाहून भिन्न असूं शकणार नाहीं. ॥ १४१ ॥

**१४२—निश्चय अल्लाह मित्र रखता है उन लोगोंको कि लडते हैं बीच मार्ग उसके के ॥ मं. ७ सि. २८ स. ५९ आ. ४ ॥**

**समीक्षकः**—वाहवा शाबास त्या खुदाची ! असल्या प्रकारचे उपदेश करूनच बिचाऱ्या अरबांना सर्वांशीं लढवून जगाचे शत्रू बनवून त्यांना दुःखें प्राप्त करावयास लावलीं. धर्माच्या झेंड्याखालीं उभें करून लढाया करविणाराला कोणता बुद्धिमान ईश्वर मानूं शकेल ? जो जातीजातीमध्यें विरोध वाढवितो तो सर्वांचाच दुःखदाता होय ॥ १४२ ॥

**१४३—ऐ नबी क्यों हराम करता है उस वस्तुको कि हलाल किया है खुदाने तेरे लिये चाहता है तू प्रसन्नता बीबियों अपनी की और अल्लाह क्षमा करनेवाला दयालु है ॥ जल्दी है मालिक उसका जो वह तुमको छोड दे तो, यह कि उसको तुमसे अच्छी मुसलमान और ईमान वालिया बीबियां बदल दे सेवा करने वालियां, तोबा करने वालियां, भक्ति करने-वालियां, रोजा रखने वालियां पुरुष देखी हुई और बिन देखी हुई ॥**

**—मं. ७ सि. २८ सू. ६६ आ. १.५ ॥**

**समीक्षक**—ध्यान देवून पाहिल्यास खुदा ह्मणजे अन्य कोणी नसून तो महमदसाहेबांच्या घरचा एक कारकून होता असें दिसेल. प्रथम आयतमध्यें दोन गोष्टीचा नामनिर्देश केलेला आहे. एक महमदसाहेबांना सरबत आवडत होतें. त्यांना कित्येक बायका होत्या. तिच्यापैकीं एकीच्याकडे सरबत पिण्यास त्यांना थोडावेळ लागला, पण ही गोष्ट दुसरीस असह्य झाली. तिनें महंमदसाहेबांची बरीच झडती घेतल्यावर महंमदसाहेब ताळ्यावर आले व त्यांनीं शपथ घेतली कीं, मी पुनः असें करणार नाहीं. दुसरी गोष्ट अशी घडली कीं, अनेक बायकांपैकीं ज्या रात्रीं ज्या बायकोची पाळी होती तिच्याकडे ते गेले असतां ती माहेरी गेल्याचें त्यांना आढळून आलें. त्या रात्रीं महंमदसाहेबांनीं पत्नीऐवजी एका दासीला बोलावून तिलाच पवित्र केलें ! बायकोला हें शुभवर्तमान समजतांच ती रागावली. तेव्हांहि महमदसाहेबांची बाबरगुंडी होऊन त्यांनीं तिच्यापुढें नाकधुऱ्या काढून पुनः ह्मणून असले काम न करण्याची प्रतिज्ञा केली. व बायकोला सांगून ठेविलें कीं, झाले तें झालें, पण ही गोष्ट कोणाला

सांगूं नकोस, बायकोनें तसें करण्याचें कबूल केलें. मग त्यानीं हा प्रकार दुसऱ्या बायकोस निवेदन केला. ह्यानंतर ही आयत खुदानें पाठविली कीं, 'जी गोष्ट आम्हीं तुजसाठीं अग्राह्य ठरविली आहे ती तूं कां करतोस ? बुद्धिमानांनीं विचार करावा कीं, ईश्वर केव्हांतरी कोणाची घरची भांडणें मिटवण्याचीं कामें करील काय ? यावरून महमदसाहेबांचें आचरण कसें होतें त्याची कल्पना येईल. जो अनेक बायका ठेवतो तो ईश्वराचा भक्त किंवा पैगंबर कसा असूं शकेल ? आणि पक्षपाती बनून एका स्त्रीचा अपमान करतो व दुसरीचा सन्मान करतो तो अधर्मी नव्हे काय ? अनेक स्त्रियांचा उपभोग घेऊनहि तृप्त न होतां दासी बटकीशीं व्यवहार ठेवतो त्याला लाजलज्जा, भय व धर्म कोठून असेल ! ह्मटलें आहे कीं:—

**कामातुराणां न भयं न लज्जा ॥**

जो कामी मनुष्य असतो त्याला अधर्मानें वागण्यास भय व लज्जा वाटत नसते. मुसलमानांचा खुदाहि महंमदसाहेबांच्या बायका व पैगंबर यांचे झगडे बखेडे यांचा फैसला करणारा जणूं सरपंच बनलेला आहे. आतां कुराण हें विद्वान् रचित आहे किंवा अडाणी लोकानीं आपला मतलब साधण्यासाठीं बनविलें आहे याचा विचारवतांनीच आपल्या मनाशीं विचार करावा ह्मणजे काय स्थिति आहे ती स्पष्ट कळेल. दुसऱ्या आयतवरून प्रतीत होतें कीं, महमदसाहेबांवर त्यांची एखादी बायको अप्रसन्न झाली असेल तेव्हां तिला धमकी देण्यासाठीं खुदा कळवितो कीं, तूं जर अशी गडबड करशील तर महंमदसाहेब तुझा त्याग करतील व मग पुरुषांना दुर्मिळ अशी सुंदर स्त्री मी त्यांना देईन. या गप्पावरून हेंच सिद्ध होतें कीं, ईश्वर वगैरे कोणीच कांहीं बोलत नव्हता. ह्या केवळ देशकालानुरूप आपलें प्रयोजन साध्य करणारे जे होते त्यांनीं ईश्वराच्या नांवावर असल्या थापा मारल्या आहेत. जे लोक हे प्रकार ईश्वरीय मानीत असतील त्यांना आह्मीच काय, पण सर्व बुद्धिमान् हेंच उत्तर देतील कीं, तो ईश्वर नसून महंमदसाहेबांना बायका गांठून देणारा एक मध्यस्थ असा न्हावी होता ॥ १४३ ॥

**१४४—ऐ नबी झगडा कर काफिरों और गुप्त शत्रुओं से और सख्ती कर ऊपर उनके ॥ मं. ७ सि. २८ सू. ६६ आ. ९ ॥**

**समीक्षक**—इस्लामी खुदाची करामत पहा. अन्य मतवाल्यांशीं लढण्यास तो मुसलमानांना व पैगंबराला उत्तेजन देत आहे. मग मुसलमानांची वृत्ति दंगेखोर कां नसावी ? परमात्मा मुसलमानावर कृपादृष्टि करो ह्मणजे त्यांची बंडखोरवृत्ति लयास जाऊन ते सर्वांबरोबर मित्रत्वानें वागतील ॥ १४४ ॥

**१४५—फट जावेगा आसमान बस वह उस दिन सुस्त होगा ॥ और फरिश्ते होंगे ऊपर किनारों उसके के और उठावेंगे तख्त तेरे का ऊपर अपने उस दिन आठ जन ॥ उस दिन सामने लाये जाओगे तुम न**

छिपी रहेगी कोई बात छिपी हुई ॥ बस जो कोई दिया गया कर्मपत्र अपना बीच दाहिने हाथ अपने के बस कहेगा लो पढो कर्मपत्र मेरा ॥ और जो कोई दिया गया कर्मपत्र बीच बायें हाथ अपने के. बस कहेगा हाय न दिया गया होता मैं कर्मपत्र अपना ॥

—मं. ७ सि. २९ सू. ६९ आ. १६ ते १९ व २५ ॥

**समीक्षक**—आकाश काय वस्त्र आहे म्हणून त्याचे तुकडे होतील ? जर परलोकांला आकाश म्हटलें असेल तर ही गोष्ट अविद्याजनक होय. कुराणोक्त खुदा सिंहासनावर बसतो. आठ भोयी त्याच्या सेवेला आहेत ह्यावरून तरी खुदा शरीरधारी असा साकार आहे हें समजण्यास आतां कसलाच संशय राहिला नाहीं. मागें पुढें येणें जाणें हेंहि मूर्तिमानालाच शक्य आहे. असा मुर्तिमान सर्वज्ञ, सर्वव्यापक, सर्वशक्तिमान कसा असणार ? आश्चर्याची गोष्ट आहे कीं, पुण्यात्म्यांचे उजवे हातीं तो पत्र देईल, वाचावयास लावील व त्यांना स्वर्गांत रवाना करील आणि पाप्यांना त्यांच्या डाव्या हातामध्यें त्यांचें कर्मपत्र देईल त्यांच्या कर्मांची सुनावणी करील त्यांना नरकांत पाठवील. ह्या सर्व लीला बालकांना शोभादायक आहेत ॥ १४५ ॥

१४६—चढते हैं फरिश्ते और रूह तर्फ उसकी वह आज़ाब होगा बीच उस दिनके कि है परिमाण उसका पचास हज़ार वर्ष ॥ जब कि निकलेंगे कबरों में से दौडते हुए मानो कि वह बुतों के स्थानों की और दौडते हैं ॥ —मं. ७ सि. २९ सू. ७४ आ. ४,४२॥

**समीक्षक**—दिवस पन्नास हजार वर्षांचा तर रात्रहि तितक्याच मुदतीची कां नाहीं ? एवढी मोठी रात्र नसेल तर दिवसहि तसा असणें शक्य नाहीं. पन्नास हजार वर्षेंपावेतों खुदा, देवदूत व कर्मपत्रवाले उभे राहतील, किंवा बसून असतील अथवा जागरण करतील ह्यापैकीं कोणतें ? यापैकीं कोणतीही त्यांची अवस्था राहिली तरी खात्रीनें ते आजारी पडून मरतील. कबरस्थानांतील प्रेतें न्यायादिनाचे वेळीं ताडकन् उठून खुदाच्या कचेरीकडे धांव घेणार आहेत काय ? कबरस्थानांत त्यांना वारंटें कशीं काय पोंचतीं केलीं जातील ? पुण्यवान व पापी जन ह्या सर्वांना इतका दीर्घकाल कबरीमध्यें डांबून ठेवणें उचित नव्हे. आजकाल खुदाची कचेरी बंद असेल व खुदा आणि त्याचे देवदूत स्वस्थ बसले असतील ! कां कामें करीत आहेत ? आपल्या घरांत बसून खाणें, पिणें, नाच, तमाशे पाहणें, ऐषआराम करणें हींच त्यांची कामें असतील ! इतकी अंधेर नगरी अन्यत्र कोठें नसेल व असल्या बालिश गोष्टीवर विश्वास ठेवणारे जंगलीहि कोणी नसतील ॥ १४६ ॥

**१४७—निश्चय उत्पन्न किया तुम को कई प्रकारसे ॥ क्या नहीं देखा तुमने कैसे उत्पन्न किया अल्लाह ने सात आसमानों को ऊपर तले ॥ और किया चाद को बीच उसके प्रकाशक और किया सूर्य्य को दीपक ॥**

**—मं. ७ सि. २९ सू. ७१ आ. १४,१५,१६॥**

**समीक्षक**—खुदानें जीवांना उत्पन्न केलें असेल तर ते नित्य अमर कधीं राहूं शकत नाहींत. मग स्वर्ग तरी सदैव कसा असेल ? जें उत्पन्न होतें तें नाहींसेंहि होतें. आसमान वर कसें निर्माण करूं शकला ? कारण तें निराकार व विभु आहे. दुसऱ्या वस्तूंचें नांव आकाश ठेवलें असेल तरी तें नाम व्यर्थ होय. वर खालीं आकाश व त्याच्या मध्यभागीं सूर्यचंद्र कधीं राहणार नाहींत. मध्येंच असतील तर एक वरचा व एक खालचा पदार्थ तेवढाच प्रकाशित राहणार; बाकी सर्वत्र अन्धःकार असला पाहिजे. पण असें दिसत नाहीं ह्मणून हें सत्य नव्हे ॥ १४७ ॥

**१४८—यह कि मसजिदें वास्ते अल्लाह के हैं बस मत पुकारो साथ अल्लाह के किसी को ॥ मं. ७ सि. २९ सू. ७२ आ. १८ ॥**

**समीक्षक**—हें सत्य आहे तर मग मुसलमान लोक " लाइलाह इल्लिलाः महंमदर्रसूलल्लाः " असा हा कलमा ह्मणून महंमदसाहेबांना ईश्वराचा भागीदार का बनवितात ? असें कुराणविरुद्ध वर्तन कां ? जर तें कुराणविरुद्ध नसेल तर हें खोटें ह्मणावें लागेल. मशीद खुदाचें घर आहे ह्मणजे मुसलमान मोठे मूर्तिपूजक बनले कारण पुराणानुयायी, जैनी हे लोक तांब्या पितळेच्या छोट्या देवादिकांच्या मूर्तींना मानतात ह्मणून जर ते मूर्तिपूजक बनतात, तर मशीदीला ईश्वरगृह समजणारे मुर्तिपूजक नव्हे काय? १४८

**१४९—इकट्ठा किया जावेगा सूर्य और चांद ॥**

**मं. ७ सि. २९ सू. ७५ आ. ९**

**समीक्षक**—सूर्य चंद्र कधीं एकत्र होऊं शकतील काय ? पण ते एकत्र करूं पाहणारा किती असमंजस असावा ? सूर्य चंद्र एवढेच एकत्र करण्याचा हेतू काय, बाकीचीं सर्व लोकलोकांतरें तशीच राहूं देण्यांत कोणता मतलब आहे ? असल्या असंभवनीय गोष्टी परमेश्वरकृत कधीं होऊं शकत नाहींत. ईश्वराच्या रौहोत पण कोणा विद्वानाकडूनहि होणाऱ्या नाहींत ॥ १४९ ॥

**१५०—और फिरेंगे ऊपर उनके लडके सदा रहनेवाले जब देखेगा तू उनको अनुमान करेगा तू उनको मोती विखरे हुए ॥ और पहनाये जावेंगे कंगन चांदी के और पिलावेगा उनको रब उनको शराब पवित्र ॥**

**—मं. ७ सि. २९ सू. ७६ आ. १९,२१**

**समीक्षकः**—कांहो महाराज, मोत्या रंगाचीं मुलें कोणत्या कार्यासाठीं तेथें ठेवण्यांत येतात ? तरुण लोकांची सेवा व स्त्रीजन सेवा त्यांच्या मनाप्रमाणें होत नसावी ?

आश्चर्य आहे कीं, मुलांशीं दुष्टजन निंद्य कर्में करतात याचें मुलकारण (हेंच कुराण) वचन होय. स्वर्गांतही स्वामी सेवकभाव असल्यामुळें स्वामी वर्गांना आनंद व सेवकवर्गांना परिश्रमानें अत्यंत कष्ट होत असतील असा पक्षपात कां ? खुदाच स्वतः मद्य पाजवील म्हणजे तो जर सेवकाचें काम करणारा आहे तर मग त्याची थोरवी कोठें राहिली ! तेथें स्वर्गांत स्त्री पुरुष समागम व गर्भावस्था व बाळंतपणेंहि होतात किंवा नाहीं ? जर नसतील तर विषयसेवन व्यर्थ होतें, सफल होत असेल तर ते जीव कोठून आले ? व खुदाची सेवा केल्याशिवाय स्वर्ग प्राप्ति त्यांना कशी झाली ? जर स्वर्गांतच त्यांची उत्पत्ति असेल तर ईमान न बाळगतां आणि खुदाची भक्ति न करतांहि त्यांना फुकटा-फुकट स्वर्ग प्राप्तिचा लाभ झाला म्हणावयाचा ! कांहींही भक्ति न करितां स्वर्गसौख्याचा लाभ करून देणें हीं अन्यायाची परमावधी होय ।। १५० ।।

**१५१—बदला दिये जावेंगे कर्मानुसार ।। और प्यालें हैं भरे हुए ।। जिस दिन खडे होंगे रूह और फरिश्ते सफ बांधकर**

**—मं. ७ सि. ३० सू. ७८ आ. २६,३४,३८।।**

**समीक्षक**—कर्मानुसार फळें मिळतात तर मग देवदूत व गोरीं मुलें जीं स्वर्गांत वास्तव्य करितात त्यांना कोणत्या जन्माची फळें मिळाली आहेत ? प्यालेचे प्याले मद्यप्राशन केल्यावर तेथें कोण गोंधळ उडत असेल ? रूह हा देवदूतांचा मुख्य पुढारी आहे. पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं एखादी पलटण तयार करण्याचा खुदाचा बेत आहे काय ? व त्या पलटणीच्या हस्तें इतरांना खुदा शिक्षा करणार आहे काय ? खुदा त्यावेळीं उभा असेल वा बसलेला ? न्यायादिनापर्यंत खुदानें आपलें देवदूत सैन्य गोळा करून सैतानाला पकडलें तर खुदाचें राज्य निष्कंटक बनणार नाहीं काय ?।। १५१।।

**१५२—जब कि सूर्य लपेटा जावे ।। और जब कि तारे गदले हो जावें ।। और जब कि पहाड चलाये जावें ।। और जब आसमान की खाल उतारी जावे ।। मं. ७ सि. ३० सू. ८१ आ. १ २,३, ११ ।।**

**समीक्षक**—कोण असमंजसपणाची कल्पना आहे ! गोल असा सूर्यलोक कसा काय गुंडाळला जाईल ? व ताऱ्यांचें बोजकें कसें करतां येईल ? पर्वत निर्जीव असल्या-कारणानें ते कसे चालूं शकतील ? आणि आकाश म्हणजे काय वृक्ष वा पशु आहे म्हणून त्याची साल काढण्यांत येईल ? जंगलीपणाचा व अडाणीपणाचा पुरावा आणखी कोणता ? ।। १५२ ।।

**१५३—और जब कि आसमान फट जावे ।। और जब तारे झड जावें ।। और जब दर्या चीरे जावें ।। और जब कबरें जिलाकर उठाई जावे।।**

**—मं. ७ सि. ३० सू. ८२ आ. १ ते ४ ।।**

समीक्षकः—खुप आहे कुराणकर्त्यांची फिलॉसाफि! आकाशाला कसें फाडतां येईल? ताऱ्यांना कसें झाडतां येईल? समुद्र काय लाकूड आहे म्हणून तो चिरतां येईल? कबरी काय प्रेतें आहेत कीं, त्या जिवंत होतील? ॥ १५३ ॥

**१५४—कसम है आसमान बुर्जों वाले की ॥ किन्तु वह कुरान है बडा बीच लौहे महफूज (रक्षा) के ॥—मं. ७ सि. ३० सू. ८५ आ. १-२१॥**

समीक्षक—कुराणकर्त्यांनें भूगोल, खगोल शिकण्याची तसदी मुळींच घेतलेली दिसत नाहीं. एरवी तो आकाशाला किल्ल्याचे बुरुज असें कां म्हणता? मेघादि राशिनां तो बुरुज म्हणत असेल तर बाकीच्याना कां म्हटलें नाहीं? वास्तविक तें बुरुज नसून तारे लोक आहेत. तें कुराण खुदाचे नवल आहे! जसें हें कुराण खुदाची विद्वत्ता, कौशल्य दाखवितें त्याहून अधिक तें ओतप्रोत भरलेलें असेल? ॥ १५४ ॥

**१५५—निश्चय वे मकर करते हैं एक मकर ॥ और मैभी मकर करतां हूं एक मकर ॥ —मं. ७ सि. ३० सू. ८६ आ. १५,१६ ॥**

समीक्षकः—मकर म्हणजे ठकपणा. खुदाहि ठगबाज आहे काय? चोरीचें उत्तर चोरी व लबाडीचें उत्तर लबाडी हा सज्जनांचा धर्म आहे काय? वाहवा! धन्य कुराणकर्ता ॥ १५५ ॥

**१५६—और जब आवेगा मालिक तेरा और फारिश्ते पंक्ति बांध के ॥ और लाया जावेगा उस दिन दोजख को ॥**

**—मं. ७ सि. ३० सू. ८९ आ. २१,२२ ॥**

समीक्षक—ज्याप्रमाणें सेनाध्यक्ष आपल्या सैन्याची कवाईत करून घेतो त्याप्रमाणें हा खुदा आहे कीं नाहीं तें सांगा. नरक म्हणजे काय भांडें आहे कीं वाटेल तेथें नेवून ठेवतां येईल? भांड्याप्रमाणें असेल तर त्यांत असंख्य कैदी कसें मावतील? १५६ ॥

**१५७—बस कहा था वास्ते उनके पैगंबर खुदाके ने रक्षा करो ऊंटनी खुदा की और पानी पिलाना उसके को ॥ बस झुठलाया उसको बस पांव काटे उसके बस मरी डाली ऊपर उनके रब उनके ने ॥**

**—मं. ७ सि. ३० सू. ९१ आ. १३,१४ ॥**

समीक्षक—खुदाहि ऊंटनीवर बसून सहल करावयास निघतो? एरवीं ऊंटीन बाळगण्याचें त्याला कारण काय? न्याय दिनापूर्वीच नियमभंग करून तिला रोग कां लावला? रोगी बनवून तिला दंड केला मग न्यायाच्या रात्री न्याय करणें व ती रात्र असणें हें मिथ्याच काय? अरबदेशांत ऊंटाची पैदास विशेषतः असते, वाहनाचे इतर पशु जवळ जवळ नसतातच. यावरून सिद्ध होतें कीं, कुराणकर्ता कोणी अरब गृहस्थ असावा. ॥ १५७ ॥

१५८—यों जो न रूकेगा अवश्य घसीटेंगे उसको हम साथ बालों माथे के ॥ वह माथा कि झूठा है और अपराधी ॥ हम बुलावेंगे फरिश्ते दोजख के को ॥ मं. ७ सि. ३० सू. ९६ आ. १५,१६,१८ ॥

समीक्षक—नीच चपराशी लोकांचेंच काम असतें कीं, त्यांनीं ओढाताण करावी पण इस्लामी खुदाहि तेंच काम करितो. मस्तक कधीं लबाड व अपराधी असतें ? असा ईश्वर कसा असूं शकेल कीं जो दूताकडून स्वर्ग बंद करील ?

१५९—निश्चय उतारा हमने कुरान बीच रात कदर के ॥ और क्या जाने तू क्या है रात कदर ॥ उतरते है फरिश्ते और पवित्रात्मा बीच उसके साथ आज्ञा मालिक अपन क वास्ते हर काम के

—मं. ७ सि. ३० सू. ९७ आ. १,२,४ ॥

समक्षिक—एका रात्रींत कुराण उतरलें ह्मणजे एक एक आयातच उतरली असल ना, कां एकावेळेस एकदम संपूर्ण ? रात्र अंधेरी आहे कां चांदणी यांत विचार ण्यासारखें काय आहे ? आह्मी यापूर्वी सांगितलें आहे, वर खालीं ईश्वराचें अगर कोणा-चेंहि येणें जाणें नसतें पण येथे पुनः ह्मटलें आहे ' खुदाचे हुकमानें देवदूत व पवित्रात्मे संसार सुव्यवस्थित करण्याकरितां येतात ह्मणून या सर्वांचें एखादें विशिष्ट स्थान असलें पाहिजे. असें असल्यास खुदाला सर्वव्यापक ह्मणण्याचे कारण काय ? आतांपर्यंत फक्त खुदा, फरिश्ते व पैगंबर ह्या तीघांची वर्णनें आलीं पण यामध्यें एक नवीनच ' पवि-त्रात्मा ' चवथा उत्पन्न केलेला दिसतो ! ' पवित्रात्मा ' ही नवीन भानगड काय आहे तें खुदाच जाणें. ख्रिस्त्यांची ' बाप, पुत्र, पवित्रात्मा ' ही जशी त्रिपुटी आहे तशी इस्लामी त्रिपुटी, ' खुदा फरिश्ता, पैगंबर ही असून शिवाय ' पवित्रात्मा ' हें एक त्या त्रिपुटीचें पिल्लूच होय ! जर ह्मणाल कीं आह्मी फरिश्ता, पैगंबर, पवित्रात्मा यांना खुदा समजत नाहींत तर मग पवित्रात्मा व खुदा हे पृथक होतें कीं काय ? तसें अस-ल्यास खुदाला पवित्रात्मा ह्मणावें कीं नाहीं ? खुदा घोडे आदि जनावरांच्या व कुराण वगैरेंच्या शपथा खातो पण शपथा खाणें हें भल्या लोकांचें काम नव्हे ॥ १५९ ॥

आतां या समुल्लासाचा उपसंहार लिहून कुराण स्वरूपाचें दिग्दर्शन बुद्धिमान् लोकांना करवितो ह्मणजे त्यांची यथार्थ कल्पना येईल.

माझ्या मतें हें पुस्तक न ईश्वरकृत, न विद्वान्‌रचित, न विद्यायुक्त असें आहे. -मुल्लासांत मी फक्त त्यांतील फारच थोड्या दोषांचें आविष्कारण केलेलें आहे. कारण लोकांनीं त्यांच्या भ्रमजालांत फसून आपल्या जन्माचें मातेरें करून घेऊं

गांत जें अल्पसें सत्य आहे तें वेदादि विद्यायुक्त पुस्तकांच्या अनुकूल असल्या-मुळ मलाच काय पण इतर जे सत्यप्रिय, निःपक्ष बुद्धिमान, विद्वज्जन त्यांनाहि ग्राह्यच आहे. अल्पसा सत्यांश सोडून दिल्यास बाकी सर्व अविद्यामूलक भ्रमोत्पादक, मनुष्याच्या

आत्म्यांना पशुवत् बनवून सोडणारें, शांतता भंग कारक व उपद्रव माजवून मनुष्यमनुष्यांत द्रोह पसविणारें व परस्परांना दुःखसागरांत बुडविणारे आहे. पुनरुक्ति दोषांचें कुराण म्हणजे जणूं भांडार होय. परमेश्वरानें सर्व मनुष्यांवर कृपा करून तो त्याना एकमेकाशीं प्रेम, ऐक्य भावानें वागण्याची प्रेरणा करो व सर्वत्र सुखाभिवृद्धि होवो. मी ज्याप्रमाणें स्व व परमतदोष निःपक्षपणें प्रकाशित केले त्याप्रमाणें जर सर्व विद्वान लोक करतील तर परस्पर वैमनस्य आहे तें नष्ट होऊन सर्व लोक एकाच सत्यमताचें अनुयायी बनून चोहोंकडे आनंदी आनंद नांदूं लागेल. कुराणाविषयीं मी ज्या उद्देशानें लिहिलें आहे तो उद्देश लक्षांत घेऊन सर्व समंजस धार्मिक सज्जनांनीं त्याकडे पहावें. यदाकदाचित् भ्रमानें अन्यथा कांहीं लिहिलें गेलें असेल तर तें शुद्ध करून घ्यावें.

आतां शेवटीं एकच गोष्ट सांगावयाची कीं, पुष्कळ मुसलमान असें म्हणत असतात व लिहितातही कीं, आमच्या मताचा निर्देश अथर्ववेदामध्येंदेखील आलेला आहे. याचें उत्तर अथर्ववेदांत मुसलमानी मतांचें नांवनिशानहि कोठें नाहीं. ( प्रश्न ) तुम्ही संपूर्ण अथर्ववेद अवलोकन केला आहे काय ? जर पाहिला असेल तर ' अल्लोपनिषद् ' वाचा म्हणजे त्यांत पुढीलप्रमाणें मुसलमानी मताचा स्पष्ट उल्लेख आलेला तुम्हाला दिसून येईल.

**अस्माल्लां इल्ले मित्रावरुणा दिव्यानि धत्ते ॥ इल्लल्ले वरुणो राजा पुनर्दुः ॥ इया मित्रो इल्लां इल्लल्ले इल्लां वरुणो मित्रस्तेजस्कामः ॥ १ ॥ होतारमिन्द्रो होतारमिन्द्र महासुरिन्द्राः ॥ अल्लो ज्येष्ठं श्रेष्ठं परमं पूर्णं ब्रह्माणं अल्लाम् ॥ २ ॥ अल्लोरसूलमहामदरकबरस्य अल्लो अल्लाम् ॥ ३ ॥ आदल्लाबूकमेककम् ॥ अल्लाबूकनिखातकम् ॥ ४ ॥ चन्द्र सर्व नक्षत्राः ॥ ५ ॥ अल्ला ऋषीणां सर्वदिव्यां इन्द्राय पूर्व माया परममन्तारिक्षाः ॥ ६ ॥ अल्लः पृथिव्या अन्तरिक्षं विश्वरूपम् ॥ ७ ॥ इल्लां कबर इल्लां कबर इल्लां इल्लल्लेति इल्लल्लाः ॥ ८ ॥ ओम् अल्ला इल्लल्ला अनादिस्वरूपाय अथर्वणाश्यामा हुं ह्रीं जनानपशूनसिद्धान् जलचरान् अदृष्टं कुरुकुरु फट् ॥ ९ ॥ असुर संहारिणी हुं ह्रीं अल्लोरसूल महमदकबरस्य अल्लो अल्लाम इल्लल्लेति इल्लल्लाः ॥ १० ॥**

## इत्यल्लोपनिषत् समाप्ता ॥

सदरहू उपनिषदांत ज्या अर्थी महमदसाहेबांना ' रसूल ' देवानें पाठविलेला प्रेषित असें म्हटलें आहे, त्याअर्थी मुसलमानी मत वेदमूलक आहे. ( उत्तर ) जर अद्याप तुम्ही अथर्ववेद पाहिला नसेल तर आम्हांकडे या. प्रथमाक्षरापासून अंत्याक्षरापर्यंत नीट वाचून पहा किंवा एखाद्या अथर्ववेदी गृहस्थाकडे जा. अथर्ववेद संहिता भागांतील वसिहि कांडांत तुमच्या पैगंबराचें वा त्यांच्या मताचें नांवहि तुम्हांस आढळणार नाहीं. हें अल्लोपनिषद् मूळ अथर्ववेदांत नाहीं, त्याच्या गोपथांत नाहीं, अगर इतर कोणत्याहि शाखा ग्रंथांत नाहीं. बहुधा हें उपनिषद् अकबरबादशहाचे वेळीं जो अरबी व संस्कृत

भाषा जाणणारा आहे अशा मनुष्याचें लिहिलें असावें. कारण वरील उताऱ्यांत अरबी व संस्कृत पदें लिहिलेली आढळून येतात.

( अस्माला इल्ले मित्रा वरुणा दिव्यानि धत्ते ) इत्यादिमध्यें ( अस्माला और इल्ले ) हीं अरबी व ( मित्रा वरुणा दिव्यानि धत्ते ) हीं संस्कृत पदें आहेत याचप्रमाणें सगळ्यामध्यें अरबीसंस्कृतचें मिश्रण झालेलें आहे यावरूनच त्याचा कर्ता कोण हें कळून येतें. बरें याचा अर्थ पाहूं गेल्यास तोहि कृत्रिम अयुक्त, वेद व व्याकरणरीतिविरुद्ध आहे. या उपनिषदाप्रमाणें आणखी पुष्कळ उपनिषदें अनेक मतमतांतराभिमान्यांनीं आपआपलीं मतें सिद्ध करण्यासाठीं बनविलीं आहेत. उदा० स्वरोपनिषद, नृहसिंहतापनी, रामतापनी, गोपालतापनी वगैरे ( प्रश्न ) आजपर्यंत कोणीहि तुह्मीं ह्मणता असें ह्मटलें नाहीं तेव्हां तुमचेंच ह्मणणें खरें कसें मानावें ? ( उत्तर ) तुमच्या मानण्या न मानण्यावर आमच्या ह्मणण्याची सत्यासत्यता थोडीच अवलंबून आहे ? मी जसें ह्याला खोटें ह्मणतो त्याप्रमाणें तुह्मीहि जेव्हां अथर्ववेद गोपथ आदि शास्त्रें अवलोकन कराल, अर्थसंगती लावून शुद्धाशुद्ध पहाल तेव्हां तरी सप्रमाण मानाल कीं नाहीं ? ( प्रश्न ) पहा. आमचें मत किती उत्तम आहे त्यायोगें सर्व प्रकारचीं सुखें व मुक्ति होईल. ( उत्तर ) प्रत्येक मतानुयायी असेंच म्हणतो कीं, माझें तेंच योग्य बाकीचीं मतें अयोग्य. आमच्या मताशिवाय स्वर्ग मिळणार नाहीं. कोणाचें मत खरें मानावें ? आमचें तर मत असें आहे कीं, सत्यभाषण, अहिंसा, दया वगैरे शुभगुण सर्वमतांत उत्तम होत बाकीचे वादविवाद, ईर्ष्या, द्वेष, मिथ्याभाषणादि कर्में सर्व मतांत निंद्य होत. आपणाला सत्यमत ग्रहण करण्याची इच्छा असेल तर वैदिकमताचा स्वीकार करावा.

इति श्रीमद्दयानन्दसरस्वतीस्वामिकृते सत्यार्थप्रकाशे
सुभाषाविभूषिते यवनमतविषये
चतुर्दशः समुल्लासः सम्पूर्णः

ह्या पुढें स्वमन्तव्यामन्तव्यप्रकाश लिहिला जाईल.

---

(ओ३म्.)

# स्वमन्तव्यामन्तप्रकाशः ॥

ज्याला सर्वतंत्र सिद्धान्त असें ह्मणतां येतें व ज्य सामाज्यधर्म किंवा सार्वजनिकधर्म असें ह्मणतात व जो अनादिकालापासून चालत आला आहे असें सर्वांनी मानलें आहे, मानीत आहेत व मानतील त्याला **सनातनधर्म** किंवा **नित्यधर्म** असें अन्वर्थक नांव आहे. या धर्माचा कोणीहि विरोधी होऊं शकत नाहीं. जर कोणी अविद्यायुक्त जनांनी किंवा पक्षाभिमानी मतमतांतरवाल्यांनी त्याला अन्यथा जाणलें किंवा भासविलें तर त्याचा स्वीकार बुद्धिमान् लोकांनी करूं नये; पण ज्याला सत्यवचनी, सत्यमानी, परोपकारी, निःपक्षपाती विद्वान् लोक मानतात तेंच सर्वांनीं मानावें व ज्याला ते मानीत नाहींत, तें इतरांनींहि मानण्यास योग्य नाहीं. आतां जीं वेदादिशास्त्रांनी व ब्रह्म्यापासून तों जैमिनिमुनीपर्यंत सर्वांनी मानलेलीं आहेत, त्या ईश्वरादितत्वांला मीहि मानीत असल्यामुळें त्यांना सर्वांच्या समोर स्पष्टपणानें मांडतों; माझें मत तें आहे कीं, जें तीनहि काळीं सर्वांला एकसारखें मानण्यास योग्य आहे. **नवीन कल्पना चालवावी व नवीन मत सुरू करावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं.** पण जें सत्य आहे त्याला मानणें व मानण्यास लावणें आणि असत्य टाकणें व टाकण्यास लावणें मला इष्ट वाटतें. जर मी पक्षपात केला असता तर मी आर्यावर्तांतील प्रचालित मतांपैकीं एकाचा आग्रही बनून राहिलों असतों. आर्यावर्तामध्यें व अन्यदेशामध्यें ज्या धर्मयुक्त चालीरीती आहेत त्यांचा स्वीकार करावा व धार्मिक गोष्टीचा कधींहि त्याग करूं नये ह्मणून माझा प्रयत्न आहे. सत्यधर्माचा कोणीहि त्याग करू नये असे मी इच्छीत आहें, कारण तशा धर्माचा त्याग करणें हें मनुष्यत्वाला शोभत नाहीं. मनुष्य त्याला ह्मणतां येईल कीं, जो मननशील आहे, जो आपल्याप्रमाणेंच अन्यालांही सुखदुःख, हानिलाभ समजतो; जो अन्याय करणाऱ्या बलिष्ठालांहि भीत नाहीं व जो धर्मात्म्या निर्बलालाहि भीत असतो, इतकेंच नव्हे तर आपल्या सर्व सामर्थ्यानें धर्मात्म्यांचें रक्षण, त्यांची उन्नति, त्याला प्रिय आचरण करीत असतो, मग ते धर्मात्मे कितीहि अनाथ, निर्बल, गुणरहित स्थितीमध्यें असले तरी हरकत नाहीं, तसेंच जो अधर्मी चक्रवर्ती असो, सनाथ, बलिष्ठ व गुणयुक्त असो

त्याचा नाश, अवनति व अप्रियाचरण सदोदित करीत असतो, अर्थात् जों होतां होईल तितकें करून अन्याय करणारांच्या बलाची हानि व न्याय करणाऱ्यांच्या बलाची उन्नति सर्व प्रकारें करीत असतो. अशा करण्यांमध्यें त्याला कितीहि दारुण दुःख होवो, प्राणहि जावोत पण जो मनुष्यधर्मापासून च्युत होणार नाहीं तोच ... मनुष्य होय. याविषयीं श्रीमान् महाराजा भर्तृहरी इत्यादिकांनीं जे श्लोक लिहिले आहेत ते येथें लिहिणें उपयुक्त आहेत असें समजून लिहीत आहे:—

निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु,
लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥
अद्यैवा मरणमस्तु युगान्तरे वा,
न्याय्यात् पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥१॥ भर्तृहरिः
न जातु कामान्न भयान्न लोभात्,
धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ॥
धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये,
जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥२॥ महाभारते ।
एक एव सुहृद्धर्मो निधनेऽप्यनुयाति यः ॥
शरीरेण समं नाशं सर्वमन्यद्धि गच्छति ॥ ३ ॥ मनुः ॥
सत्यमेव जयते नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः ॥
येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥४॥
न हि सत्यात्परो धर्मो नानृतात्पातकं परम् ॥
न हि सत्यात्परं ज्ञानं तस्मात्सत्यं समाचरेत् ॥ ५ ॥

उ० नि.

या महाशयांच्या श्लोकांच्या अनुकूल सर्वांनी निश्चय करावा हें योग्य आहे. आतां मी ज्या ज्या तत्वांला जसें जसें मानतो त्या त्या तत्वांचा तसा तसा उल्लेख संक्षेपानें येथें करतों, यांचें विशेष व्याख्यान या सत्यार्थप्रकाश नामक ग्रंथामध्यें त्या त्या प्रकरणामध्यें केलेलें आहे:—

(१) "ईश्वर"—याची ब्रह्म, परमात्मा आदिक नांवें आहेत व तो सच्चिदानंदादि लक्षणांनीं युक्त आहे, त्याचे गुण कर्म व स्वभाव हे पवित्र

आहेत, तो सर्वज्ञ, निराकार, सर्वव्यापक, अजन्मा, अनंत, सर्वशक्तिमान्, दयाळु, न्यायकारी, सर्व सृष्टीचा कर्ता, धारणकर्ता, हरणकर्ता आहे व सर्व जीवांला त्यांच्या कर्मानुसार सत्यन्यायानें फल देणारा आहे, इत्यादि लक्षणांनी युक्त असणाऱ्या त्या परमेश्वराला मी मानतों.

( २ ) " वेद " — विद्याधर्मयुक्त ईश्वरप्रणीत संहितमंत्रभागात्मक चार वेद आहेत. ते निर्भ्रांत असून स्वतः प्रमाण आहेत असें मी मानतों. ते स्वयं-प्रमाण असल्यामुळें त्यांच्या प्रामाण्याबद्दल कोणत्याहि अन्यग्रंथांतील प्रमाणांची आवश्यकता नाहीं. ज्याप्रमाणें सूर्य किंवा दिवा हे आपल्या स्वरूपाचें स्वतःच प्रकाशक असून पृथिव्यादि अन्यपदार्थांचे प्रकाशकहि होतात, त्याचप्रमाणें चार वेद हे आहेत. तसेंच चारहि वेदांचीं चार ब्राह्मणें, सहा अंगें, सहा उपांगें, चार उपवेद व ११२७ वेदांचे शाखाग्रंथ या सर्वांतील वेदानुकूल असलेला जो भाग आहे तो सर्व प्रमाण आहे व त्यांमध्यें जेवढीं वचनें वेद-विरुद्ध आहेत तेवढीं अप्रमाण आहेत असें मी मानतों.

( ३ ) " धर्म "—जो पक्षपातरहित, न्यायाचरण व सत्यभाषणादि युक्त ईश्वराज्ञारूप वेदांशीं अविरूद्ध आहे त्यालाच धर्म असें मी समजतों.

" अधर्म "—जो पक्षपातयुक्त, अन्यायाचरण व मिथ्याभाषणादि युक्त ईश्वराज्ञाभञ्जक वेदविरुद्ध आहे त्याला मी अधर्म असे समजतों.

( ४ ) " जीव "—जो इच्छा, द्वेष, सुख, दुःख, ज्ञानादिगुणयुक्त-अल्पज्ञ व नित्य आहे त्याला मी जीव असें समजतों.

( ५ ) " जीव " व ईश्वर यांचा संबंध "—जीव व ईश्वर हे स्वरूपतः व वैधर्म्यानें भिन्न आहेत व ते व्याप्य—व्यापकता व साधर्म्य यांनीं अभिन्न आहेत. ज्याप्रमाणें आकाशापासून मूर्तिमान् द्रव्य कधींहि भिन्न नव्हतें, नाहीं व नसणार व कधींहि तें मूर्तिमान् द्रव्य आकाशच नव्हतें, नाहीं व नसणार त्याच प्रमाणें परमेश्वर व जीव यांना व्यापक व्याप्य, उपास्य उपासक व पिता पुत्र या संबंधानें युक्त मी मानीत आहे.

( ६ ) " अनादिपदार्थ "—एक ईश्वर, दुसरा जीव व तिसरी प्रकृति हे तीन अनादि पदार्थ आहेत. यापैकीं प्रकृति हे जगाचें उपादानकारण आहे. हे तीनहि पदार्थ नित्य आहेत. जे पदार्थ नित्य असतात त्यांचे गुणकर्मस्व-भावहि नित्य असतात.

( ७ ) " **प्रवाहानें अनादि** "—जे संयोगाच्या योगानें द्रव्य, गुण व कर्म उत्पन्न होतात ते वियोगानंतर राहत नसतात. पण ज्याच्या योगानें प्रथम संयोग होतो तें सामर्थ्य त्यांमध्यें अनादि आहे. ह्मणून त्याचा पुनरपि संयोग होईल व वियोगहि होईल. संयोग, वियोग व वर्तमान स्थिति या तिघांलाहिं मी प्रवाहानें अनादि समजतो.

( ८ ) " **सृष्टि** " जो पृथक् पृथक् द्रव्यांपासून ज्ञान व युक्तिपूर्वक संयोग होऊन नानारुप बनलेली असते तिला सृष्टि असें ह्मणतात.

( ९ ) " **सृष्टिचें प्रयोजन** "—ईश्वराचे सृष्टीनिमित्त जे गुणकर्मस्वभाव आहेत ते सफल होणें हें सृष्टिचें प्रयोजन आहे. जसे नेत्र पाहण्यासाठीं आहेत, त्याचप्रमाणें परमेश्वराच्या सृष्टिरचनेच्या शक्तीची सफलता सृष्टि करण्यांत आहे व तिचें आणखिहि प्रयोजन आहे तें हें कीं, जीवांच्या कर्मांचा भोग त्यांना यथावत् मिळावा.

(१०) "**सृष्टिकर्ता**"—या सृष्टिचा कर्ता पूर्वोक्त ईश्वर आहे व सृष्टिहि सकर्तृक आहे. सृष्टीची रचना पाहिल्यावरून व जड पदार्थामध्यें आपोआप यथायोग्य बीजादिस्वरूप बनण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें सृष्टीचा " **कर्ता** " अवश्य आहे.

( ११ ) " **बन्ध** " —बंधन सनिमित्तक आहे, तें अविद्या या निमित्तानें होतें. जें जें पापकर्म आहे व अज्ञानादि ईश्वरभिन्नोपासना वगैरे आहे तें सर्व दुःख देणारें आहे. ह्मणून ज्याची इच्छा केली नसतांहि जें भोगावें लागतें त्याला " बंध " असें ह्मणतात.

( १२ ) " **मुक्ति** "—सर्व दुःखांतुन सुटून बंधनरहित होऊन, सर्वव्यापक ईश्वरामध्यें व त्याच्या सृष्टीमध्यें स्वेच्छेनें संचार करणें, याला मुक्ति असें ह्मणतात. नियत समयपर्यंत मुक्तीच्या आनंदाचा भोग भोगल्यानंतर पुनः संसारामध्यें यावें लागतें.

( १३ ) " **मुक्तीचें साधन** "—ईश्वरोपासना अर्थात् योगाभ्यास, धर्मानुष्ठान, ब्रह्मचर्यानें विद्याप्राप्ति, आप्तविद्वानांची संगति, सत्यविद्या, सुविचार व पुरुषार्थ इत्यादि हीं मुक्तीचीं साधनें आहेत.

( १४ ) " **अर्थ** "—जो धर्मानें मिळविला जातो त्यालाच अर्थ असें ह्मणतात व जो अधर्माच्या योगानें संपादन केला जातो त्याला " **अनर्थ** " असें ह्मणतात.

( १५ ) " काम "—जो धर्म व अर्थ यांच्या योगानें प्राप्त केला जातो त्याला काम असें ह्मणतात.

( १६ ) " वर्णाश्रम "—गुणकर्मांच्या योग्यतेनें वर्णाश्रम आहे असें मी समजतों.

( १७ ) " राजा "—जो शुभगुणकर्मस्वभावयुक्त आहे, पक्षपात न करतां न्याय व धर्म यांचें सेवन करतो, प्रजेशीं पित्याप्रमाणें वर्तन करतो, प्रजेला पुत्रांप्रमाणें मानतो, त्यांची उन्नत्ति करण्यांत व सुख वाढवण्यांत सदैव यत्न करीत असतो त्याला राजा असें ह्मणतात.

( १८ ) " प्रजा "—जी पवित्रगुणकर्मस्वभावांला धारण करून पक्षपातरहित, न्याय व धर्म यांचें सेवन करून, राजा व प्रजा यांची उन्नति इच्छिणारी असते व राजाशीं द्रोह न करतां त्याच्याशीं पुत्रवत् वर्तन करते तिलाच प्रजा असें ह्मणतात.

( १९ ) " न्यायकारी "—जो पूर्ण विचार करून असत्याचा त्याग करून, सदैव सत्याचें ग्रहण करतो, अन्याय करणाऱ्याला निरुत्साह करून न्याय करणाऱ्याची उन्नति करतो व आपल्याप्रमाणेंच सर्वांला सुख व्हावें असें इच्छितो, तो न्यायकारी होय. त्यालाच मीहि न्यायकारी असें समजतो.

(२०) विद्वानांला " देव, " अविद्वानांला " असूर, " पाप्यांला " राक्षस, " व " पिशाच " असें मी मानतों.

(२१) " देवपूजा "—विद्वान्, माता, पिता, आचार्य, अतिथि, न्याय-कारी, राजा, धर्मात्मा जन, पतिव्रता स्त्री, स्त्रीव्रत पति यांचा सत्कार करणें याला " देवपूजा " असें ह्मणतात, याहून जी विपरीतांची पूजा असते ती अदेव-पूजा समजावी; ह्मणून मी यांच्या मूर्तीला पूज्य व इतर पाषाणादि जड मूर्तीला अपूज्य समजतों.

(२२) " शिक्षण "—ज्याच्या योगानें विद्या सभ्यता, धर्मात्मता, जिते-न्द्रियता इत्यादि गुण वाढतील व अविद्यादि दोष सुटतील त्यालाच शिक्षा असें ह्मणतात.

(२३) " पुराण "—जे ब्रह्मादिकांनीं बनविलेले ऐतरेयादि ब्राह्मण ग्रंथ आहेत त्यांनाच मी पुराण, इतिहास, कल्प, गाथा व नाराशंसी असें मानतों, भागवतादि ग्रंथांला नाहीं.

(२४) "तीर्थ"—ज्याच्या योगानें दुःखसागरांतून पार होतां येतें अर्थात् जीं सत्यभाषण विद्या, सत्संग, यमनियमादि योगाभ्यास, पुरुषार्थ, विद्यादानादि शुभ कर्में आहेत त्यांलाच मी तीर्थ असें समजतों, इतर जलस्थलादिकांला नाहीं.

(२५) "प्रारब्धाहून पुरुषार्थ श्रेष्ठ"—आहे; कारण त्याच्या योगानेंच संचित प्रारब्ध बनतें, पुरुषार्थामध्यें सुधारणा झाल्यानें सर्वांचा सुधार होतो व जे बिघडल्यानें सर्व बिघडलें जातें. तात्पर्य प्रारब्धापेक्षां पुरुषार्थ श्रेष्ठ आहे.

(२६) "मनुष्य"—जो सर्वांशीं यथायोग्य वागतो व आपल्या प्रमाणेंच सर्वांशीं सुख दुःख, हानि, लाभ वगैरेमध्यें वागतो तोच श्रेष्ठ मनुष्य होय, याहून विपरीत जो वागतो त्याला कनिष्ठ मनुष्य असें मी समजतों.

(२७) "संस्कार"—ज्याच्या योगानें शरीर, मन व आत्मा उत्तम होऊं शकतात त्याला संस्कार असें ह्मणतात. हे निषेकादि व स्मशानान्त सोळा प्रकारचे आहेत. ह्याला कर्तव्य असें मी समजतों. व शरीराचें दहन झाल्यानंतर मृताबद्दल कांहींएक कर्तव्य नाहीं असें मी मानतों.

(२८) "यज्ञ"—ज्यामध्यें विद्वानांचा यथायोग्य सत्कार केला जातो, ज्यामध्यें शिल्प व रसायन या पदार्थविद्येच्या योगानें उपयोगी कृत्य घडवून आणलें जातें; ज्यामध्यें विद्यादि शुभगुणांचें दान होत असतें, अग्निहोत्रादि करून ज्यामध्यें वायु, वृष्टि, जल व औषधि इत्यादिकांची पवित्रता करून सर्व जीवाला सुखी केलें जातें, त्याला यज्ञ असें मी समजतों.

(२९) श्रेष्ठांना "आर्य" व दुष्टांना "दस्यु" असें इतराप्रमाण मीहि समजतों.

(३०) "आर्यावर्त"—देश या भूमीचें नांव यासाठीं आहे कीं या भूमीमध्यें आदि सृष्टिपासून आर्यलोक निवास करीत आले आहेत, पण याची अवधि उत्तरेस हिमालय, दक्षिणेस विंध्याचल, पश्चिमेस अटक व पूर्वेस ब्रह्मपत्रा नदी आहे. या चारांच्या मध्यें जेवढा देश आहे त्यालाच आर्यावर्त असें ात. व जे या देशामध्यें सदैव राहत असतात त्यांनाहि आर्य असें ह्मणतात.

